सुधाकर : रामलाल, माझ्यासमोर उभा राहूं नकोस ! पद्माकर, आधीं घरांतून बाहेर नीघ ! थेरड्या, चलाव !

पद्माकर : छे : ! छे : ! हा तर बेताल अनर्थ आहे ! भाई, चल, इथं उभं राहण्यांत अर्थ नाहीं ! सिंधुताई, चल, याउपर तूं या घरांत राहणं योग्य नाहीं. हा शुद्ध नरकवास आहे !

तळिराम : दादासाहेब, पैसा बोलतो आहे हा !

सुधाकर : चल जाव ! सिंधु, तूं पण चालती हो ! शरद्, तूं पण जा ! मला कुणाची जरूर नाहीं !

पद्माकर : ठीक आहे. ऊठ सिंधु, या घरांत पाणी प्यायला सुद्धां राहूं नकोस ! चल !

सिंधु : दादा, या घरांतून कुठं जाऊं म्हणतोस ?

पद्माकर : कुठंही ! या नरकाबाहेर अगदीं कुठंही !

सिंधु : दादा, तुला वेड तर नाहीं लागलं ? इकडची अशी अवस्था झालेली, घरांत हा प्रकार, आतां यापुढं तर डोळ्यांत तेल घालून मला बसायला पाहिजे ! मला कांहीं वेडंवाकडं झालं असतं, तर इकडून मला टाकणं झालं असतं का ? माझ्याकरितां आकाशपातळ एक करायचं झालं नसतं का ?

सुधाकर : सिंधु, तुला इथं रहायचं असेल तर या हरामखोराचं नांव सुद्धां घेऊं नकोस ! या चोराच्या घरांतला एक पैसादेखील माझ्या घरांत आणायचा नाहीं; असं असेल तर या घरांत रहा !

तळिराम : शाबास दादासाहेब ! अशी शपथ घ्यायला लावा.

सुधाकर : सिंधु, कबूल आहे तुला हें ?

सिंधु : आपल्या पायांवर हात ठेवून सांगतें, आजन्म हाल सोशीन, काबाडकष्ट करीन; पण दुसऱ्याच्या कष्टाची कवडी म्हणून या घरांत येऊं देणार नाहीं. आपल्या दोघांच्या कष्टाविरहित सगळ्या जगांतील धनदौलत आजपासून मला शिवनिर्माल्य आहे !

बाबासाहेब : सिंधु, काय भलतीच शपथ घेतलीस ही ?

पद्माकर : ताई, तूं शुद्धीवर आहेस का ? तुझ्यासारख्या शीलगुणसंपन्न स्त्रीनं एखाद्या दिवाण्या दारूबाजासाठीं—

सिंधु : हां ! दादा, या घरांत, या पायांसमोर—माझ्यासमोर असं अमंगल मी तुला बोलूं देणार नाहीं ! पतिव्रतेच्या कानांची ही अमर्यादा आहे ! जा—बाप भाऊ माझं या जगांत कोणी नाहीं ! पतिव्रतेला नातीं नसतात. ती बापाची मुलगी नसते, भावाची बहीण नसते, मुलाची आई नसते ! देवा-ब्राह्मणांनीं दिलेल्या नवऱ्याची ती बायको असते ! बाबा ज्या दिवशीं माझं लग्न झालं त्याच दिवशीं तुमची मुलगी तुमच्या घराला मेली आणि नव्या नांवानं मी या घरांत जन्माला आलें !

सुधाकर : सिंधु, हे हरामखोर इथं कशाला उभे राहिले आहेत ! तुला रहायचं असेल तर सगळ्यांना हांकलून दे !

सिंधु : आतां जर कुणी इथं थांबाल तर माझ्या गळ्याची शपथ आहे ! दादा, बाबा, आई, शरदवन्सं, ऐकलंतना ? माझ्याबद्दलची सारी मायाममता सोडून या पावलीं सारे बाहेर जा !

सिंधूच्या त्या निर्वाणीच्या विनंतीमुळें नाइलाज होऊन बाबासाहेब, रामलाल, पद्माकर, शरद्—सर्वजण खालीं माना घालून खिन्न मुद्रेनें घराबाहेर पडले !

ते सर्व बाहेर पडल्यावरहि सुधाकराच्या वर्तनांत कांहींच उतार पडला नाहीं; कारण आपल्या हातून काय झालें आहे हें कळण्याइतका तो शुद्धीवर होताच कुठं ! तो तळिरामाला म्हणाला, "तळिराम, भर आतां पेला राजरोस आणि दे मला !"

तळिराम : आतां कुठं आहे शिलक ? हा एवढा एकच प्याला !

सुधाकर : कितीका असेना ? पण सिंधूच्या देखत घेणार ! बस्स झाला तेवढा एकच प्याला !

आणि त्या दिवसापासून खरोखरीच सिंधूनें माहेरच्या एका पैलाही स्पर्श केला नाहीं. घरांत आदा तर बिलकूल नाहीं व सुधाकराचें व्यसन तर दिवसें-दिवस वाढत्या प्रमाणांत—यामुळं घरांतले कागदागिने व सामानसुमान विकण्याची

लवकरच बिचारीवर पाळी आली ! सुधाकर अलिकडे दिवसभर प्यालेल्या स्थितीतच असल्यामुळें घरांतले आणि बाहेरचे सारे व्यवहार तिच्यावरच पडूं लागले होते. दिवसांतून त्याचें व सिंधूचें एकदांच संभाषण होई—आणि तें म्हणजे तिच्याजवळ दारूला पैसे मागण्याकरितां ! परंतु असें किती दिवस चालणार ? घरांतले दागदागिने व विकण्यासारखें सारें सामान संपल्यावर बिचाऱ्या सिंधूला उपजीविका चालण्याकरितां हलकींसलकीं कामें करणें भाग पडलें. छापखान्यांतलि फॉर्म मोडणें, दुसऱ्यांचें दळणकांडण किंवा शिवणटिपण करणें—असलीं कामें गीतेमार्फत मिळवून ती दोन पैसे मिळवूं लागली. परंतु इतकें करूनहि जेमतेम एका वेळचें अन्न पोटांत गेलें तरी नशीबच ! मात्र हे तिचे असे हाल चालू असतांना सुधाकराच्या खाण्यापिण्यांत ती काडीचीहि उणिव पडूं देत नव्हती. आणि तोहि निर्लज्जपणानें तिनें काबाडकष्ट करून मिळविलेल्या पैशांवर आपलें व्यसन साजरें करीत होता ! सिंधूचे होत असलेले हाल पाहून गीतेच्या अगदीं पोटांत तुटे ! शक्य तें सर्व प्रकारचें साहाय्य ती सिंधूला करीत असेच परंतु सिंधूच्या अति चांगुलपणामुळेंच सुधाकराला अधिक फावतें आहे ह्या विचारामुळें ती कांहीं कांहीं वेळां उद्विग्न होऊन तिच्यावर वाटेल तसें तोंडसुख घेत असे. आज असाच प्रकार झाला होता. सिंधूनें ओळीनें तीन रात्रीं जागून एका लग्नघरचें दळणाचें व मसाल्याचें काम केलें होतें. परंतु त्या कामाचे पैसे तिच्या हातांत पडतात न पडतात तोंच सुधाकरानें ते दारूकरितां म्हणून तिच्या हातून काढूनहि घेतले. गीतेला हें जेव्हां कळलें तेव्हां ती भडकून गेली. ती वैतागून बोलत होती व सिंधु तितक्याच शांतपणें तिला उत्तरें देत होतीं !

गीता : तुमच्या देहस्वभावाला आतां म्हणावं तरी काय बाईसाहेब ? या असल्या नवऱ्यांना—

सिंधु : हं, गीताबाई, आपण बायकांनीं असं बोलावं का ? नवरा म्हणजे देवासारखा—

गीता : बाईसाहेब, अशानेंच तर नवरेपणाचे देव्हारे माजले ! दारू पितो तो कसला देव हो ? त्याची मसणांत देखील जिम्मा व्हायची नाहीं ! मेल्या एकाच्या

अंगीं काडीचा वकूब नाहीं अन् हे म्हणे देव ! या असल्या देवांची नित्यनिय-मानें खेटरांनींच पूजा करावयास हवी !

सिंधु : गीताबाई, तुमच्या जीभेला कांहीं सुमार—!

गीता : बाईसाहेब, या असल्या पतिदेवांचं बेसुमार वर्तन पाहिलंना कीं खरोखरीच माझ्या जिभेला कांहीं सुमार रहात नाहीं ! पण बाईसाहेब मी वावगं काय बोलतें तें तरी सांगा. तुम्हीच सांगा बघूं, काय केलं यांनीं तुमच्यासाठीं ? कधीं गोळाभर अन्न घातलं तुम्हांला वेळेवर, का बोटभर चिंधी आगली घडोतीसाठीं ? अष्टौप्रहर बाटलींत बुड्या मारून बसल्या ना यांच्या मोठाल्या बुद्धया ? हे हो कसले देव ? अहो हे शेंदूरकमी देव, निव्वळ दगडधोंडे ! आणि यांच्याकरितां मुळुंमुळुं रडत बसायचं ? राणीचं राज्य झालं आहे म्हणतात ना आतांशा ? मग राणीच्या या राज्यांत बायकांचे कां असे धिंडवडे निघतात हे ? मला कुणीं राज्य दिलं तर मी साऱ्या बायकांना सांगून ठेवीन कीं, नवरा दारु पिऊन घरीं आला तर खुशाल त्याला दाव्यादोरखंडानं गोठ्यांत नेऊन बांधीत जा !”

तेवढ्यांत कोणाची तरी चाहूल लागली म्हणून त्या दोघींनीं मागें वळून पाहिलं तो दारांत सुधाकर उभा असलेला त्यांना दिसला. दहा ठिकाणीं आखोट-लेलें मळकें धोतर, अंगांत एक पुराणा कोट, डोक्यावर एक विटकी टोपी, दाढी वाढलेली, पायांत कांहीं नाहीं—अशा स्थितींत पतीला पाहातांच सिंधूला अगदीं भडभडून आलें. त्याच्या खोल डोळ्यांतून गळणारे अश्रू पाहून त्यानें गीतेचें सारें भाषण ऐकलें असल्याबद्दल तिची अगदीं खात्रीच झाली. दूध आणण्याचें निमित्त करून तिनें, ओशाळून कोपऱ्यांत उभ्या असलेल्या गीतेला बाहेर लावून दिलें. नंतर ती सुधाकराच्या अगदीं जवळ गेली. किंचित् लडिवाळपणानेंच त्याला म्हणाली, “काय बरं असं ? गीताबाई आपल्या फटकळ तोंडाच्या आहेत ! त्यांचं बोलणं असं मनावर घेऊं नये !”

सुधाकर : सिंधु, गीतेचा एक एक बोल जिवाला कसा चाबकाच्या फटकाऱ्याप्रमाणें लागत होता ! पण तिचा प्रत्येक फटकारा किती मोलाचा होता ! सिंधु दारूच्या धुंदीनें बहिरून निजलेला माझा जीव तुझ्या नाजुक बोलाफुलांनीं कसा जागा

होणार ? त्याच्यावर गीतेच्या तोंडचा दगडधोंड्याचा असा निष्ठुर माराच व्हायला पाहिजे ! सिंधु, नवऱ्याच्या पोटांत दडी धरून बसलेल्या या दारूची तुम्ही कदर केलीत म्हणून सांबांच्या पिंडीवर बसलेल्या विंचवाच्या नांगीप्रमाणं ती तुम्हा सर्वांना अजून छेडते आहे सिंधु—

सिंधु : पुरे ना गडे आतां हा त्रागा—!

सुधाकर : सिंधु, मी आजपासून दारु पिणं सोडलं !

सिंधु : खरंच का हें ?

सुधाकर : खरं, अगदीं खरं ! आजपासून दारु पिणं सोडलं; कायमचं सोडलं !

सिंधु : अहाहा ! असं झालं तर देवच पावला ! हें पहा आपल्या पायावर मस्तक ठेवून—

सुधाकर : सिंधु, सिंधु, काय करतेस तूं हें ? माझ्या पायांवर मस्तक ठेवतेस ? या सुधाकराच्या, या दारुबाज सुधाकराच्या !—ज्यानं आपल्या विद्येला, ज्ञानाला, नांवलौकिकाला, दारूच्या पेल्यांत बुडविलं, त्या सुधाकराच्या ? सिंधु, मी दारूच्या व्यसनानं काय करायचं ठेवलं आहे ? वडिलांच्या पुण्याईला, ब्रह्मकुळींच्या पवित्रतेला दारूनं तिलांजली दिली ! तुझ्यासारख्या देवीची अशी विटंबना केली ! ज्या तुझ्या बापाच्या घरीं रोज सदावर्त चालावीं त्या तुला वांसभर अन्नालाहि मी महाग केली ! लहानपणीं बाहुलाबाहुलीच्या लग्नांत चिमुकला अंतरपाट धरण्यासाठीं तूं बेदरकारपणानं पैठणीच्या धांदोट्या केल्या असशील, त्या तुला आज फाटक्या कपड्यांमुळं बाहेर जाण्याची पंचाईत पडावी ! तुझ्या बापाच्या घरीं खेळतां खेळतां ओंजळीच्या वैरणीनं तूं जात्यांत मोतीं भरडले असतेस तरी कुणाला त्याचं कांहीं वाटलं नसतं !—त्या तुझी मी अशी दशा करून टाकली कीं, पोटासाठीं आसवांचीं मोतीं वेंचून तुला मोलाचं दळण करणं भाग पडावं ! सिंधु, गीतेनं काय खोटं सांगितलं ? तुझा नवरा होण्याला मी पात्र आहें का ? भलत्या भावभक्तिनं माझ्यासारख्या ध्याडाची देवपूजा कशाला करीत बसलीस ?

सिंधु : ऐकलं का ? आतां मी नाहीं असं वेडंविद्रं बोलूं द्यायची ! सोडायची झाली ना आजपासून ? मग आतां गेल्या गोष्टीनं जीव कशाला कष्टी करून

घ्यावयाचा ? गेलं तें गंगेला मिळालं ! पण आतां मात्र पुढं करायचा ना हा निश्चय कायम ?

सुधाकर : कायम, कायम, अगदीं कायम ! आपल्या बाळाची शपथ घेऊन सांगतों कीं, आजपासून दारु अगदीं वर्ज्य ! वकिलीची सनद गेली तरी हरकत नाहीं; माझ्या चार वजनदार स्नेह्यांकडून कुठं नोकरीची सोय पाहातों. आतां हा सुधाकर तुझ्या एका शब्दाबाहेर जाणार नाहीं ! ”

आणि एवढें बोलून सुधाकर त्याच पावलीं नोकरीच्या शोधार्थ म्हणून बाहेर पडला. वाट चालत असतांना हजारों उलटसुलट शंकाकुशंकांनीं त्याचा जीव अगदीं कासावीस होत होता. जगाकडे बेदरकारपणें पाहूं शकणारी त्याची पूर्वींची दृष्टि आतां पार ओशाळी–भितरी होऊन ओळखीच्या प्रतिष्ठितांकडे पहाण्याचें टाळीत होती ! स्तुतीखेरीज इतर शब्द ऐकण्याची ज्याच्या कानांना संवयच नव्हती तो सुधाकर आतां जिवाचा कान करून सहानुभूतीचा एकादा शब्द तरी कानावर पडतो का म्हणून आशाळभूतपणें येणाऱ्या-जाणाऱ्याकडे चोरट्या नजरेनें पहात होता ! ज्याच्याशीं दोन शब्द रस्त्यांत बोलण्यास मिळाले तर त्यामुळें आपली प्रतिष्ठा वाढेल असें लोक मानीत तोच सुधाकर आतां प्रतिष्ठितांशीं बोलणें नाहींच पण केवळ त्यांच्या आसपास तरी आपणास वावरण्यास मिळेल कीं नाहीं या काळजींत चूर होऊन गेला होता ! परंतु तो आज कांहीं चांगल्या मुहूर्तावर बाहेर पडलेला नसावा; कारण आधीं बराच वेळ ओळखीचें असें त्याला रस्त्यांत कोणीच भेटलें नाहीं व नंतर जे भेटले ते कोण तर— शास्त्री व खुदाबक्ष ही जोडगोळी ! त्या व्यसनी जोडीला पाहून सुधाकरानें कपाळाला हातच लाविला ! त्या दोघांनीं त्याला तळिरामाच्या घरीं चलण्याचा आग्रह सुरू केला. परंतु सुधाकरानें आपण दारू सोडण्याचा—एवढेंच नव्हे तर कोणत्याहि व्यसनी माणसाच्या घरीं न जाण्याचा आपला निश्चय त्यांच्याजवळ व्यक्त केला. त्याचा निश्चय ऐकून ते दोघे उपहासानें खूप मोठ्यांदा हंसले. त्यांनीं त्याला आपल्याबरोबर चलण्याचा खूप आग्रह केला परंतु तो बिलकूल ऐकण्याचें लक्षण दिसेना. तेव्हां शास्त्रीबुवा खुदाबक्षाला म्हणाले, “चला, खांसाहेब; तापलेली कोंब

आपोआप थंड पडूं द्यावी हें उत्तम ! हा या घटकेपुरताच पश्चात्ताप आहे. स्मशान-वैराग्यामुळं डोक्यांत घातलेली राख फार वेळ टिकावयाची नाहीं ! जरा धीरानं घ्या म्हणजे आपोआपच गाडं रस्त्याला लागेल. सुधाकरा, आम्हीं तर जातोंच, पण तूं आपण होऊन कुवांत आला नाहींस तर यज्ञोपवीत काढून ठेवीन, हें ब्रह्मवाक्य लक्ष्यांत ठेव !"

ते दोघे निघून गेले. ते गेलेल्या दिशेकडे एकदांच तिरस्कारानें बघून सुधाकर आपली वाट चालूं लागला. वाटेंत त्याला त्याच्या परिचयाचे एक दोन गृहस्थ भेटले. त्यांना अदबीनें नमस्कार करून त्यानें नोकरीची इच्छा केली. परंतु त्यांपैकीं एकानें त्याला आपण ओळखतच नसल्याचें सांगून चकित केलें तर दुसऱ्यानें आपण आतां अतिशय गडबडींत असल्याचा बहाणा करून त्याला टाळलें. तो खिन्न मनानें पुन्हां वाट चालूं लागला. कांहीं वेळानें त्याला समोरून रावसाहेब येतांना दिसले; आर्यमदिरा मंडळांत नेहमीं येणाऱ्यांपैकीं ते एक गृहस्थ होते. एवढेंच नव्हे तर सुधाकराची सनद रद्द झाल्यास नोकरी देण्याचें वचन त्यांनीं त्याला सर्व मंडळींसमक्ष अनेकदां दिलेलें होतें. त्यामुळें त्यांना पाहातांच पुन्हां सुधाकराच्या मनांत आशांकुर निर्माण झाला. ते जवळ येतांच सुधाकरानें त्यांना अत्यंत अदबीनें नमस्कार केला. परंतु दादासाहेबांच्या तोंडावर ओळखीचा भाव दिसेना.

रावसाहेब : कोण तुम्ही ? काय नांव तुमचं ?

सुधाकर : रावसाहेब, माझं नांव सुधाकर.

रावसाहेब : सुधाकर !—नांव कुठंतरी ऐकल्यासारखं वाटतं ! काय म्हणालांत ? सुधाकर नाहीं का ?

सुधाकर : रावसाहेब, आपल्या व माझ्या आर्यमदिरा मंडळांत अनेक वेळां गांठी पडलेल्या आहेत ! आपण बंधुभावानं संकटकालीं मला साहाय्य करण्याचीं कित्येकदां वचनं दिलेलीं आहेत—तीं आपल्या स्मरणांत नाहींत काय ? रावसाहेब, मीं आज खरोखरीच संकटांत आहें, आणि म्हणून त्या वचनांची आठवण देण्यासाठीं—

रावसाहेब : बेशरम मनुष्या, भलत्या गोष्टींची भलत्या ठिकाणीं आठवण करून

यायची तुला लाज वाटत नाहीं ? मूर्खा, पहिल्यानं मीं तुला न ओळखल्या-सारखं केलं होतं, तेवढ्यावरूनच तूं सावध व्हावयास पाहिजे होतंस. दारूच्या बैठकींत दिलेलीं वचनं, केलेल्या ओळखी हीं सारीं दारूच्या फुटलेल्या पेल्या-प्रमाणं, खान्यांतल्या खरकट्याप्रमाणं जिथल्या तिथं टाकून यायचीं असतात. काळोखांतली दारुबाज दोस्ती अशी उजेडांत उजळ माथ्यानं वावरूं लागली तर तुझ्याप्रमाणं माझीहि बेअब्रू भरचवाठ्यावर नाचायला लागेल. चल जा. माझ्यासारखा आणखी कुणाला या संकटांत पाडूं नकोस !"

संभावीतपणाच्या बुरख्याखालीं वावरणाऱ्या त्या पाजी माणसाची कोणत्या शब्दांनीं संभावना करावी हेंच सुधाकराला उमगेना ! तेवढ्यांत समोरून मगन-शेट येत असलेला त्याला दिसला. रावसाहेबांच्या वाग्बाणांनीं घायाळ झालेल्या त्याच्या जीवाला पुन्हां जरा आशेची धुगधुगी आल्यासारखें झालें. जुना अनु-भव जमेला धरून या नव्या गृहस्थाला आपल्याला ओळख देण्याची इच्छा आहे कीं नाहीं हें आधींच चांचपून पहाणें त्याला इष्ट वाटलें.

सुधाकर : मगनशेट, माझं नांव सुधाकर ! माझा चेहरा आपल्याला कुठंतरी पाहिल्यासारखा वाटत असेल—

मगनशेट : सुधाकरपंत, असं तीव्रपणानं बोलण्याचं काय कारण आहे ? तुम्ही आम्हांला पाठच्या भावासारखे आणि आम्हांला हें बोलणं ?

सुधाकर : मगनशेट माफ करा, पण मला आतांच एक कटू अनुभव आल्यामुळें सावध होऊन मी तुम्हांला तसं विचारलं. शेटजी, मी आज विलक्षण परिस्थितींत आहे. मला एखादी नोकरी पाहिजे.

मगनशेट : तुम्हीं आम्हांला पाठच्या भावासारखे—आम्हीं तुमच्यासाठीं काय नाहीं करणार ? आहे एक नोकरी दरमहा पंधरापर्यंतची, एका कंत्राटदाराकडे स्टोअर संभाळण्याची. पण काम जोखमीचं—जबाबदारीचं—तेव्हां राग मानूं नका सुधाकर !—तिथं जामीन हवाच !

सुधाकर : मग शेटजी माझ्यासाठीं आपण जामिनकी पत्करायला—

मगनशेट : आतां कसं सांगावं तुम्हांला ? सुधाकर, तुम्ही आमच्या पाठच्या

भावासारखे ! तुमच्याजवळ आपलं स्पष्ट बोलायचं—हें बघा, तुम्हीं बोलून चालून व्यसनी, तुमची जामिनकी म्हणजे धोतरांत निखारा बांधूनच हिंडायचं—हो, तुम्हींच सांगा—व्यसनी माणसांचा भरंवसा काय घ्या ? म्हणून आपलं हात जोडून सांगणं आहे कीं, मला या संकटांत व्यर्थ घालूं नका !—बरं, येऊं आतां—वेळ झाला !"

मगनशेट निघून गेला. सुधाकर सुन्न मनानें तेथेंच कितीवेळ तरी उभा राहिला. तो तिथें तसा उभा असतांना कित्येक लोक त्याच्या अंगावरून गेले; परंतु त्यांपैकीं कोणालाहि त्यानें नोकरीबद्दल विचारिलें नाहीं. आपल्या दुर्दैवाची आतां अधिक परीक्षा पहाण्याचा त्याला बिलकुल हुरुप नव्हता. आपल्या व्यसनाच्या बोभाट्यामुळें यापुढें आपल्याला प्रतिष्ठांच्या जगांत माणसाचें स्थान मिळणें सर्वस्वीं अशक्य आहे. याबद्दल त्याची पूर्ण खात्री पटली. आपलें अपयशी तोंड सिंधूला दाखविण्याची त्याला शरम वाटूं लागली. आत्महत्या करून घेणें किंवा पुन्हां व्यसनाच्या खातेऱ्यांत लोळावयाला लागणें एवढे दोनच मार्ग आतां त्याच्या दृष्टीनें त्याच्यापुढें खुले होते. काय करावें, कोठें जावें, त्याला कांहीं सुचेना ! परंतु कांहीं वेळानें अतिविचारानें दुर्बल झालेल्या त्याच्या मनावर मात करून त्याचे पाय जे चालूं लागले—ते थेट नित्याच्या संवयीप्रमाणें तळिरामाच्या घरांत येऊन थांबले ! तापानें भणभणलेल्या तळिरामाभोंवतीं त्याच्या साऱ्या व्यसनी स्नेह्यासोबत्यांचा गराडा पडलेला होता. सुधाकराला तेथें पहातांच शास्त्री-बुवांनीं एकदम खुदाबक्षाच्या हातावर टाळी दिली व ते उपहासानें म्हणाले, "कां खुदाबक्ष ? आमचं म्हणणं अखेर खरं झालं कीं नाहीं ? सुधाकर, तुझी प्रतिज्ञा फुकट गेली ना ? अरे, आतां तरी कबूल कर—तुझ्या स्वभावाची परीक्षा आम्हांला झाली होतीना ?

सुधाकर : मूर्खा, तुला माझ्या स्वभावाची परीक्षा झाली असें नाहीं, पण मला माझ्या दुर्दैवाची परीक्षा मात्र झाली नाहीं ! मित्रहो, क्षमा, करा, पण मला आतां छेडूं नका. माझी कुचेष्टा करायची असेल तर खुशाल करा—पण जरा बाजूला जाऊन करा !

सुधाकराचा आजचा थाट कांहीं वेगळाच आहे हें साऱ्यांच्या लक्षांत आलें. त्याच्या नादीं अधिक लागण्यांत अर्थ नाहीं असें पाहून सारी मंडळी पुन्हां मदिरेच्या नादीं लागली. शेवटचे क्षण मोजीत असलेल्या तळिरामाला वैद्याच्या पुडीबरोबर अनुपान म्हणून मंडळींनीं दारु पाजली; व नंतर त्याच्या तब्बेतीला आरोग्य लाभावें या इच्छेनें त्या सर्वांनीं मदिरादेवीची आराधना करण्यास सुरुवात केली ! तळिरामाच्या आरोग्यप्रीत्यर्थ करीत असलेल्या या तिच्या पूजाअर्चेत कांहीं वेळानें ते इतके तद्रूप होऊन गेले कीं त्या नादांत तळिरामाचें प्राणोत्क्रमण केव्हां झालें हें त्यांपैकीं कोणाच्याच लक्षांत आलें नाहीं !

इकडे सुधाकराच्या घरीं बिचारी सिंधु, तो आतां येईल मग येईल म्हणून वाट पहात होती. सुधाकरानें दारु सोडण्याबाबत केलेला निश्चय तिनें गीतेमार्फत रामलालला व त्याच्याकडेच मुक्कामाला असलेल्या पद्माकराला देखील कळवून टाकिला होता ! त्या दशा दारिद्र्यांतहि तिला जेवढा उत्साह व्यक्त करितां येणें शक्य होतें तेवढा ती करीतहि होती. दळणाचा एक आणा गीतेनें आणून दिला तेव्हां तिला त्यांतल्या दोन पैशाचें मुलाकरतां दूध व दोन पैशाची भाजी आणण्यास किंचित् दिमाखानेंच सांगितलें. सुधाकरानें घरीं आल्यावर नोकरी न मिळाल्याचें सांगितलें तरी त्यामुळें खट्टू होऊन न जातां उलट त्याची कांहींतरी गोड थट्टा करून त्याला परत गुलकींत कसा आणावयाचा याचे ती मनांतल्या मनांत नानातऱ्हेचे बेत करीत होती. सुधाकरानें घरांत पाय टाकल्याबरोबर त्याच्याजवळ मुलाला द्यावयाचें म्हणजे तो चित्ताची सारी विषण्णता क्षणार्धांत विसरून जाऊन एकदम प्रसन्न चित्तानें आपल्याशीं बोलूं लागेल.—हा बेत तर तिनें मनाशीं अगदीं पक्काच ठरवून टाकिला होता. नेहमींप्रमाणें वेडेंवाकडें बोलत, झोकांड्या जात, अवेळा तो न येतां शांत चित्तानें दिवेलागणीच्या किंचित् आधींच घरांत येऊन त्याच्या नांवाला साजेशा शब्दांनीं आपली कांहींतरी नाजुक थट्टा तो करणारच याबद्दल तिची अगदीं शंभर टक्के खात्री होती.

तेवढ्यांत दारावर कोणीतरी मोठमोठ्यानें ठोठावल्याचें तिला ऐकूं आलें.

तिनें चटकन् पुढें होऊन दार उघडलें. आणि--आणि !--

तिचा स्वतःच्या डोळ्यांवर विश्वासच बसेना ! कान बधीर झाल्यासारखें तिला वाटूं लागलें ! तिच्या साऱ्या आशाआकांक्षा एका क्षणांत धुळीला मिळालेल्या दिसूं लागल्या. डोक्यावर टोपीचा पत्ताच नाहीं, डोळे तारवटलेले, पाय लटपटत आहेत अशा अवस्थेंत नेहमींप्रमाणें अभद्र शिव्या देत सुधाकराची स्वारी घरांत आली !

सुधाकर : सिंधु, इकडे ये, मला आणखी प्यायची आहे ! फार नाहीं, फक्त एकच प्याला ! पैसे आण ! सिंधु, पैसे आण !

सिंधु : आतां कुठले बरं आणूं पैसे मी ? माझ्याजवळ कांहीं नाहीं अगदीं !

सुधाकर : खोटं बोलतेस ! आहेत ! चल आण ! आणतेस कीं नाहीं ? का जीव घेऊं ?

सिंधु : आपल्या पायाशपथ मजजवळ आतां कांहीं नाहीं. आतां एक आणा होता त्यापैकीं दोन पैसे भाजीला नी दोन पैसे बाळाला दूध आणायला म्हणून गीताबाईजवळ दिले. अगदीं बाळाच्या गळ्यावर हात ठेवून सांगतें हवी तर !

सुधाकर : त्याचा गळा दाबून टाक ! कां दिलेस पैसे ?

सिंधु : बाळासाठीं नको का द्यायला ? असं काय करायचं हें ?

सुधाकर : चल जाव ! मला नाहींत आणि त्याला पैसे आहेत ! नवऱ्यापेक्षां तें कारटं जास्त आहे काय ? सिंधु, तूं पतिव्रता नाहींस ! हरामखोर ! तें कारटं रामलालचं आहे ! माझं नाहीं !

सिंधु : शिव शिव ! काय बोलणं हें !

सुधाकर : शिव शिव नाहीं, रामलालचं आहे ! आतां मारून टाकतों ! असें म्हणून सुधाकरानें खरोखरीच त्या मुलाच्या डोक्यांत घालण्याकरितां काठी वर उचलिली. सिंधु चटकन् पुढें झाली व तिनें मुलाला पोटाशीं धरिलें. सुधाकरानें मुलावर घातलेली काठी तिच्या डोक्यावर पडली. कपाळावर मोठी थोरली जखम होऊन त्यांतून भळभळां रक्त वाहूं लागलें. आधींच अशक्त झालेल्या तिच्या

शरिराला तो रक्तस्राव असह्य झाला व शुद्ध नष्ट होऊन ती धाडकन् मागें कोसळली. तिला त्या तशा भयंकर अवस्थेंत पाहूनहि सुधाकरावर त्याचा कांहींहि परिणाम झाला नाहीं. त्यानें पुन्हां तीच काठी वर उगारून दुप्पट त्वेषानें त्या लहान अर्भकाच्या डोक्यांत घातली! अस्फुटशी किंकाळीहि न फोडतां तो कोंवळा जीव निमिषार्धांत कायमचा शांत झाला! सुधाकर पुन्हां घराबाहेर पडला.

कांहीं वेळानें दूध घेऊन गीता आली. तिच्या दृष्टीस तें भयंकर दृश्य दिसतांच तिची बोबडी वळण्याची पाळी आली. तिनें दुरून सुधाकराला घराबाहेर पडतांना पाहिलें होतेंच. त्यामुळें ह्या साऱ्या प्रकाराला कोण जबाबदार आहे हें तिच्या लक्षांत येण्यास तिला वेळ लागला नाहीं. ती तशीच धांवत पळत रामलालच्या घरीं गेली. रामलाल व पद्माकर सुधाकराच्या घरीं येऊन त्याच्या निश्चयाबद्दल त्याचें अभिनंदन करण्याच्या विचारांत होते. गीतेला घाबऱ्या घाबऱ्या आलेली पाहातांच ते जरा चरकलेच; आणि तिनें जेव्हां सारा वृत्तान्त त्यांच्या कानावर घातला तेव्हां डोक्यावर अगदीं वज्राघात झाल्यासारखेंच त्यांना झालें. पद्माकर ती बातमी ऐकून इतका बेफाम झाला कीं त्या, वेळीं त्याच्या समोर सुधाकर असता तर त्यानें त्याचा खूनच केला असता. रामलाल, शरद् व गीता यांना सुधाकराच्या घरीं पाठवून देऊन तो थेट पोलीस चौकीवर गेला व तेथील फौजदाराला घेऊन तो सुधाकराच्या घरीं आला. दरम्यान पुढें आलेल्या मंडळींनीं सिंधूला शुद्धीवर आणिलें होतें. आपली जखमी झालेली बहिण व रक्ताच्या थारोळ्यांत मरून पडलेलें तिचें मूल पहातांच पद्माकर अधिकच बेफाम झाला.

पद्माकर : फौजदारसाहेब, हें पहा मेललं मूल; हें त्या हरामखोरानं ठार मारलं! ही पहा माझी ताई! त्या चांडाळानं माझी सोन्यासारखी ताई अन्नावांचून कशी झिजवून टाकली—काठ्यादगडांनीं ठेंचून मारली—कोळ्यामाळ्यांच्या तोंडीं येणार नाहींत अशा शब्दांनीं त्या नीचानं तिच्या काळजाला घरं पाडून मारली! फौजदारसाहेब, काय वाटेल तें झालं तरी त्या पाजी माणसाला मोकळा सोडूं

नका हो ! बुद्धिपुरःसर गुन्हा केला म्हणून तुरुंगांत नेऊन घाला किंवा दारूनं माथं फिरलं आहे म्हणून वेड्याच्या दवाखान्यांत नेऊन लोटा !

फौजदार : भाऊसाहेब, असं रागावून काय होणार ? थांबा, आपण बाईंना नीट विचारून पंचनामा करूं.

पद्माकर : ताई, त्या खुनी दारुबाजानं काय काय केलं तें सगळं यांना नीटपणें सांग.

फौजदार : भाऊसाहेब, जरा शांत व्हा. बाई, तुमच्या यजमानांनीं काय केलं तें सांगा बरं.

सिंधु : त्यांनीं कांहीं केलं नाहीं.

फौजदार : मग मुलाला काय झालं ? तुम्हांला हें कपाळावर लागलं कसं ?

सिंधु : मी दोन दिवसांची उपाशी होतें. मला राहून राहून भोंवळ येत होती. मुलाला माळ्यावरून घेऊन उतरतांना मला घेरी आली. पडल्यामुळं मला कपाळावर खोंक पडली. मूल माझ्या अंगाखालीं चेंगरलं. इकडचा कांहीं संबंध नाहीं त्यांत.

पद्माकर : ताई, सपशेल खोटं सांगते आहेस ! मग या काठीला रक्त लागलं कसं !

सिंधु : काठी टेकीत रक्तभरल्या हातीं मी इथपर्यंत आलें, तिकडचा कांहीं संबंध नाहीं त्यांत !

फौजदार : बाई, हें सारं खरं आहे का ?

सिंधु : खरं, अगदीं खरं आहे. माझ्या बोलण्यावर विश्वास ठेवा.

पद्माकर : फौजदारसाहेब, हें सारं खोटं आहे हो. हिच्या खोट्या बोलण्यामुळें तो हरामखोर मात्र—

फौजदार : भाऊसाहेब, आपला राग कितीहि अनावर झाला, तरी यांच्या पुण्याईपुढं तुमचं आमचं काय चालणार ? न्यायाचं शस्त्र कितीहि तीक्ष्ण असलं तरी अशा पतिव्रतेच्या पुण्याईची ढाल आड आल्यावर तें काय करणार ?

पद्माकर : पण फौजदारसाहेब—

फौजदार : हें पहा आतां इथें त्याची अधिक चर्चा नको. तुम्ही चौकीवर

चला. मी तुम्हांला सारें कांहीं समजावून सांगतों.

पद्माकर व फौजदार पोलीस कचेरींत जाऊन जेमतेम पांचएक मिनिटें होतात न होतात तोंच सुधाकराची स्वारी घरीं परत आली. हातांत बाटली व ग्लास घेऊनच तो आला होता. त्याचा चेहरा काळाठिक्कर पडलेला होता. त्याला पाहातांच सिंधूनें आपल्या खोल गेलेल्या आवाजांत त्याला हांक मारली नंतर तिनें खुणेनें त्याला आपलें डोकें मांडीवर घेण्यास सांगितलें. त्यानें तसें करतांच ती मोठ्या कष्टानें बोलूं लागली. "पहा, आतां किनई जिवाला उगाच त्रास करून घ्यायचा नाहीं. माझं कांहीं वाईट झालं नाहीं ! भरल्या हातीं हळदीकुंकवानं आपल्या मांडीवर मला मरण येत आहे, याहून आणखी कोणतं भाग्य हवं मला ? माझ्या कपाळीं आपली सेवा एवढीच लिहिली होती—आपण आतां एकटे राहिलां—आपल्या जिवाला जपणारं कुणी नाहीं—आतां पुढं तरी माझ्या रक्ताची शपथ आहे—आपण यापुढं कधीं घेऊं नये—ऐकायचं ना माझं एवढं ? एका थेंबाला सुद्धां शिवायचं नाहीं—"

पण ती पुढं अधिक बोलूं शकली नाहीं, बोलतां बोलतांच तिची मान जी कलंडली ती कायमचीच ! ती गेलेली पाहातांच सुधाकरानें थरथरत्या हातानें बाटलींतून ग्लासांत दारु ओतली व चटकन् त्याच्यांत एक कसली तरी पुडी टाकली. त्या भयंकर प्रसंगींहि त्याला दारु पितांना पाहून शांत स्वभावाच्या रामलालचाहि राग अनावर झाला. तो मोठ्यानें ओरडला, "चांडाळा, काय पितो आहेस हें ?"

सुधाकर : दारु ! एकच प्याला !

रामलाल : अजून दारु ? जिनं एवढा अनर्थ केला तीच दारु ?

सुधाकर : होय, रामलाल, तीच दारु ! जिनं माझ्या घरांत एवढा अनर्थ केला तीच दारु ! जिनं चारी खंडांत अनर्थाचं साम्राज्य चालविलं ती दारु ! कुबेराला भीक मागायला लावते ती दारु ! भीमासारख्या वज्रदेही शरिराला बहात्तर रोगांचा दवाखाना बनविते ती दारु !—रामलाल, रागावूं नकोस—तुला माहीत नाहीं कीं दारूची सवय सुटण्याचा काळ ती लागण्यापूर्वीं फार तो असतो !

पहिला एकच प्याला घेण्यापूर्वी भावी मद्यप्याचा हात धरला तरच कामवा होईल ! दारुबाज दारूंतच मरायचा, हें ब्रह्मवाक्यच आहे ! आणि माझ्या-सारख्या एखाद्याला पश्चाताप झाला तरी हा शेवटचा असा एकच प्याला घ्यावाच लागतो ! मात्र जळजळीत औषधाला मारण्यासाठीं त्यांत जसं पुष्कळसं पाणी ओतावं लागतं त्याप्रमाणं हा अखेरचा एकच प्याला घेतांना, त्यांतली दारूची जलाल आग मारण्यासाठीं त्यांत रसकापुरासारखं एखादं विष बरंच घालावं लागतं!
रामलाल : काय ? त्या पेल्यांत तो रसकापूर घातलं आहेस ? भयंकर विष प्यालास ?
सुधाकर : पिऊं नको तर काय करूं ? ही पहा—ही देवता मला सोडून गेल्यावर जगांत काय राहिलं आहे ? माझी सिंधु—रामलाल, काळसागराला मिळाली—नाहीं, या पातकी सुधाकरानं निर्मिलेल्या दारूच्या समुद्राला मिळाली ! या सुधाकराचं जग दारूच्या एकच प्याल्यांत बुडून मेलं !—रामलाल—"

पण सुधाकर अधिक बोलूं शकला नाहीं. तो एकदम मागें कोसळला. त्याच्या पडत्या अंगाखालीं तो दारूचा प्याला सांपडून त्याचा अगदीं चुराडा झाला ! तीन जीवांचा बळी घेतल्यावर आपलें जीवितकार्य संपल्याच्या समाधानानें जणुं त्यानेंहि आत्महत्त्या करून घेतली !



## प्रकरण....८ वें

★ ★

१९१४ ते १९१८ या कालांत झालेल्या पहिल्या जागतिक महायुद्धाच्या प्रसंगीं हिंदी फौजांनीं दोस्तांच्या बाजूनें (इंग्लंड, फ्रान्स, अमेरिका वगैरे) लढून रणांगणावर गाजविलेला पराक्रम महशूर आहे. या मदतीला स्मरून ब्रिटिश पार्लमेंट कांहीं भरीव राजकीय हक्क हिंदुस्थानाला देईल अशी तत्कालीन जनतेची कल्पना होती. परंतु १९१९ च्या मोर्लेमॉटेग्यु सुधारणान्वयें मतदानांतील हक्काच्या वाढीसारख्या कांहीं किरकोळ गोष्टीखेरीज हिंदी जनतेच्या पदरांत कांहींच पडलें नाहीं. या अपेक्षाभंगामुळें जनतेंत तीव्र असंतोष पसरला. या असंतोषाच्या आगींत जागतिक आर्थिक मंदी, १९१८ ची देशभर पसरलेली इन्फ्लुएंझाची साथ, रौलट ॲक्टान्वयें नागरिकांची गळचेपी करण्यास पोलिस अधिकाऱ्यांस मिळालेला वाव, डायरच्या कारकिर्दींत पंजाबांतील जालियनवाला बागेंत झालेली हजारों स्त्री-पुरुषांची अमानुष कत्तल—या प्रकरणांमुळें अगदीं तेलच ओतल्यासारखें झालें. लोकमान्य टिळक नुकतेच १ ऑगस्ट (१९२०) मृत्यू पावल्यामुळें महात्मा गांधींकडे देशाचें नेतृत्व आलें होतें. आफ्रिकेंतील झगड्यांत यशस्वी झालेलें सत्याग्रहरूपी युद्धतंत्र महात्माजींनीं येथेंहि वापरावयास प्रारंभ केला. त्यांनीं असहकारितेच्या चळवळीला मोठ्या प्रमाणांत प्रारंभ केला. त्या चळवळीमध्यें सरकारी कचेऱ्या, कोर्टें, पदव्या, शाळा, कॉलेजें, परदेशी कापड यांवर बहिष्कार घालण्यांत आला. याच सुमाराला खिलापतीच्या चळवळीला प्रारंभ झाल्यानें हिंदु-मुसलमान ऐक्याचें अपूर्व दृश्य देशांत दिसूं लागलें. देशांतील या प्रचंड राजकीय घडामोडींचे पडसाद अर्थातच मराठी रंगभूमीवरहि उठल्याशिवाय राहिले नाहींत. तत्कालीन राजकीय आंदोलनांतून स्फुरलेलीं कांहीं निवडक नाटकें म्हणजे वि. ना. शेट्येकृत 'लोकशासन' (१९१९), व 'रक्षाबंधन' (१९२०), कृ. प्र. खाडिलकरकृत 'द्रौपदी' (१९२०), वि. सी. गुर्जरकृत 'राजलक्ष्मी' (१९२१), भा. वि. वरेरकरकृत 'सत्तेचे गुलाम' (१९२२), बा. बा. भोळेकृत 'अरुणोदय' (१९२३), य. ना. टिपणीसकृत

'आशा–निराशा', त्र्यं. सी. कारखानीसकृत 'राजाचें बंड' ( १९२५ ), वीर वामनराव जोशीकृत 'रणदुंदुभी' ( १९२७ ) व 'धर्म सिंहासन' ( १९२९ ) हीं होत.

भा. वि. वरेरकरकृत 'सत्तेचे गुलाम' ( १९२२ ) हें या विशिष्ट राजकीय वातावरणांतूनच स्फुरलेलें आहे. वरेरकरांनीं पुढील नाटकें लिहिलीं आहेत.

**पौराणिक** : कुंजविहारी ( १९०८ ), संजीवनी (१९१०), संगीत वरवर्णिनी ( १९१४ ), संन्याशाचें लग्न ( १९४५ ).

**सामाजिक** : हाच मुलाचा बाप ( १९१६ ), संन्याशाचा संसार ( १९१९ ), पापी पुण्य ( १९२९ ), संसार ( १९३२ ), सदा बंदिवान् ( १९३३ ), जागती ज्योत ( १९३३ ), नामानिराळा ( १९३३ ), स्वयंसेवक ( १९३४ ), समोरासमोर ( १९३७ ), कोरडीकरामत (१९३९), उडतीं पांखरें (१९४१), माझ्या कलेसाठीं ( १९४२ ), सारस्वत ( १९४२ ), परतल्यावर ( १९४४ ).

**राजकीय** : सत्तेचे गुलाम ( १९२२ ), तुरुंगाच्या दारांत ( १९२३ ), करग्रहण ( १९२७ ); सिंगापुरांतून ( १९४४ ).

**ऐतिहासिक**–करीन ती पूर्व.

सामाजिक, धार्मिक व राजकीय क्षेत्रांत वेळोवेळीं उद्भवणाऱ्या प्रश्नांवर तावडतोब लोकाभिरुचीला पोषक अशीं नाटकें लिहिणारा बहुप्रसवी व यशस्वी लेखणीचा नाटककार मराठींत अजून पावेतों तरी भा. वि. वरेरकरांखेरीज दुसरा कोणी झालेला नाहीं. ह्याच्याच जोडीला वरेरकरांच्या नाटकांचें आणखी एक वैशिष्ट्य आहे. केवळ उच्च अभिरुचीच्या प्रेक्षकांकरितांच नाटकें लिहिण्याकडे कल असलेला किर्लोस्कर नाटक मंडळीचा संप्रदाय व केवळ अत्यंत खालच्या दर्जाच्या लोकांना रिझविण्याच्याच हेतूनें लिहिलेलीं पाटणकरी संप्रदायांतलीं नाटकें—ह्या दोन्हीं संप्रदायांचा समन्वय घालण्याचा प्रयत्न वरेरकरांनीं बुद्धिपुरःसर केलेला आढळतो. या दोन्ही वैशिष्ट्यांमुळेंच त्यांचें 'सत्तेचे गुलाम' आजतागायत बहुजन समाजांत लोकप्रिय राहिलें आहे. ता. १५ जून १९४७ रोजीं या नाटकाचा पंचविसावा वाढदिवस साजरा करण्यांत आला. या 'रौप्य-

श्री. भार्गव विठ्ठल वरेरकर



जन्म : १८८३

म्हण आहे तिचा आधार घेऊन मी नाटक लिहिण्यास सुरवात केली. आणि त्याच दिवशीं लिहून झालेला पहिला प्रवेश घेऊन तालीम सुरू केली. नाटक लिहिणें आणि नाटक बसणें हीं दोन्हीं कामें एकाच वेळीं चाललीं होती....

......या नाटकांत देखाव्याबाबतची आजपर्यंतची जुनी पद्धति सोडून त्या वेळीं मुंबईत येत असलेल्या इंग्लिश आणि अमेरिकन कंपन्यांच्या नेपथ्य-रचनेच्या अनुकरणानें करायची असें ठरवून आर्टिस्ट श्री. पु. श्री. काळे कामाला लागले. पूर्वींच्या पडदे—विंगना बाद करण्यांत आलें आणि भिंती दर-वाजे खिडक्यांपासून मधली कमान आणि वरचें छत यांपर्यंत घरबांधणीच्या शिल्पाच्या अनुरोधानें भिंतीला रंगाचा अगदीं साधा लेप देऊन कोणतीहि कला-कुसरी न करतां हे देखावे करण्यांत आले.

......मुहूर्ताच्या पहिल्या प्रयोगाला फक्त आठ-दहा मंडळीच होती. बहु-तेक सर्व सुशिक्षित आणि विद्वान् लोक होते. प्रयोग झाल्यावर 'झाला एवढा खर्च पुरे झाला. हें नाटक एवढ्यावरच बंद करा. जास्त जबाबदारी सध्यांच्या परि-स्थितींत घेऊं नका ' असें या मित्र मंडळींनीं पेंढारकरांना (कंपनीचे मालक व मुख्य नट) सांगितलें. परंतु पेंढारकरांचा आत्मविश्वास जबर होता. सर्वसामान्य प्रेक्षक समोर असल्याखेरीज नाटकाची खरी कसोटी लागत नाहीं, याची त्यांना चांगलीच जाणीव होती. नाटक बसविण्याचें काम यामुळें अर्थात्‌च त्यांनीं जोमानें सुरू केलें. आणि त्यांच्या अपेक्षेप्रमाणें खरोखरचि पहिला प्रयोग इतका रंगला कीं तो पुरा व्हायला बरोबर पावणेसात तास लागले. दुसऱ्या प्रयोगाचे वेळीं एकाच दिवसांत पुढील पांच खेळांचे प्लॅन्स भरून गेले."

'सत्तेचे गुलाम' हा नाटकाचा पहिला प्रयोग ता. १५ जून १९२२ सालीं गुरुवारीं रात्रौ मुंबई मुक्कामीं 'बॉम्बे थिएटरां'त 'ललितकलादर्श नाटक मंडळी'नें करून दाखविला. हें नाटक गोष्टरूपानें पुढें दिलें आहे.

## सत्तेचे गुलाम : : नाटककार
## भार्गवराम विठ्ठल वरेरकर

" कायदेशीरपणाच्या पकडींत धरलं तर या वुइलच्या ठिकऱ्या ठिकऱ्या होतील. " केरोपंत वकील टेबलावर मूठ आपटीत म्हणाले.

" ठिकऱ्या होतील ना ? ठीक आहे मी म्हणतों हें वुइल खोटं आहे." हातांतील वुइलचे कागद वैतागानें केरोपंतापुढें टाकीत हेरंबराव उद्गारले.

केरोपंत : अहो मरतांना डॉक्टराची जितकी आवश्यकता असते तितकीच वकिलाचीहि असते हें ज्यांना कळत नाहीं त्यांच्या हातून अशाच चुका होत असतात. भाषा तरी किती चुकीची !

हेरंब : आहेना चुकीची भाषा ? मग मी ही केस पार प्रिव्ही कौन्सिलपर्यंत लढविणार !

हेरंबराव व केरोपंत त्या 'वुइल'बाबत जे एवढे अटीतटीनें बोलत होते त्याचें कारणहि तसेंच जबर होतें.

हेरंबरावाचे वडील श्रीमंत दादासाहेब तीर्थयात्रा करण्याच्या उद्देशानें प्रवास करीत असतां हरद्वार येथें अचानकपणें कॉलऱ्यानें वारले. त्यांच्यामागें त्यांच्या पस्तीस लाखाच्या प्रचंड इस्टेटीला तीन वारसदार होते—सदानंद, हेरंब व वैकुंठ. परंतु या त्यांच्या तिन्ही मुलांच्या तीन तऱ्हा होत्या. त्यांपैकीं सदानंद हा जो सर्वांत थोरला मुलगा तो वडिलांशीं भांडून घरांतून निघून गेला होता. त्यानें पसंत केलेली मुलगी दादासाहेबांना पसंत नव्हती म्हणून तो घरांतून निघून गेला असावा असें लोक म्हणत. पण तो कोठें गेला याचा कोणासच पत्ता नव्हता. तो परदेशांत निघून गेल्याच्याहि अफवा होत्या. मात्र तो गेल्यापासून दादासाहेब अत्यंत बेचैन झाले होते. कारण ही गोष्ट सोडली तर त्या बाप-लेकांत कधींच बेबनाव झाला नव्हता. सर्व मुलांत अत्यंत हुषार, प्रेमळ व समंजस असा तो असल्यानें दादासाहेबांचा त्याच्यावर भारीच जीव होता. याच्या अगदीं उलट दुसरा मुलगा हेरंब होता. लहानपणींच स्वारीनें शाळा

सोडून दिली होती. स्वभावानें तो अतिशय हेकट, संतापी व स्वार्थी असा होता. त्याचें लग्न झालेलें होतें. त्याच्या पत्नीचें नांव रमा. तिसरा मुलगा वैकुंठ हा दादासाहेबांच्या दुसऱ्या कुटुंबापासून झालेला मुलगा. हा एल्एल्. बी. झालेला असूनहि सनद न काढितां देशसेवेंत वेळ घालवी. महात्मा गांधींनीं जी असहकाराची चळवळ पुकारली होती त्यांत तो हिरीरीनें भाग घेत असे. सूतकताई व ग्रामोद्धार हे जे काँग्रेसचे त्या वेळचे मुख्य कार्यक्रम ते त्यानें आपलें मुख्य कर्तव्यक्षेत्र ठरविले होतें. दादासाहेबांनीं त्याच्या नांवावर एक मोठी शेतीवाडी करून दिली होती; तेथें त्याचे हे सर्व ग्रामोद्धाराचे प्रयोग चालत. या चौघांशिवाय त्या कुटुंबांत आणखी दोन माणसं होतीं—कान्होबा व नलिनी. कान्होबा हा दादासाहेबांचा पुतण्या. हा अगदीं भोळा-भाबडा, दुसऱ्याच्या बुद्धीनें चालणारा असा होता. त्याच्यावर त्याच्या हेरंब-दादाचा अतिशय पगडा होता. प्रत्येक लहानसहान बाबतींतहि ‘दादा वाक्यं प्रमाणम्।’ मानून तो वागत असे. त्यामुळें तो सर्वांच्या थट्टेचा विषय होई. नलिनी ही दादासाहेबांच्या एका परमप्रिय स्नेह्याची मुलगी. लहानपणींच ती पोरकी झाल्यामुळें दादासाहेबांनीं तिला स्वतःच्या मुलीप्रमाणें लेखून लहानाची मोठी केली. जात्याच हुषार असल्यामुळें तिनें शिक्षणांतहि चांगलीच प्रगति केली. ती अत्यंत भावनाप्रधान होती. देशांत चालू असलेल्या राजकीय चळवळीचा तिच्या मनावर फार परिणाम झाला होता. देशसेवेचें व्रत घेतलेल्या एकाद्या तरुणाशींच विवाह करण्याचा तिनें मनाशीं निश्चय केलेला होता. दादासाहेबांचे इस्टेटी-बाबतचे जे नेहमींचे सल्लागार वकील केरोपंत त्यांच्याकडे तिच्या मनाचा बराच कल या दृष्टीनें होता. कारण त्यांचीं वेळोवेळीं होणारीं व्याख्यानें, वर्तमानपत्रांतून होणारी स्तुती, लेख यांमुळें ते आपल्या मनांतील देशसेवकाच्या कसोटीस उतरतील असें तिला अलिकडे वाटूं लागलें होतें.

केरोपंत आज दादासाहेबांचें ‘ वुइल ’ म्हणजे मृत्युपत्र वाचण्याकरितां म्हणून हेरंबरावांकडे आले होते. आणि सर्व वारसदारांसमक्ष त्या मृत्युपत्राचें वाचन जेव्हां त्यांनीं केलें तेव्हां सर्वजणच आश्चर्यानें अगदीं थक्क झाले. या

मृत्युपत्राला उद्देशूनच प्रारंभीं लिहिलेले उद्गार केरोपंत व हेरंबराव यांच्या तोंडून बाहेर पडले. या मृत्युपत्रामध्यें सुरुवातीला दादासाहेबांनीं ही सर्व इस्टेट स्वकष्टानें कशी संपादन केली त्याची हकिगत दिली होती. या इस्टेटीची त्यांच्या पश्चात् कशी वांटणी व्हावी याचा तपशील दिला होता. तो असा— "माझा वडील मुलगा सदानंद सात वर्षांपूर्वी माझ्याशीं भांडून निघून गेला. त्याचा अजून पत्ता नाहीं. मी निष्कारण त्याच्यावर राग केला याचा आतां मला पश्चाताप होतो आहे. म्हणून खालील तपशिलाची माझी सर्व स्वसंपादित इस्टेट मी त्याला देत आहे. तो हयात नसल्यास ही इस्टेट त्याच्या मुलास मिळावी किंवा त्याचा मुलगा नसल्यास त्याच्या बायकोस मिळावी. यांपैकीं कोणीहि विद्यमान नसल्यास माझ्या परमप्रिय मित्राची कन्या नलिनी गोखले इजला सर्वस्वीं मिळावी. मात्र त्यांतील वीस हजार रुपये नलिनीनें माझा पुतण्या कान्होबा यास द्यावे. माझा तिसरा मुलगा चि. वैकुंठ याला या इस्टेटीचा एक्सिक्यूटर म्हणून मी नेमीत आहें." एका वैकुंठाखेरीज बाकीचे सर्वजण ह्या मृत्युपत्र वाचनानंतर पार हादरून गेले. नलिनी तर इतकी अस्वस्थ झाली कीं, तिला त्या मंडळींत बसणें अशक्य झालें. कांहींतरी निमित्त काढून ती आपली बहीण क्षमा हिच्याबरोबर बाहेर निघून गेली. हेरंब आणि त्याची बायको आतां आपल्यावर कशी आग पाखडतील याची तिला चांगलीच कल्पना होती. कारण मृत्युपत्राचें वाचन पुरें होतें न होतें तोंच त्या दोघांच्या तोफखान्याला सुरुवात झाली होती.

हेरंब : बाप नव्हे—प्रत्यक्ष कसाईच हा. आतां आम्ही काय करावें ?

रमा : म्हाताऱ्यानं मरतां मरतां दावा साधला ग बाई ! इतके दिवस थाटांत काढले—आतां या वयांत भीक मागत फिरायची पाळी आली. वैकुंठभावोजींना त्याचं कांहींच वाटत नाहीं.

परंतु रमावहिनींच्या या टोमणीचा वैकुंठावर कांहींच परिणाम झाला नाहीं. तो यावर किंचित् हंसला मात्र. त्यामुळें आगींत अगदीं तेल पडल्यासारखेंच झालें.

हेरंब : त्याला काय टोणप्याला ! हयात असतांनाच बाबांनीं तें एक शेत करून

दिलं आहेना त्याच्या नांवावर ? त्याला तेवढंच पुरेसं वाटतं. आतां मला काय तें तेवढं गिरगांवांतलं घरच राहणार.

केरोपंत : हें पहा हेरंबराव, रमावहिनी, असा त्रागा करण्यांत अर्थ नाहीं. हें मृत्युपत्र इतक्या बेकायदेशीर भाषेत लिहिलं आहे कीं—जाऊं द्या. बोलण्यांत काय अर्थ आहे ? तुमची इच्छा असल्यास उद्यांच्या उद्यां प्रोबेटचा अर्ज गुदरतों. पण मुख्य प्रश्न आहे—

हेरंब : अगदीं संकोच धरूं नका, स्पष्ट स्पष्टच काय तें होऊन जाऊं द्या.

केरोपंत : मुख्य प्रश्न खर्चाचा. सॉलिसिटरच्या हातांत केस द्यावी लागणार. खर्च काय लागेल याचा आतांच अंदाज करतां येणार नाहीं. हा कोर्टाचा खर्च—एवढंच ध्यानांत ठेवलें म्हणजे झालं.

हेरंब : खर्चाची अगदीं पर्वा करूं नका. कोर्टाच्या खर्चाकरितां दागदागिनेच काय पण जीव गहाण ठेवावा लागला तरी हरकत नाहीं. काय ग, असंच ना ?

रमा : हो हो ऽ ! अगदीं तस्संच ! बरं का वकीलभावोजी, माझे नाक कान उघडे पडले तरी चालतील, पण त्या मेल्यांचीं चांगलीं नाकं ठेंचा.

केरोपंत : शाबास वहिनी ! एवढी तुमची तयारी असल्यावर मग काय केस जिंकल्यासारखीच आहे.

हेरंब : आतां आमची लाज तुम्हालाच बरं केरोपंत ! काय वाटेल तें झालं तरी चालेल—झोळी घेऊन भीक मागेन दारोदार—पण केस जिंकली पाहिजे. अगदीं तुमच्या कसबाची कमाल करा. आजन्म तुमचा सत्तेचा गुलाम होऊन राहीन.

केरोपंत : छे ! छे :, असं बोलणं चांगलं नाहीं. किती झालं तरी तुम्ही वडील आहांत. येतों आतां, नमस्कार. तुम्ही अगदीं आतां काळजी करूं नका—अं !"

असें म्हणून केरोपंत त्या मृत्युपत्राचे कागद आपल्या कातडी बॅगमध्यें घालीत तेथून निघून गेले. केरोपंत गेल्यावर इतका वेळ गप्प बसलेला वैकुंठ हेरंबला म्हणाला, "दादा माझं ऐका. या कोर्टाच्या भानगडींत पडूं नका. पैशापरी पैसा जाईल, अब्रू जाईल, वेळ गमावेल आणि शेवटीं हातीं करवंटी

येऊन वकिलांच्या बँक-अकौंटची मात्र चारदोन पूज्यं वाढतील. मिळेना का इस्टेट नलिनीला ? किती झालं तरी ती आपलीच आहे. पिढीजाद घरोबा. तिला मिळाली तर आपल्या आपसांतच राहील. पण कोर्टाची पायरी चढाल तर दोन्हीं बाजूंनीं नुसतीं वकिलांचीं घरं भरायला कारणीभूत व्हाल.

हेरंब : हो, वकिलांचींच घरं भरायचीं आहेत मला ! नलिनीचं घर भरण्यापेक्षां वकिलांच्या घरांत सारी इस्टेट गेली तरी चालेल. त्यांत तुझ्या बापाचं काय खर्च होतं आहे ?

वैकुंठ : माझ्या बापाचीच इस्टेट खर्च होते आहे, म्हणून मी बोलतों आहें ! नलिनीला इस्टेट जावी अशी बाबांची इच्छा होती. वकिलांना कांहीं त्यांनीं इस्टेट बहाल केली नव्हती !

हेरंब : हें बघ आतां माझं डोकं फिरवूं नकोस.

वैकुंठ : डोकं ताळ्यावर ठेवलं म्हणजे फिरायची भीति नाहीं.

हेरंब : अरे गाढवा, आतां तोंड बंद करतोस कीं मारूं एक—

वैकुंठ : मारा, पण मी कांहीं कोर्टांत तुमच्याविरुद्ध मारामारीची केस करणार नाहीं !—

यानंतर हेरंबाचा राग अगदीं अनावर झाला. त्यानें टेबलावरील एक कांचेचा शंखाकार पेपरवेट उचलला व तिरिमिरींत तो वैकुंठाच्या डोक्यावर भिरकावला. तो गोळा वैकुंठाच्या कानशिलावर इतक्या जोरानें आदळला कीं तेथें एक मोठी थोरली खोक पडून तींतून भळाभळा रक्त वाहूं लागलें. त्याचा सर्व सदरा रक्तानें भिजून गेला. रमावहिनी तें दृश्य पाहून पार भेदरून गेली. परंतु हेरंबाच्या हृदयावर मात्र त्या दृश्याचा यत्किंचितहि परिणाम झाला नाहीं. तो रागानें इतका बेफाम झाला होता कीं, त्या तशा स्थितींतहि वैकुंठाला एक जोराची गचांडी देऊन त्यानें घराबाहेर काढिलें, व खाडकन् दार लावीत तो ओरडला, " यापुढं या घरांत पाऊल टाकलंस तर तंगडीच मोडून टाकीन ! "

वैकुंठाला हेरंबाच्या या आतताई स्वभावाची चांगलीच कल्पना होती. त्यामुळें हेरंबाच्या या सर्व कृतीचें त्याला विशेष आश्चर्य वाटलें नाहीं. तेथून

बाहेर पडल्यावर तो शांतपणें एका शेजारच्या नळावर गेला. त्यानें जखम स्वच्छ पुसून काढली व एका शेजाऱ्याच्या मदतीनें त्यानें त्या जखमेवर आपला हातरुमाल बांधिला. एवढें झाल्यावर 'आतां यापुढें कोठें जावें ?' असा प्रश्न मनाला विचारीत तो तेथें एक क्षणभरच उभा राहिला न राहिला तोंच दूर अंतरावरून त्याच्या कानावर पुढील शब्द पडले. "पोलिस—पोलिस—अहो, कुणीतरी या वेड्याच्या हातून मला सोडवा हो ?" वैकुंठ धांवतच त्या आवाजाच्या दिशेनें निघाला. पांचपंचवीस पावलें पुढें जातांच एक अत्यंत चमत्कारिक दृश्य त्याला दिसलें. गांवांतील प्रसिद्ध वकील श्री. मार्तंडराव मंगळमूर्ति हे एका तरुण विधवेचा हात घट्ट पकडून तिला कांहींतरी विचारीत होते. ती बाई भीतीनें पार घाबरून गेली होती. त्यांच्याजवळ पोहोंचतांच वैकुंठानें त्या अपरिचित स्त्रीस विचारिलें, "काय झालं बाई ?"

ती स्त्री : या वेड्याच्या हातूनं मला सोडवा. हे पहा मला जाऊं देत नाहींत.

वैकुंठ : ( उपहासानें ) अरे वा:, मार्तंडराव मंगलमूर्ति, हें काय ? सोडा ना तिचा हात. अहो बाई, हे वेडे नाहींत, हे वकील आहेत. वेड्या माणसाला सरकारांत वकिली करूं देतील, असं का तुम्हाला वाटतं ?

मार्तंड : ( धीर येऊन ) अहो, ती उगीच भ्याली. मी त्यांना नुसतं पुनर्विवाहाबाबत विचारीत होतों.

वैकुंठ : ( किंचित् खांदे उडवीत ) इथं ? भर रस्त्यांत ? तुम्हांला ओळखतात तरी का ह्या ?

मार्तंड : छे छे, म्हणूनच तर विचारतों आहें. पुनर्विवाह केला तरच बायको जगेल असं मला प्रत्यक्ष गुर्जर ज्योतिषांनीं सांगितलं आहे.

वैकुंठ : मग काय बाई ? तुम्ही पुनर्विवाहाला तयार नाहीं ना ? झालं. मार्तंडराव चला आतां. रस्ता सुधारा—नाहीं तर—"

वैकुंठाच्या बाह्या सांवरण्याच्या आविर्भावावरून मार्तंडरावाला पुढल्या प्रकरणाची चांगलीच कल्पना आली. त्यानें चटकन् तेथून काढता पाय घेतला. तो गेल्यावर त्या अपरिचित स्त्रीबद्दल पुढील माहिती वैकुंठाला तिच्या तोंडून

कळली. ती एक गरीब ब्राह्मण विधवा होती. चरितार्थाकरितां तिला परिचारिकेचा ( नर्सचा ) व्यवसाय पत्करावा लागला होता. कामाठीपुऱ्यांतील एका चाळींत अगदीं थोडक्या भाड्यांत मिळालेल्या खोलींत ती राहात असे. तेथून ती रोज प्रिन्सेस स्ट्रीटवर असलेल्या एका क्षयरोग्यांच्या हॉस्पिटलमध्यें पायीं येई. आज ती कामावर जात असतां गर्दींत गोंधळून वाट चुकली होती. वाटेंत भेटलेल्या मार्तंडरावाला तिनें हॉस्पिटलकडे जाण्याचा मार्ग कोणता असें सहज विचारिलें. परंतु त्यानें तिच्या प्रश्नाला सरळ उत्तर न देतां इतर फाजील चवकशाच सुरू केल्या व शेवटीं तर अतिप्रसंगच करण्याचा घाट घातला. परंतु वैकुंठ वेळींच आल्यामुळें ती बिचारी थोडक्यांत बचावली. ही हकिगत ऐकून घेतल्यावर वैकुंठ तिला म्हणाला,

"हें पहा रेवावहिनी—"

स्त्री : माझं नांव कसं कळलं तुम्हाला ?

वैकुंठ : आतांच तुम्ही सांगितलं नव्हे का ? नाहीं ? नसेल. सहज तोंडाला आलं तेंच बरोबर ठरलं का ?

स्त्री : तुमचं नांव वैकुंठराव आहे ना !

वैकुंठ : माझंहि नांव कळलं का तुम्हांला ? कुणी सांगितलं ?

स्त्री : त्या दिवशीं आपलं व्याख्यान ऐकलं तेव्हां कळलं.

वैकुंठ : अस्सं !—बरं पण तें जाऊं द्या. हें पहा रेवाताई, मी तुमची एका चांगल्या ठिकाणीं रहाण्याची सोय करतों. माझी नलिनी नांवाची एक आप्त स्त्री आहे. तिला एक कंपॅनियन पाहिजे आहे. बघा तुम्ही तिच्याकडे रहायला तयार असाल तर—"

आणि तिनें होकार दर्शवितांच वैकुंठानें तावडतोब समोरून जाणाऱ्या एका व्हिक्टोरियावाल्याला खुणविलें व तो त्या अपरिचित स्त्रीला घेऊन तडक नलिनीकडे निघाला. गाडींत तीं दोघेंहि एकमेकांशीं कांहींच बोललीं नाहींत. परंतु या अबोल्यामुळें व एकमेकांची दृष्टि चुकवून परस्परांकडे पाहाण्याची त्यांची

लागलेली चुरस यावरून तीं दोघेंहि एकमेकांपासून कांहीं तरी लपविण्याच्या प्रयत्नांत आहेत हें बारीक नजरेनें पाहाणाऱ्याच्या चटकन् ध्यानांत येण्यासारखें होतें!

× × ×

दिवसेंदिवस केरोपंत वकील नलिनीच्या मनांत अधिकाधिकच भरत चालले होते. त्यांचें रूप, त्यांची बुद्धिमत्ता, त्यांचें वाक्चातुर्य, देशांतील राजकीय घडामोडींत असणारें त्यांचें महत्त्वाचें अंग—या साऱ्या गोष्टींमुळें नलिनीसारख्या तरुण, अननुभवी व भावनाप्रधान तरुण मुलीवर त्यांची छाप न पडली तरच नवल! केरोपंतालाहि ह्या गोष्टीची पूर्ण कल्पना होती. आणि म्हणूनच एके दिवशीं नलिनीला एकान्तांत गांठून त्यानें तिच्याजवळ लग्नाचा प्रश्न काढिलाहि होता. परंतु "देशासाठीं कांहींतरी अचाट साहस तुमच्या हातून झालेलं प्रत्यक्ष पाहिल्याशिवाय माझ्या पाणिग्रहणाची याचना करूं नका" असें करारी उत्तर देऊन नलिनीनें त्याची निराशा केली होती. याचा अर्थ नलिनीचें केरोपंतावर प्रेम नव्हतें असा नव्हे; तिला फक्त त्या प्रेमाला कांहीं तरी उच्च त्यागाची बैठक केरोपंताकडून निर्माण व्हावयास हवी होती आणि एकटा वैकुंठ सोडला तर बाकी साऱ्यांची खात्री होती कीं एक दिवस केरोपंत नलिनीची ही अवघड अटहि पुरी करून तिचें पाणिग्रहण करणारच. वैकुंठाला मात्र केरो-पंताच्या देशभक्तीबद्दल काडीचाहि आदर नव्हता. त्याच्या मतें केरोपंत केवळ व्याख्यानबाजापलिकडे कांहींहि देशसेवा करीत नव्हता. आणि हें त्याचें स्वतःचें मत त्यानें केरोपंताला त्याच्या तोंडावरहि एकदां सांगितलें होतें. तो म्हणाला, "केरोपंत, प्रॅक्टिस वाढवण्यासाठीं देशभक्तीचीं कायम ठशाचीं व्याख्यानं देणाऱ्या वकिलाच्या तोंडचा 'देशसेवा' हा शब्दसुद्धां मला कर्णकटु लागतो. नुसत्या व्याख्यानांनीं जर देशाची दशा नाहींशी करतां येईल तर ग्रामाफोनच्या फिरत्या तबकडीनं सुद्धां देशाचा उद्धार होईल. प्रत्येक गांवांत व्याख्यानं भरलेला एक एक ग्रामाफोन ठेवला कीं झाला देशाचा उद्धार!"

प्रत्यक्ष विवाह करण्याला जरी नलिनीचा विरोध होता तरी दिवसेंदिवस तिच्या मनावर केरोपंताच्या व्यक्तिमत्वाचा अधिकाधिक पगडा बसत चाललेला

होता. त्यांतून ह्या अचानक मिळालेल्या इस्टेटीमुळें तर तिला ठायीं ठायीं केरो-पंताची मदत घ्यावी लागत असल्यानें व तोहि ती अत्यंत मोकळेपणानें देत असल्यानें त्याच्याबद्दलची तिची आदरभावना दिवसेंदिवस वाढतच चालली होती. आणि या आदरभावनेवर कळस चढविणारी अशी एक घटनाहि तेवढ्यांत घडून आली. नलिनी, वैकुंठ वगैरेंशीं इस्टेटीबाबतच्या कांहीं मुद्यांबाबत केरोपंत आपल्या वरीं चर्चा करीत बसले असतांना अचानकपणें एक पोलिस ऑफिसर व कांहीं शिपाई येऊन त्यांनीं त्याला, " रस्त्यांत लोकांचा जमाव जमवून सार्व-जनिक शांततेचा भंग करण्याच्या आरोपावरून सरकारी हुकुमान्वयें" अटक केली. राष्ट्रीय चळवळीचा—असहकारितेचा तो काळ असल्यामुळें लोकांना या असल्या गोष्टींचा तावडतोब सुगावा लागे. वाऱ्यासारखी ती बातमी चोंहोंकडे पसरली. हजारों लोक केरोपंताच्या घरासमोर जमून पोलिस अधिकाऱ्यांचा निषेध व केरोपंताचा जयजयकार स्वयंस्फूर्तीनें करूं लागले. केरोपंत मात्र या साऱ्या गडबडींत एखाद्या धीरगंभीर पुरुषोत्तमाची भूमिका पत्करून लोकांना शांत राहाण्याचा उपदेश करीत होता. या साऱ्या घटनेचा नलिनीच्या भावनाप्रधान मनावर फारच खोल असा ठसा उमटला. केरोपंताबद्दल तिच्या मनांत आधींपासूनच वसत असलेल्या आदराच्या भावनेनें त्या दिवशीं अगदीं परिसीमा गांठिली. वैकुंठावर मात्र या घटनेचा काडी-मात्रहि परिणाम झाला नाहीं. त्या तशा गडबडींतहि शांतपणानें त्यानें पोलिस अधिकाऱ्यांना ' वॉरंट ' कोठें आहे म्हणून विचारिलें. परंतु पोलिस अधिकाऱ्यांनीं उडवाउडवीचीं उत्तरें देऊन त्याला गप्प करण्याचा प्रयत्न केला. केरोपंतानें तर " आतां वॉरंट पहाण्याचं कारण नाहीं. चला मला घेऊन वाटेल तिकडे " असें म्हणून वॉरंटाबाबतची आपली बेपर्वाई दर्शविली. केरोपंतासारखा वकील वॉरंटा-बाबतच्या महत्त्वाच्या मुद्याची उपेक्षा करितो हें पाहून वैकुंठ अगदीं आश्चर्यचकितच झाला. ह्या साऱ्या बनावाकडे तो अगदीं संशयी मुद्रेनें पाहूं लागला. नलिनीलाहि केरोपंताची वॉरंटाबाबतची उपेक्षा वृत्ति जराशी चमत्कारिकच वाटली. परंतु केरो-पंताबाबतची तिची आदराची भावना त्यावेळीं इतकी उचंबळून आली होती कीं, तिच्यांत ही किरकोळ गोष्ट केव्हांच कोठल्या कोठें विरून गेली !

कोर्टांत गुदरलेल्या इस्टेटीबाबतच्या दाव्यांतील वाढत्या वादविवादा-बरोबरच एकीकडे हेरंबरावाच्या संपत्तीला झपाट्यानें उतार लागला होता. त्यानें मार्तंडरावाला आपला वकील म्हणून नेमिलें होतें. तो आगाऊ पैसे मिळाल्या-खेरीज एक पाऊलहि उचलावयाला तयार नसे. या त्याच्या 'फियां'पायीं हेरंब-रावाची स्थिति इतकी खालावली कीं, एके काळीं 'रोल्सराईस' शिवाय एक फर्लांग-भरहि जावयास तयार नसलेला हेरंबराव आतां वैकुंठाच्या मळ्यापासून चार मैलांवर असलेल्या कोर्टांत पायींच रखडत जात असे. स्वतःच्या चरितार्थाकरितां त्याला गिरगांवांतील त्याचें घर भाड्यानें द्यावें लागलें होतें. नलिनीनें स्वतःच्या घरीं राहाण्यास त्याला नकार दिल्यामुळें नाक मुठींत धरून त्याला वैकुंठाच्या मळ्यांतील घरीं राहावयास जाणें भाग पडलें होतें! वकिलांच्या 'फियां'पायीं स्वतःच्या पत्नीचे दागिने व त्याचा भोळसट भाऊ कान्होबा याच्याजवळचें सोनें-नाणेंहि त्यानें हिरावून घेतलें होतें. आणि शेवटीं तर गिरगांवातलं आपलें घर गहाण टाकून—आणि तेंहि नलिनीकडे!—त्याला पैसे उभे करावे लागले होते. परंतु इतकी दशा होऊनहि त्याचे डोळे उघडण्याचें किंवा त्याच्या नलिनीबाबतच्या द्वेषभावनेंत कांहीं उतार पडण्याचें यत्किंचितहि लक्षण दिसत नव्हतें. उलट दिवसेंदिवस त्याच्या उपद्व्यापांना भरच येत चालला होता. मात्र दरवेळीं त्यांत स्वारी गोत्यांतच येई! उदाहरणार्थ एके दिवशीं त्यानें आपला भोळसट भाऊ कान्होबा याच्या डोक्यांत नलिनीची बहिण क्षमा हिच्याशीं लग्न करण्याची कल्पना भरवून दिली. अर्थात् यांतील अंतस्थ हेतु अगदीं उघड होता. परंतु ही त्या दोघांतच राहाव-याची गोष्ट कान्होबानें भोळसटपणानें खुशाल क्षमेला सांगून टाकिली. म्हणजे त्याचें असें झालें कीं—कान्होबानें क्षमेला एकान्तांत गांठून जेव्हां मागणी घातली तेव्हां क्षमेनें त्याला निक्षून सांगितलें, "प्राण गेला तरी मी तुमच्याशीं लग्न कर-णार नाहीं!" त्यावर कान्होबा तितक्याच निश्चयानें म्हणाला, "प्राण गेला तरी मी तुझ्याशीं लग्न केल्याशिवाय राहणार नाहीं. दादा काय म्हणतील?"

क्षमा : पण माझ्याशींच लग्न करायचा दादांचा तुम्हांला एवढा तगादा कां?"

कान्होबा : दादा म्हणतात कीं, तुझ्याशीं लग्न केलं कीं तेवढाच आमचा जुन्या

घरांत शिरकाव होईल. तूं आमच्या घरची झालीस, कीं नलिनीवर तेवढीच छाप टाकतां येईल. आम्ही आतां अपील केलं आहे ना ? अव्वल निकाल कसाहि झाला तरी हायकोर्टांत केस आमच्या बाजूची होणार, असं केरोपंतांनीं दादांना सांगितलं आहे.

क्षमा : म्हणजे ? केरोपंत तुमच्या बाजूनं देखील वकील आहेत कीं काय ?

कान्होबा : तसं वकीलपत्र कांहीं त्यांनीं घेतलं नाहीं. पण आंतून ते खाजगी सल्ला देतात. आतां केस चालणार आहे सॉलिसिटरमार्फत. हे माझे वीस हजार रुपये मिळणार आहेत ना ? त्यांतून चालणार आहे केसचा खर्च.

क्षमा : केसलाच जर सारे पैसे खर्च झाले, तर माझ्याशीं लग्न करून तुमचं पुढं कसं चालणार ?

कान्होबा : तें मला कबूल आहे. पण दादांनींच तसं सांगितलं आहे ना ?

क्षमेनें अर्थातच ही सारी हकिगत नलिनीच्या कानावर घातली. नलिनीला तें ऐकून फारच आश्चर्य वाटलें. परंतु नुकत्याच सुटून आलेल्या केरोपंताला या बाबतींत स्पष्टपणें खुलासा विचारण्याचें धैर्य मात्र तिला बिलकुल झालें नाहीं. मात्र केरोपंताबाबतच्या एका विशिष्ट गोष्टीमुळें ती अलिकडे बरीच बैचेन झालेली होती. आणि ती गोष्ट म्हणजे तिच्या येथें आश्रयार्थ आलेली नर्स रेवा हिच्याशीं सलगी करण्याचा चाललेला केरोपंताचा प्रयत्न. परंतु त्याहि बाबतींत निश्चित आरोप करण्यासारखा कांहींच पुरावा तिच्या हातीं नव्हता. म्हणून सध्यां तरी तिनें या दोन्ही बाबतींत डोळ्यावर कांतडें ओढून गप्प राहाण्याचेंच धोरण स्वीकारलें होतें. कारण व्यावहारिक दृष्ट्या यांतच तिचा फायदा होता. केरोपंतांच्या उपद्व्यापांमुळें हेरंब इतका डबघाईला आला कीं, शेवटीं पैशाच्या अभावीं त्याला कोर्टातला दावा अर्धवट टाकणें भाग पडलें होतें; एवढेंच नव्हे तर तो त्या धक्क्यानें भ्रमिष्टासारखा होऊन वाटेल तिकडे भटकूं लागला होता. त्याच्यावर अवलंबून असलेला त्याचा भोळसट भाऊ कान्होबा व पत्नी रमा हीं दोघेंहि अगतिक होऊन वैकुंठाकडे आश्रयार्थ गेल्याचें वृत्त तिनें ऐकिलें होतें. परंतु सात्त्विक वृत्तीच्या नलिनीच्या मनांत 'ह्या साऱ्या अनर्थाला पैशानें आप-

णच जबाबदार आहेत ' असा विचार, ती वार्ता ऐकल्यामुळें येऊन ती बरीच अस्वस्थ झाल्यावांचून राहिली नाहीं. अशा चमत्कारिक मनःस्थितींत ती असतांना तिची जणुं कसोटी पाहाणाराच एक प्रसंग उद्भवला. तिच्या मनाची फारशी अनुकूलता नसतांनाहि केवळ केरोपंताच्या आग्रहामुळें चेंबूरला स्वतःचें म्हणून जें शेत वैकुंठ वापरीत होता त्याचा कबजा घेण्याकरितां ती तेथें गेली होती. जवळ जवळ चारशें माणसें त्या शेतावर उपजीविका करीत असलेलीं तिला तेथें आढळलीं. त्या साऱ्या लोकांना वैकुंठाच्या हातून तें शेत जाणार असें कळतांच त्यांच्यांत एकच खळबळ उडाली. वैकुंठावर त्या साऱ्यांची एवढी भक्ति होती कीं, त्याच्या पश्चात् त्या शेतावर मजुरी करायला त्यांपैकीं एकहि मनुष्य तयार नव्हता. नलिनीच्या मनावर या गोष्टीचा फारच परिणाम झाला. तिनं त्यांपैकीं एका शेतकऱ्याला बाजूला घेऊन त्यांची या विरोधामागील भूमिका समजावून घेण्याचा प्रयत्न केला. त्यानें आपल्या अडाणी शब्दप्रयोगांनिशीं परंतु अत्यंत सरळ मनानें जी हकिगत सांगितली तिचा आशय पुढीलप्रमाणें होता. तो म्हणाला, " आम्ही पूर्वी कोंकणांत होतों. वर्षांतले चार महिने आम्ही शेतांत खपत होतों. त्यांतल्या उत्पन्नांतून सरकारचा कर आणि सावकाराचं देणं देऊन बाकीच्या धान्यांत आमचे दोन महिने देखील जात नव्हते. गवताची भाजी, फणसाच्या कुऱ्या किंवा चारखंडांचीं तळखंडं उकडून अळणीच खाऊन आम्ही दहा महिने पोट भरीत होतों मिठालासुद्धां एक पैसा आमच्याकडे नसे. म्हणून गिरणींत आलों. तिथल्या कामाच्या राबत्यानं आणि चाळीच्या हवेनं आम्ही मरायला टेकलों. पैसे मिळत होते पण पोरंबाळं मरत होतीं. त्या सत्तेच्या गुलामगिरींतून सोडवून वैकुंठरावांनीं आम्हांला या शेतावर आणलं. इथं चार महिने आम्ही शेतावर राबतों आणि बाकीचे आठ महिने चरक्यावर सूत काढतों. ज्या आम्हांला मिठासाठीं एक पैसा मिळत नसे, त्याच आम्हांला आतां दररोज सुताबद्दल तीन आणे मिळतात. तीन आण्यांची किंमत तुम्हांला शहरांत राहून कळायची नाहीं. आमच्यासारखे दरिद्री व्हाल तेव्हांच ती तुम्हांला खरी खरी जाणवेल.

शेतकऱ्याचें तें भाषण ऐकून नलिनीच्या मनाला केरोपंत, मार्तंडराव वकील यांसारखे क्रियाशून्य वक्ते व वैकुंठासारखे विधायक कार्यकर्ते यांच्यामधील भेद क्षणार्धांत उमगला. ज्ञानकिरणाचा एकादा नवीनच स्रोत अंतर्मनावर पडून त्यानें तेथील अज्ञानपटल दूर केलें कीं, चित्ताला जो एक प्रकारचा सात्त्विक आनंद होतो तो तिला त्या वेळीं लाभला होता. ती अशा या आनंदमय आणि कांहींशा उत्साही मनःस्थितींत असतांनाच शेताची पहाणी व कबजा यांबाबतच्या कायदेशीर बाजूची चर्चा करावयास म्हणून जरा बाजूला गेलेली केरोपंत, मार्तंडराव, वैकुंठ वगैरे मंडळी तेथें येऊन पोहोंचली. केरोपंताला नलिनीसारख्या विद्याविभूषित व उच्चवर्णीय श्रीमंत मुलीनें एका सामान्य शेतकऱ्याशीं इतका वेळ गोष्टी करीत बसावें हें फारसें आवडलें नसावें.

केरोपंत : नलिनी, हा विषय आतां पुरे झाला. आतां आपण ज्या कामाकरितां आलों आहोंत, त्याचा विचार आधीं करूं. वैकुंठराव, हें शेत बाबासाहेबांच्या मालकीचं आहे. बाबासाहेबांची इस्टेट त्यांच्या वुईलान्वयें नलिनीला मिळाली आहे. तुमचा विरोध यावा अशी आमची इच्छा नाहीं. कोर्टांत गेल्याशिवाय हें शेत तुम्ही आमच्या स्वाधीन करायला तयार आहांत का ?

वैकुंठ : वुइल करण्यापूर्वीं हें शेत बाबांनीं माझ्या नांवें करून दिलं आहे. हें शेत माझं आहे. कोर्टाची पायरी चढण्याचा मला पूर्ण तिटकारा आहे. वादी प्रतिवादी या नात्यानं नलिनीसमोर उभं राहण्याचा प्रसंग टळावा आणि या शेताच्या किंमतीच्या दुप्पट रक्कम तुम्हां वकील—सॉलिसिटरांच्या वशांत न जावी म्हणून मी या शेताचं दानपत्र करून देण्यास तयार आहें.

नलिनी : वैकुंठरावांच्या मालकीची इस्टेट हिरावून घेण्याची माझी इच्छा नाहीं.

केरोपंत : नलिनी, हें तूंच बोलतेस काय ?

मार्तंड : म्हणजे शेवटीं आम्हींच गाढव ठरलों म्हणायचे !

नलिनी : वा: ! किती मार्मिक बोललांत !

केरोपंत : बस्स झालं. चांगली आमची शोभा केलीत. चला आतां मुंबईला परत.

नलिनी : मी येत नाहीं. मला हें शेत पाहायचं आहे, कुळवनांमरची पाहायची

आहे. चरके, माग चालवून घ्यायचे आहेत. या कुणब्यांच्या झोंपड्या, त्यांचीं मुलंबाळं, त्यांचीं हंडीं—मडकीं मला पाहायचीं आहेत. या गरिबांच्या घरची कोंड्याची भाकर मलाहि पचवतां येते कीं नाहीं याचा एकदां अनुभव घ्यायचा आहे. खताच्या टोपल्या आणि चिखलशेणाचे गोळे उचलतांना काय श्रम होतात याचाहि मला एकदां प्रत्यय घ्यायचा आहे. श्रीमंतीला लाथाडण्यासाठीं गुडघाभर पाय आणि कोपरभर हात चिखलांत घोळून मातृभूमीच्या स्पर्श-सुखाचा मला अनुभव घ्यायचा आहे. जा."

× × ×

मोटारींतून परत जात असतां मार्तंडरावानें दोन—तीनदां केरोपंताशीं बोलण्याचा प्रयत्न केला. परंतु नलिनीनें केलेल्या अपमानामुळें तो इतका विमनस्क झाला होता कीं, त्याचें मार्तंडरावाच्या बोलण्याकडे बिलकुल लक्षच लागेना. मार्तंडराव त्यामुळें हिरमुसला होऊन विरुद्ध दिशेला तोंड करून बसला. त्याची ही होत असलेली कुचंबणा कांहीं वेळानें केरोपंताच्याहि लक्षांत आली. कांहीं तरी विचारायचें म्हणून तो मार्तंडरावाला म्हणाला,

केरोपंत : मार्तंडराव, तुम्हाला एकच मुलगी आहे नाहीं ?

मार्तंडराव : मुलगी ? अहो बायको जगेल तेव्हां ना मुलगी असायची. अहो आठ लग्नं झालीं आतांपर्यंत. पण वावटळींतल्या पाचोळ्यासारख्या बायका पटापट उधळून मरताहेत. तें कांहीं नाहीं, आतां त्या गुर्जर ज्योतिषानें सांगितलेला उपाय योजून पाहाणार आहें.

केरोपंत : तो कोणता ?

मार्तंडराव . पुनर्विवाह करण्याचा !

केरोपंत : अस्सं ? मग सांपडली कीं नाहीं एखादी विधवा ?

मार्तंडराव : सांपडली हो. परंतु लग्नाला कबूल होईना. म्हटलं तिच्या वडील-माणसांचा तपास करून त्यांकरवीं तिचं मन वळवावं. तपास सुरू केला. पत्ता लागला. पण एक करतांना एक झालं. ती विधवा कोण निघाली असें तुम्हांला वाटतं ?

केरोपंत : नाहीं बुवा कांहीं तर्क चालत !

मार्तंडराव : नाहींच चालायचा ! अहो ती तुमच्या सदानंदाची बायको निघाली.

केरोपंत : सदानंदाची बायको ? काय म्हणता काय आणि ती सध्यां आहे तरी कोठें ?

मार्तंडराव : अहो नलिनीकडची ती विधवा नर्स म्हणजे सदानंदाची बायको !

केरोपंत : अस्सं !

मार्तंडराव : म्हणजे आतां सारी इस्टेट तिच्याकडे जाऊन नलिनीचा नक्षा चांगलाच उतरणार !

केरोपंत : आणि तो मी पूर्ण उतरविण्याकरितां— ! बाकी तें असो ... येतो आतां. मार्तंडराव आलेंच आमचें हें घर." असें म्हणत केरोपंत घाईघाईनें मोटारींतून उतरून आपल्या घरांत शिरले.

× × ×

नलिनीला चेंबूरचें शेत इतकें आवडलें कीं, तिथेंच ती दोन-तीन दिवस राहिली. वैकुंठाबरोबर हिंडून त्यानें तेथें आरंभिलेल्या व्यापक व विधायक कार्याचें बारकाईनें निरीक्षण केलें. तिसऱ्या दिवशीं ती घरीं जावयास निघाली. तेव्हां वैकुंठानें स्वतः कातलेल्या सुताची एक साडी तिला अर्पण केली. रात्र बरीच झाली होती म्हणून वैकुंठ तिला पोहोंचवायला बरोबर आला होता. तीं दोघं जेव्हां घरीं येऊन पोहोंचलीं तेव्हां नलिनीच्या खोलींतून कोणाचें तरी बोलणें चाललेलें त्यांना ऐकूं आलें. त्यांनीं जरा कान देऊन ऐकलें तेव्हां तो आवाज केरोपंताचाच आहे हें त्यांच्या लक्षांत यावयास वेळ लागला नाहीं. केरोपंत रमाला कांहीं तरी आर्जवून सांगत असल्याचें अस्पष्टपणें ऐकूं येत होतें. त्या दोघांनीं जरा पुढें होऊन दाराला कान लाविला. त्यांच्या कानावर पुढील संभाषण पडलें :

केरोपंत : रेवाबाई, तुम्ही अगदीं अनाथ आहांत. तुम्हाला जवळचं असं कुणीच नाहीं का ?

रेवा : या वेळीं तरी कुणी नाहीं.

केरोपंत : अशा स्थितींत तुम्ही किती दिवस काढूं शकाल ? नलिनीचं लग्न होतांच कदाचित् तुम्हाला हें घर सोडावं लागेल.

रेवा : नलिनी मला अंतर देणार नाहीं. आतां तुमचंच मत काय तें राहिलं आहे.

केरोपंत : नलिनीचं लग्न माझ्याशींच होईल, अशी तुमची खात्री आहे का ?

रेवा : आतां खात्री ती कसली ? लग्न केव्हां व्हायचं एवढंच काय तें ठरायचं राहिलं आहे.

केरोपंत : नलिनीशीं माझं लग्न लागलं नाहीं, तर—

रेवा : भलतंच कांहीं तरी काय बोलताय !

केरोपंत : भलतंच नाहीं, अगदीं खरं बोलतोंय. परवां नलिनीनें केलेला माझा अपमान आठवला म्हणजे अजून कसा अंगाचा संताप होतो !

रेवा : तिचा स्वभाव जरा अल्लड आहे. दया करा एकदां तिच्यावर.

केरोपंत : तिच्यावर दया करण्याऐवजीं तुझ्यासारख्या एखाद्या अनाथ विधवेवर—

रेवा : म्हणजे ?

केरोपंत : याहून अधिक स्पष्ट सांगण्याची आवश्यकता आहे काय ?

रेवा : किती उलटच्या काळजाचे आहांत तुम्ही ! आतां जर नलिनी येथें असती—

केरोपंत : तर तिला अशी लाथ मारून झुगारून दिली असती !

नलिनीला तें संभाषण अधिक ऐकणें आतां अगदीं अशक्य झालें. धाडकन् दरवाजा लोटून ती आंत घुसली; केरोपंतापुढें जाऊन उभी राहिली व म्हणाली "गाजवा पाहूं तो पराक्रम !"

नलिनीला व वैकुंठाला अचानकपणें तिथें आलेलीं पाहातांच केरोपंताचें सारेंच अवसान एकदम गळालें !

वैकुंठ : देशाच्या उद्धाराबरोबरच विधवांचाहि उद्धार करण्याचं काम आतां हातीं घेतलें आहेत वाटतं केरोपंत ?

नलिनी : आणि त्यांत देखील त्यांचे कांहींतरी वकिली डावपेंच असतीलच !

वैकुंठ : आहेत तर ! या विधवेच्या वैधव्याचा उद्धार करण्याऐवजीं तिच्या संप-

त्तीनें स्वतःचाच उद्धार करण्याचा त्यांचा डाव आहे !

नलिनी : पण हिच्याजवळ कुठली आली आहे संपत्ति ?

वैकुंठ : अग हिच्या संपत्तीची बातमी ह्या कोल्ह्याला लागली म्हणून तर तो येथें गोंडा घोळत आला आहे. नलिनी, तूं ह्या बाईंना अजून ओळखलं जरी नसलंस तरी या वकिल महाशयांना केव्हांच त्याचा पत्ता लागलाय !

नलिनी : म्हणजे या आहेत तरी कोण ?

वैकुंठ : अग ही रेवा, म्हणजे माझी वहिनी—सदानंदाची बायको.

रेवा : भाऊजी, तुम्हीं मला कसं ओळखलंत ?

वैकुंठ : सदानंददादाचा आणि माझा पत्रव्यवहार सुरू होता. रंगूनला तुमचं लग्न रजिस्टर झालं, त्या वेळीं घेतलेल्या फोटोची एक प्रत त्यानें त्याच वेळीं माझ्याकडे पाठविली होती. तिच्या आधारें मी तुम्हाला केव्हांच ओळखलं आहे—म्हणजे त्या दिवशीं बगीतच !

रेवा : खरंच ? खरेच आहांत कीं भाऊजी !

नलिनी : आणि तुम्ही काय कमी आहांत वहिनी ?

वैकुंठ : वहिनी कसल्या, वन्सं म्हण !

रेवा : म्हणजे ऽ ऽ ?

नलिनी : इश्श ! यांचं आपलं कांहीं तरीच !

रेवा : पण इतके दिवस तर ही या केरो महादेव वकीलांच्या सत्तेच्या गुलामींत होती ना ?

वैकुंठ : पण आतां यापुढें वकिलाच्या सत्तेची गुलाम होण्याऐवजीं चेंबूरच्या एका रांगड्या शेतकऱ्याच्या सत्तेचा गुलाम होण्याचें तिनें ठरवलें आहे ! खरं कीं नाहीं नलिनी ?

नलिनी : अहं ! एका गुलामाच्या सत्तेंत जाण्याचें ठरवलें आहे असं म्हणा !



## प्रकरण....९ वें

★ ★

देवलाचें ' शारदा ' व त्यानंतरचीं श्री. कृ. कोल्हटकरांचीं सामाजिक नाटकें हीं त्यांतील स्वतंत्र कथानक, मार्मिक विनोद, आकर्षक चाली व त्यांतील सामाजिक विचार या वैशिष्ट्यांमुळें कमालीचीं लोकप्रिय झालीं. त्यांच्या वाढत्या कीर्तीबरोबर पौराणिक नाटकांच्या लोकप्रियतेला ओहोटी लागण्याचीं चिन्हें दिसूं लागलीं. त्यांच्या तोडीस तोड असें कांहींतरी वैशिष्ट्य आणिल्याखेरीज पौराणिक नाटकांचा निभाव लागणें शक्य नव्हतें. हें अवघड कार्य कृ. प्र. खाडिलकर यांनीं केलें. पौराणिक कथानक चालू राजकीय परिस्थितीला लागू पडेल असें लिहिण्याचें अभिनव कौशल्य त्यांनीं आपल्या ' कीचकवध ' या नाटकांद्वारें दाखवून दिलें. हा नवा प्रयत्न तत्कालीन होतकरू नाटककारांना मोह पाडील असाच होता; परंतु तो तितकाच धोक्याचाहि आहे हें अवघ्या दोन-तीन वर्षांतच तें नाटक जप्त होतांच लोकांच्या ध्यानांत आलें. त्यामुळें त्या वेळीं तरी खाडिलकरांच्या या प्रयत्नाचें कोणी फारसें अनुकरण केलेलें दिसत नाहीं. परंतु संविधानक-रचनेंतील कौशल्य, मार्मिक संवाद, नाविन्यपूर्ण विनोद, भक्तिरस परिपोषक असें वातावरण वगैरे गुणांच्या भांडवलावर त्याहि काळीं केवळ पौराणिक नाटकें लिहून कांहीं नाटककार, खाडिलकरांच्या नाटकांइतके जरी नाहीं तरी बऱ्याच मोठ्या प्रमाणांत यशस्वी होऊं शकले होते. उदाहरणार्थ ' कुंजविहारी ' ( १९०८ ), व 'संजीवनी', ( १९१० ) लिहिणारे भा. वि. वरेरकर, ' संत सखूबाई ' व ' सती पिंगला ' ( १९११ ) लिहिणारे ह. ना. आपटे, ' संगीत श्रीमती ' ( १९०९ ) कर्ते द्वा. वि. नेवाळकर, संगीत ' गोपीचंद ' कर्ते अ. वा. बर्वे, ' संत तुकाराम ' कर्ते तिनईकर व बढावकर, या मंडळींचीं नाटकें केवळ पौराणिक असूनहि त्यांना मिळत असलेलें यश पाहून कित्येक होतकरू नाटककार, पदरीं भरपूर कल्पकता व सामाजिक दोष पाहूं शकणारा मार्मिक दृष्टिकोन असूनहि ' कीचकवधा'प्रमाणें राजकीय रूपकात्मक नाटकें वा कोल्हटकरांच्या पद्धतीचीं स्वतंत्र सामाजिक नाटकें न लिहितां केवळ पौराणिक

श्री. माधव नारायण जोशी



जन्म : १८८५

कथाभागावर आधारलेलीं नाटकें लिहून नाट्यक्षेत्रांत यश मिळवूं पाहात होते. श्री. माधव नारायण ऊर्फ माधवराव जोशी हे अशांचपैकीं एक नाटककार होते. त्यांनीं १९१०।११ च्या सुमारास 'कर्णार्जुन' व 'कृष्णविजय' हीं दोन नाटकें लिहिलीं. वामन पंडित, मोरोपंत, मुक्तेश्वर वगैरे जुने कवि व किर्लोस्कर, देवल, खाडिलकरादि नाटककार यांच्या ग्रंथांचा निष्ठेनें अभ्यास करून हीं दोन्हीं नाटकें लिहिलेलीं असल्यामुळें त्या काळच्या मानानें तीं नाटकें निःसंशय चांगलीं होतीं. हीं दोन्हीं नाटकें सुप्रसिद्ध 'किर्लोस्कर नाटक मंडळी' करीत असे. परंतु या नाटकांत वैशिष्ट्य असें कांहींच नसल्यामुळें हीं नाटकें रंगभूमीवर यशस्वी होऊं शकलीं नाहींत. ह्या अपयशानें*

*आपल्या पहिल्या पौराणिक नाटकांच्या अपयशासंबंधीं व 'विनोद' ह्या पहिल्या सामाजिक नाटकाच्या अपूर्व यशासंबंधीं मीमांसा करितांना माधवराव जोशी म्हणतात, "'कर्णार्जुन' 'कृष्णविजय' या दोन्हीं नाटकांत शृंगार आणि हास्यरस अभावानेंच तळपत होते. दोन्ही नाटकांत वीर रस, करुण रस, रौद्र रस व भयानक रस मात्र होते. विनोदाचें तंत्र तोंपर्यंत माझ्या ध्यानीं आलेलें नसल्यामुळें त्यांत विनोद बिलकुल नव्हता. अल्पावधींतच तीं नाटकें प्रेक्षकांना आवडेनाशीं झालीं व उतरत्या घटूं लागलें. अर्थातच तीं दोन्हीं नाटकें मागें पडलीं......पहिल्या दोन नाटकांची ही अवस्था झाल्यानंतर मला वाईट वाटलें. परंतु प्रेक्षकांना दूषण लावीत मी गप्प बसलों नाहीं. आपलें कांहींतरी चुकलें आहे असें ठरवून मी त्यासंबंधीं मनन आणि अभ्यास करूं लागलों; व शेवटीं "विनोद" हें माझें पहिलें यशस्वी नाटक मी लिहिलें......प्रथम मी या नाटकाच्या कथानकाची गोष्ट लिहून काढली. त्या गोष्टीमध्यें विनोद, हास्य-रस, उपहास, टवाळी किती व कोणत्या ठिकाणीं घालतां येईल हें मनाशीं योजून त्याप्रमाणें त्या गोष्टीची प्रवेशवार मांडणी केली. कथानकाची गोष्ट लिहिलेली असल्यामुळें नाटक वाहवून जाण्याचा संभव नव्हता. तें सूत्रबद्ध लिहिलें गेलें आणि इतर गोष्टींना वाव सांपडला. मला नाट्यलेखनाचें तंत्र समजलें. आजहि माझी पद्धती तीच आहे......'विनोद' नाटक भलतेंच यशस्वी

खचून न जातां माधवरावांनीं आपली वृत्ति सामाजिक नाटकांकडे वळविली. दोन-तीन वर्षे त्यांनीं इंग्रजी नाटकांच्या वाचनांत घालविलीं. १९१४ सालीं त्यांनीं 'विनोद' हें आपलें पहिलें नाटक प्रसिद्ध केलें. त्या नाटिकानें त्यांचा अतिशय बोलबोला केला. त्या नाटकाद्वारें मिळालेल्या कीर्तीतील यशाचें मर्म ओळखून माधवरावांनीं यापुढील सर्व नाटकें समाजदोष विडंबन-स्वरूपांत मांडण्याकरितां म्हणूनच योजिलीं. "माधवरावांचीं नाटकें म्हणजे समाजांतील दोष आणि व्यंगें मोठ्या प्रमाणांत व विकृत स्वरूपांत दाखविणारा आरसा आहे. असा एकादा आरसा समोर असला म्हणजे आपलेंच उभट-लांबट झालेलें विकृत प्रतिबिंब पाहून जसें हंसूं आल्यावांचून राहात नाहीं, तशी स्थिति हीं नाटकें पाहून होते...त्यांच्या नाटकांतील पात्रें व त्यांची विडंबनात्मक भाषा पहिल्यापासून शेवटपावेतों वाचक व प्रेक्षकांना हंसवीत ठेवतात." ( बि. सी. सरवटेकृत "मराठी साहित्य समालोचन"—पृ. ४५६-५७ ).

माधवराव जोश्यांनीं एकूण सुमारें २५।२६ नाटकें लिहिलीं आहेत. त्यांतलीं प्रमुख पुढीलप्रमाणें होत. 'कृष्णाविजय' व 'कर्णार्जुन' ( १९१० ), 'विनोद' ( १९१४ ), 'करमणूक' ( १९१७ ), 'स्थानिक स्वराज्य' ( १९२५ ), 'हास्यतरंग' ( १९२७ ), 'वऱ्हाडचा पाटील' ( १९२८ ), 'गिरणीवाला' ( १९२९ ), 'विश्ववैचित्र्य' ( १९३२ ), 'वशीकरण' ( १९३२ ), 'पैसाच पैसा' ( १९३५ ) 'प्रोफेसर शहाणे' ( १९३६ ), 'उधार उसनवार' ( १९४६ ).

या सर्व नाटकांत 'स्थानिक स्वराज्य उर्फ सचित्र म्युनिसिपालिटी' हें

---

व लोकप्रिय झालें. त्या काळचें खेळाचें जास्तींत जास्त उत्पन्नाचें मान म्हणजे ८०० ते ९०० रुपये या नाटकानें गांठलें होतें. या नाटकाचे थोडेथोडके नाहीं तर ६४ प्रयोग एकसारखे पुण्याच्या रंगभूमीवर झाले. त्या तसल्या काळांत या नाटकाच्या वीस हजार प्रति खपल्या......

[ हंस मासिक—फेब्रुवारी १९४७ "माझें पहिलें नाटक"—ले. मा. ना. जोशी. पृ. १३ते१५ ]

अतिशय गाजलें. अशिक्षित आणि बेजबाबदार लोकांच्या हातांत ते केवळ निवडणुकींत निवडून आले एवढ्याच भांडवलाच्या जोरावर 'स्थानिक-स्वराज्या'चा कारभार गेला म्हणजे ते त्याचा कसा अक्षरशः खेळखंडोबा करून टाकतात त्याचें अत्यंत वास्तववादी, उद्बोधक व मनोरंजक असें चित्र प्रस्तुत नाटकांत दाखविलें आहे. "या नाटकांत वर्णन केलेले सर्व अनन्वित प्रकार कोणत्याहि एकाच शहरांत एकाच वेळीं पाहावयास मिळतील असें नाहीं. तथापि कवीनें अतिशयोक्ति केली आहे, किंवा असंभवनीय चित्र रेखिलें आहे, असेंहि म्हणतां येत नाहीं. सुशिक्षित आणि अशिक्षित या दोन्ही प्रकारच्या लोकांस, या नाटकाच्या द्वारें, आपआपल्या कर्तव्यास जागा असा नाटककर्त्यानें इषारा दिला आहे, त्याबद्दल रा. जोशी यांस धन्यवाद दिला पाहिजे." (वि. रा. जोशी—'स्थानिक स्वराज्य' नाटकाची प्रस्तावना. पृ. २ ).

पहिला प्रयोग १९२५च्या जून महिन्यांतील एके शनिवारीं 'स्थानिक-स्वराज्य अथवा सचित्र म्युनिसिपालिटी' या नाटकाचा अकोला येथील 'श्रीराम थिएटरांत' आनंद विलास नाटक मंडळीनें करून दाखविला. हें नाटक गोष्टरूपानें पुढें दिलें आहे.

## स्थानिक-स्वराज्य

### अथवा

## सचित्र म्युनिसिपालिटी

नाटककार

**माधव नारायण जोशी**

प्रो. ठोंबे : आपली इच्छा काय शिकण्याची आहे ?

धेनुवल्लभ : सगळें कांहीं शिकण्याची आहे. हें पहा, थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे प्रोफेसर ठोंबे, मला सगळ्या जगानें विद्वान म्हणून मान वांकवली पाहिजे. अशी कांहीं तुमच्यांत करामत असेल तर करा!

प्रो. ठोंबे : ठीक तर मग प्रथम काय शिकवूं, बोला! तर्कशास्त्र, मॉरल फिलॉसफी, फिजिक्स-- ?

धेनुवल्लभ : हें फिजिक्स काय आहे ?

प्रो. ठोंबे : या शास्त्राच्या ज्ञानामुळें पदार्थांचे गुणधर्म, पंचतत्त्वें, धातु वगैरे जगांतील सर्व विद्यमान गोष्टी---

धेनुवल्लभ : काय ज्ञान आहे! काय ज्ञान आहे! नुसतीं नांवें सुद्धां जन्मांत पाठ व्हायचीं नाहींत. हें पहा! तुम्हांला स्पष्ट सांगतों. मला म्युनिसिपालिटीचा प्रेसिडेंट व्हायचें आहे. तेव्हां तिच्याविषयीं मला माहिती सांगा!

प्रो. ठोंबे : ठीक आहे, आपण म्युनिसिपल कॉन्स्टिटयूशनच प्रथम घेऊं. हें पहा, १९०१ च्या तिसऱ्या ॲक्टाप्रमाणें म्युनिसिपालिटी स्थापन केली गेली. नागरिकांनीं आपल्या गांवची व्यवस्था पहाण्याकरितां चारपंचमशीं कौन्सिलर्स निवडावयाचे. त्यांनीं पुढें आपल्यांत प्रेसिडेंट, व्हाइस प्रेसिडेंट वगैरे वगैरे निवडावयाचे. पुढें त्यांत स्कूलबोर्ड कमिटीज्, मॅनेजिंग कमिटीज् नेमायच्या. त्यांचेहि चेअरमन निवडायचे!---

धेनुवल्लभ : अबब्ब् या ज्ञानांत शिरणें म्हणजे अगदीं भूमध्य समुद्रांत बुडी मारण्याप्रमाणें आहे! छे! छे! ह्या इंग्रजांची राज्यपद्धति म्हणजे भारी गिचमिडीची!

प्रो. ठोंबे : अहो, एवढ्यांतच काय झालं आहे! अंमलबजावणी खातीं, जकात खातीं, अबकारी खातीं, कितीतरी अनंत खातीं त्यांत आहेत!

धेनुवल्लभ : हें पहा प्रोफेसर, हा एवढा जंजाळ नको बुवा! हें सगळें म्युनिसिपालिटीच्या आकटाचें जंजाळ उलगडणें म्हणजे पुन्हां वेरूळचीं लेणीं कोरण्यासारखेंच आहे! मला येवढें ब्रह्मघोळांत न घालतां थोडक्यांत त्याचे दृश्य फायदे सांगा!

प्रो ठोंबे : ऑल राइट! ऐका! कमिटीज्, मेसिडिंग्ज्, लॉज, बायलॉज वगैरे अनंत अडचणींचे, आडवळणाचे मार्ग सोडून दृश्य फायदे किंवा चौपट मार्ग ऐका! आपल्या दारासमोर कंदील लावतां येतो.

घेनुवल्लभ : हिअर, हिअर !

प्रो. ठोंबे : आपलें गटार रोज उपसून घेतां येतें ! गव्हर्नरच्या लेव्हीला बोलावणें येतें, सर्व नागरिकांचे मुजरे घेतां येतात.

घेनुवल्लभ : काय म्हणतां ? माय गॉड ! काय ज्ञान आहे ! काय इंग्रजी राज्य आहे !

प्रो. ठोंबे : ह्याशिवाय सिनेमाला, नाटकाला फुकट जाणं, दुधकी लोटी, मलई नमुन्यावारी चाखणं, म्युनिसिपालिटीचा कडबा घरच्या म्हशींना घालून दूध-दुभतं करणें, मार्केटच्या गाळ्याच्या परवानगीच्या धाकानें भाजीपाला, फळफळावळी चरणं—असे अनंत पोटभेद आहेत !

घेनुवल्लभ : तादृश्य फायद्यांचे तर डोंगरचे डोंगर आहेत. परमेश्वरा, पुढें सात जन्म जरी उंसाच्या फडांत जन्माला घातलंस तरी ह्या जन्मीं प्रेसिडेंट होण्याचं भाग्य माझ्या ललाटीं नसलं तर निदान मेंबर तरी कर, एवढी तुला हात जोडून या घेनुवल्लभाची काकुळतीची विनवणी आहे ! काय ज्ञान आहे ! काय अधिकार आहे ! काय फायदा आहे !

प्रो. ठोंबे : अहो, हें तर कांहींच नाहीं—असें कांहीं 'ज्ञान' अजून तुम्हांला प्राप्त करून घ्यावयाचें आहे ! पण तें आतां उद्यां ! मला आतां एक अपॉइंटमेंट आहे. येतों मी आतां !"

घेनुवल्लभांची परवानगी घेऊन प्रो. ठोंबे बाहेर पडले. ते गेल्यानंतर किती वेळ तरी घेनुवल्लभ बसल्या जागींच "काय ज्ञान आहे ! काय अधिकार आहे ! काय फायदा आहे !" असें स्वतःशीं पुटपुटत, हातवारे करीत बसून राहिले होते !

घेनुवल्लभ म्हणजे गांवांतील फार मोठें प्रस्थ होतें ! पहिल्या महायुद्धा-आधीं त्याचें एक छोटेंसें किराणाभुसाराचें दुकान होतें. युद्धकालांत त्यानें इकडून तिकडून पैशाची थोडी जुळवाजुळव करून रंगाचा व्यापार केला. आणि म्हणतात ना, 'देव देतो त्याला आढे फोडून देतो !'—अगदीं तस्सें त्याच्या-बाबतींत झालें त्या व्यापारांत त्याला एवढा बेसुमार फायदा झाला कीं, चार-पांच वर्षांपूर्वींचा हा यःकश्चित् दांडीतराजूवाला आतां सुवर्णतुला करून घेण्याची भाषा करूं

लागला होता ! वाढत्या संपत्तीबरोबर त्याचे स्तुतिपाठकहि वाढत होते. धंद्यामधल्या त्याच्या अशिक्षित मित्रमंडळींना सोडून देऊन सुशिक्षित मंडळींत मिसळण्याचा तो प्रयत्न करूं लागला. त्याकरितां त्यानें आपला पोषाख व भाषाहि बदलली. डोक्याला रेशमी साफा, पार्शी फॅशनचा गरम काळा कोट, रेशीमकाठी धोतर अंगावर उपरणें, कानांत भिकबाळी, हातांत सलकडीं, बूट स्टॉकिंग्ज—असा त्याचा अलिकडे पोषाख असे. आपण सुशिक्षित आहों असें भासण्याकरितां अलिकडे स्वारी बिननंबरचा सोनेरी फ्रेमचा चष्मा देखील वापरूं लागली होती. आपल्या भाषणांत जास्त जास्त इंग्रजी शब्दप्रयोग आणण्याची तो पराकाष्ठा करी. परंतु इंग्रजीचें ज्ञान मूळचें अजिबात नसल्यामुळें दुसऱ्यानें उच्चारलेला शब्दच पुन्हां उच्चारण्यापलिकडे (आणि तोहि बहुधा चुकीनेंच !) त्याची अधिक मजल जाऊं शकत नसे. अलिकडे त्याच्या डोक्यांत त्याच्याशीं अलिकडेच परिचय झालेल्या कपिला नांवाच्या एका म्युनिसिपल शाळेंतील शिक्षिकेनें म्युनिसिपल मेंबर होण्याचें भरवून दिलें होतें. त्याला ही कल्पना एकदम पटली. कारण गेले कित्येक दिवस शेंकडों सरकारी अधिकाऱ्यांचे उंबरठे झिजवूनहि त्यास अजून एकादी पदवी मिळाली नव्हती. पैशाच्या जोरावर म्युनिसिपालिटींत मात्र निवडून येणें अगदीं शक्य आहे हें त्याच्या तेव्हांच लक्षांत आलें. त्या दिवसापासून ताबडतोब त्यानें शहरांतील सार्वजनिक संस्थांना मदत व म्युनिसिपल कौन्सिलरांशीं दोस्ती—ह्या दोन कार्यक्रमांना जोरानें सुरुवात केली ! पांडोबा नांवाच्या एका म्युनिसिपालिटींतील कारकुनाला तर त्यानें आपला खाजगी कारभारी म्हणूनच नेमून टाकिलें. हा पांडोबा जितका धूर्त तितकाच मिस्कीलहि होता; धेनुवल्लभाची सतत स्तुति करीत राहाणें व त्याचें म्युनिसिपालीटींतील सर्व कौन्सिलर्सशीं व कामकऱ्यांशीं संघटन वाढविणें हेंच त्याचें मुख्य काम होतें ! पांडोबाच्या सांगण्यावरून धेनुवल्लभांनीं अलिकडे प्रो. ठोंबे या म्युनिसिपल कौन्सिलरला मासिक तनख्यावर आपल्याला म्युनिसिपालिटीच्या कारभाराबद्दल माहिती देण्याकरितां—चर्चा करण्याकरितां—म्हणून नेमिलें होतें; परंतु त्यांतील तात्त्विक बाजू समजावून घेण्याइतकी बुद्धीची कुवत त्यांच्या स्वतःच्याजवळ

नसल्यामुळें व सामाजिक कार्याबाबतची उदात्त दृष्टी प्रोफेसर मजकुरांजवळ नसल्यामुळें त्या दोघांमधील चर्चेला शेवटीं कोणत्या प्रकारचें वळण मिळे हें कथारंभीं दिलेल्या संवादावरून सहज लक्षांत येण्यासारखें आहे.

प्रो. ठोंबे गेल्यानंतर कांहीं वेळानें पांडोबाहि घरीं जाण्यास निघाला. त्याला कपिलाबाईकडे जावयाचें होतें. म्युनिसिपालिटींतील बहुतेक मेंबर्स त्यांच्याकडे चहास यावयाचे होते. त्यांच्यापैकींच एक सभासद कोंडिबा सलून-वाले ह्यांच्या मेव्हण्याला म्युनिसिपालिटीचें एक मोठें कॉंट्रॅक्ट मिळाल्यानें त्यानिमित्त बावयाच्या जलशानंतर सारी मंडळी कपिलाबाईकडे चहापानास यावयाची होती. आणि असा कांहीं समारंभ असल्यावर कपिलाबाई आपल्या मदतीला म्हणून नर्स कोकिलाबाई व पांडोबा यांस अगदीं हक्कानें बोलावीत व तेहि तितक्याच आस्थेनें त्यांच्याकडे येत. पांडोबा कपिलाबाईच्या घरीं जेव्हां पोहोंचले तेव्हां सारे मेंबर्स तेथें आधींच आलेले त्यांना दिसले. चहापानोत्तरच्या त्यांच्या गप्पांना त्या वेळीं अगदीं रंग चढला होता. त्यांच्या भाषणांत आपल्या येण्यानें व्यर्थ व्यत्यय नको म्हणून पांडोबा मागील दारानें घरांत गेले व मंडळी जेथें बसली होती त्याला लागून असलेल्या खोलींत बसून त्यांचीं संभाषणें लक्षपूर्वक ऐकूं लागले. त्यांच्या आवाजावरूनच त्यांनीं ओळखिलें कीं बाहेरच्या मंडळींत चीफ ऑफिसर गायतोंडे, डॉ. बचनाग, प्रो. ठोंबे, गट्टूलाल मारवाडी, कोंडीबा सलूनवाले वगैरे मंडळी असावीत. म्युनिसिपालिटींतील परस्परांच्या कुलंगड्यांवर ते अगदीं निर्लज्ज मोकळेपणानें ऐसपैस गप्पा मारीत होते!

डॉक्टर : बाकी तुम्ही मोठे सावध आणि धूर्त आहांत बुवा चीफ ऑफिसर! कायहो, तुम्ही त्या जकातनाके आणि शाळेच्या रिपेरीला चार हजार रुपये उकळलेत?

प्रो. ठोंबे : काय? मूळच्या दोन हजारांच्या इमारतीला चार हजार रिपेरी? आहे बुवा तुमच्यांत करामत!

चीफ ऑफिसर : खुबी तर तिथेंच आहे. अहो, परवां थोरला रस्ता रिपेरीला आठ हजार हाणकावले! नुसता दोन्ही बाजूंच्या गटारांतला गाळ रस्त्यावर

पसरून रूळ फिरविला. क्यौं ? याला म्हणतात काम !

डॉक्टर : कायहो, खडीचें नांवहि नाहीं ? गट्टूलालकडेच खडीचें कॉंट्रॅक्ट होतें ना ?

चीफ ऑफिसर : होना ! पण या तीन शेंड्यानें खडींत नुसती मातीच दडपली होती ना !

कपिला : अहो माती दडपली म्हणून काय झालें ? मन निर्मल असलें म्हणजे झालें ! मन साफ असलें म्हणजे कर्म करणारा अश्र्पिच राहतो ! परवां आपल्या कोंडिबा सलूनवाल्यांनीं नाहीं का तुमची चिठ्ठी घेऊन गांवच्या मैलामाड्या आपल्या शेतांत रिचविल्या. मैला असला म्हणून काय झालं ? मन साफ पाहिजे, मन निर्मळ पाहिजे.

कोंडिबा : बराबर हाय, मण शाप पाहिजे, मण शाप पाहिजे !

गट्टुलाल : हां हां, सत्य हे. मन चंगा तो कथोटमे गंगा ! अरे कुंडिबा, येती खुलो खुलो शवदो है ! अरे लाखकी करो चोरी और कवडी का करो दान इशीशे कलजुगमें प्रसन्न है भगवाण. इश हात देणा इश हात लेवणा.

कोकिला : वेल डॉक्टर, एक्स्क्यूज मी—पण आपल्याला आतां डिस्पेन्सरींत इन्स्पेक्शनला जायचं आहेना ?

डॉक्टर : जाऊं हो सावकाश ! बोलून चालून धमार्थ तर दवाखाना, आणि त्यांतून म्युनिसिपालिटीचा ! बरं बाय द बाय, काय हो चीफ ऑफिसरसाहेब, तुम्ही जी म्युनिसिपालिटीच्या म्युझिअमकरतां तीन मजली दगडी बिल्डिंग उठवली आहे त्याचे वरचे मजले तर अगदीं झक्क झाले !— पण आतां तळमजल्यांत कसलें अजून काम सुरू आहे ?

चीफ ऑफिसर : तें होय ! पहिले दोन मजले बांधून त्यांना शोभेसा मागाहून तळमजला उठवतों आहें !

गटटुलाल : बष् बष्, धन्य है ! धन्य है ! आपणा चीफ ऑफिसर तो एवा जाणो कीं जेषा विश्वकर्मा है !

कोंडिबा : व्हय्, व्हय्, अक्षी बिरामदेव हाय ! अक्षी बिरामदेव हाय !

कपिला : काय हो, पण हल्लीं त्या म्युझिअममधलीं चित्रें, कवड्या, बाहुल्या, फुलांच्या कुंड्या वगैरे कुठें दिसत नाहींत तीं ?

चीफ ऑफिसर : अहो, त्याची नाहीं का तुम्हांला गंमत ठाऊक ? अहो, त्या वेळेला होते चैत्राचे दिवस ! या साऱ्या मेंबर लोकांनीं आपापल्या इथं हळदी-कुंकवाची गौर मांडायला म्हणून त्या चिजा ज्या नेल्या त्या कायमच्याच ! त्यामुळें आतां नुसता एक कारकून नि केरसुणी राहिली आहे त्या म्युझिअम-मध्यें ! बाकी पण त्या वेळचीं ती हाळ पन्हीं—"

परंतु चीफ ऑफिसरसाहेबांचें तें वाक्य कोणालाच पुरें ऐकूं येऊं शकलें नाहीं; कारण त्याच वेळीं दारावरून मोठमोठ्यानें घंटा वाजवीत आगीचा बंब जात होता. त्यामुळें सारे तिकडे जाण्याकरितां गडबडीनें उठले.

डॉक्टर : ओ हो हो ! कुठं तरी भयंकर आग लागलेली दिसते आहे ! ते पहा केवढे धुराचे लोटच्या लोट दिसताहेत ! चला चला, अगोदर तिकडे गेलेंच पाहिजे आपल्याला.

गट्टुलाल : अरे भाई कहां आग पडियो है ? म्हारे कपडेके दुकानमे तो नहीं है ? कपासके जीन प्रेसमां हुयो तो ठीक है !— उष्को तो मैंणे तिगणा इन्शुअर किया है ! पण कपडेके दुकानमें तो नहीं है ? अरे भाई कुंडिबा, चलो भाई दवडो.

चीफ ऑफिसर : झालं ? थोडंसं घरीं जाऊन अंग टाकीन म्हटलं तर पेटवलन् कुणी तरी आपलं घर ! आपलं नाक कापून दुसऱ्याला अपशकुन करायची संवयच आहे या गांवच्या लोकांना. पावसाळ्यांत पेटवलं असतन् तर ?

कोंडिबा : आतां त्ये कायबी असना ! योक वेळ तिथं जाऊन येणं पडलं खरं. चला गट्टुलाल.

× × ×

दुसऱ्या दिवशीं साऱ्या गांवभर आगीची बातमी पसरली. ज्याच्या त्याच्या तोंडीं तो एक चर्चेचा विषय झाला. रस्त्यांतले मुकादम, झाडूवाल्या आदि कामें करतां करतां त्या आगीबद्दलच बोलत होत्या. गंगू व अंबू ह्या झाडू-

वाल्यांना रंगराव मुकादम आगीची बातमी अगदीं खुलासेवार सांगत होता.

रंगराव : अंबे, सगळ्या जन्मांत अशी आग कधीं पाहिली नव्हती ! त्या कुंभाराचं घर बघ कसं चौफेर पेटलं होतं ! आंत सांपडलेल्या पोराबाळांनीं आणि बायकांनीं अगदीं कल्होळ माजवला होता ! सगळा गांव जमा झाला होता, पण कोण घुसणार आंत ? बिचाऱ्याचं घर, बायको आणि लहान लहान दोन पोरं गमावलीं त्यांत अखेरीला !

अंबू : पण रंगराव, आग लागलीया तरी कशापायीं ?

रंगराव : अग, त्याच्या घरासमोर रस्तारिपेरीचं नगरपाळीचं काम सुरू होतं ! वाफेचा रूळ खडी दाबीत होता; आणि त्या वाफेच्या रुळांतल्या एंजिनमधून सारखा ठिणग्यांचा झोत उडत होता ! त्यावर तारेच्या जाळीचं झांकण नव्हतं ! एकंदरींत काय कपाळ फुटलं नि घर पेटलं !

अंबू : पन् आपल्या मुष्टीपालटीचा त्यो पान्याचा बंब्या कुठं व्हता तवा ?

रंगराव : अग त्या बंबवाल्याला फोन करण्याकरितां लोक धावले ना लगेच रस्त्यावरच्या टेलिफोनकडे, पण त्या फोनच्या नळकांड्यांत अडकलं होतं झुरळ ! बॅटरींत पडला होता उंदीर ! आणि खांबावरची चिनीची तार गुंडाळायची दौत गेली होती फुटून ! म्हणून दिलेला टेलिफोन या मृत्युलोकावर न जातां, पाताळांत शेषाला गेला !

अंबू : अन् मग बंब आला तरी कवा ?

रंगराव : घराचा कोळसा झाल्यावर !

गंगू : अंबे आतां जरा त्वांड बंद करून जरा झाड कीं बिगीबिगी.

अंबू : माझं त्वांड बंद झालंया म्हणजे हातबी बंद पडतुया बघ ! गंगे, माझं अक्शी मुनशीपालटीच्या लैंबरावानी हात नि त्वांड दोन्हीबी सुरू पाहिजे बघ !

गंगू : म्हनजी कायग ? मला नाहीं हेरलं अजून—

अंबू : म्हनजी आपल्या गांवची मुष्टीपालटी हाये ना ?—तिथं जाऊनशान गांवांतलं मोठंमोठं दुकानदार, शेठ सावकार लोक त्वांड करतात ना ? आन् हातान बी लोकांचा पैका दाबतात ना ? तस्स रातंदिवस माझा हात नि त्वांड चालू पाहिजे

बघ ! अग त्यंच कशाला, आपला ह्यो रंगोबा मुकादम न्हाय का ज्येच्यातेच्यापासून पंची म्हागून बकरीवानी त्वांडानं चरतोया, आन् हातानं मजुरांच्या खोट्या हजऱ्या लिहूनशान् पैकाबी दाबतोया, हिंग अस्सं !

गंगू : अवकळा, लयी द्वोड हैस ! तुला अक्शी समदं राजकारण कळतंया ! आन् कुठं शिकलीस इतकं ग्यान ?

अंबू : कुठं म्हणजे ह्यो गांवांतल्या समद्या शाळा मीच झाडत्यें नव्हं का मुन्शीपालटीच्या ?

रंगराव : अंबे, तोंड बंद् कर ! चल हात चालूं दे बिगीबिगी !

अंबू : चाललंया नव्हका ! पन् रंगराव आजच तुम्हास्नी ह्यो रस्ता झाडायची सय झालीशी—?

रंगराव : तुला काय करायच्या चांभारचवकशा नाहींत्या ? झाड म्हटलं झाडावं !

गंगू : दोण वर्सात कुनी इकडं आलं असल तर शपूथ ! आजच कुठला उमाळा फुटलाया तुम्हास्नी ह्यो रस्त्याचा ?

रंगराव : अग, आज या रस्त्यानीं कलेक्टरची का गव्हर्नरची मोटार जाणार आहे, असं कळलं तेव्हां डॉक्टरांनीं हुकूम दिला तावडतोब केरकचरा, धुराळा साफ करून सूर्योदयाच्या आंत पाणी शिंपडण्याचा ! म्हणून तर तुमच्या घरीं मोठ्या पहांटेस आलों तडफडत, नाहींतर माझं काय अडलं होतं ? पेशवाईत नव्हता बोवा असा कधीं त्रास गव्हर्नरचा नी कलेक्टरचा !

अंबू : कारे रंगराव ! कोन कलकट्टर कां गवंडूर कां कोन तुझा बा ?—इकडून मोटरींतून जानार म्हणतोस त्येची मोटार भर्र्र् फुसकून हाकडून जाणार तितक्या मंदी त्यास हातला कचराबी दिसतुया, धुरळाबी लागतूया व्हय ? त्यो तेवढा मानूस हाय् आन् हातलीं समदीं मानसं काय जनावर हायती व्हय ? त्येसनी कांहीं धुरळान् कचरान् घान न्हायी का ?

गंगू : तीं काय समदीं गाढवं हायतीं व्हय् कचऱ्यांत लोळायला ?

अंबू : त्येसनी काय शिंग शेपटी फुटलीया असंच दोण वर्स रहायला ! लई कांगावा करतोयस् तुझ्या बाचा !

रंगराव : अग, आम्ही काय नुसते हुकमाचे ताबेदार ! त्यांनीं हुकूम दिला, आम्ही बजावला !—कोण जास्ती चवकशी करतो ?—अन् गव्हर्नर रस्ता पाहायला आलाय का शर्यती—

पण त्याचें वाक्य शेख हुसेन चपराशानें पुरें केलें. कमरबंद बिल्ला लावून एक फाईल, हंडीकॅप व हुक्का अशा थाटांत आलेला शेख हुसेन एकदम मध्येंच म्हणाला, "ये बात है ! यारो सच कहताहूं शर्यत खेलो ! जान गई तो पर्वा नही ! जोरु गई तो पर्वा नही ! नोकरीकी तो ऐसी तैसी; लेकीन वो नसीबके कसोटीपर एकदफा तोभी जाकर आपना सर मलो. एकदिन नसीबका चक्कर फिर जायगा !

गंगू : अदूगर फेक तुझा हा हुक्का का बुक्का ! चोवीस घंटा कुडकुड करूनशान् पानी पेतोस तवा ह्यो प्वाट का परवाल हाय!

शेख हुसेन : अरे क्यो चिल्लाती है ये हुक्केशरीफके नामसे ! अबे प्यारी ! ये दिल्लीके तख्तकी बडेबडे मोगल बादशाहोंकी मालुम ! ये हमरे मुसलमानोंकी नशानी है !

रंगराव : मोठा लेकाचा दिमाख दाखवितो आहे बादशाहीचा आणि मोंगलाईचा. आम्हीं काय हिंदूनीं बांगड्या भरल्या आहेत होय ?

गंगू : जाऊं द्या कीं रंगराव—! कशाला उगीच हमरीतुमरी, भांडण नि झगडा ?

रंगराव : मला नाहीं आवडत नांवं ठेवलेलीं आम्हां हिंदूंना ! काय आम्हांला निशाणी नाहीं म्हणतोस होय ? ही पहा चंची ! ही पहा निशाणी आमच्या मराठेशाहीची ! ही पहा निशाणी आमच्या हिंदुपदपादशाहीची !

अंबू : व्हय् व्हय् ! योकानं हुक्का पिऊन आन् योकानं पान-तंबाखु खाऊन आपली इजार आन् धोतूरबी गमावलं त्येची निशानी हाय खरंच !

शेख हुसेन : यार रंगराव ! क्यौ गुस्सेमें आते हो ! सच ! ये मेरी गंगू सच कहती है ! जानेदो झगडा फिसाद. ये तो दिन हमारे मौलाना शरीफ और तुम्हारे गांधीतिलकशरीफ क्या कहते है ? के हिंदु और मुसलमीन दोनो भाई है ! और आपसमे झगडा करना ठीक नही है ! आव गले लगो !

रंगराव : हां असं असलं तर ठीक आहे ! आमची मुळींच ना नाहीं ! पण कायरे शेख हुसेन, हें बगलेंत पोतडें कसलें आणलें आहेस ?

शेख हुसेन : क्या करना यारो ! ये पेट जलानेके वास्ते नोकरी करना जरूर है ! ये आपने मुन्सीपालटीकी कल एक ज्यादा मीटिंग है करके सब मेंबरलोगोंके घरकू नोटीस ले गया था. येकतो ये नोटीस है और ये मेरा-प्यारा लखपतीका हंडिक्यॅप है ! प्यारी गंगू, कल जरूर तेरे लिये ' दिलावर ' और ' शहाजादा ' लगाऊंगा ! परवा नही. एक दिन नसीबका चक्कर फिर जायगा !

रंगराव : : कायरे लेका शेख हुसेन ! नोटीस फिरवलीस आन् ती तर कोरीच दिसते ! आन् सह्या कुठें केल्या आहेत मेंबरांनीं ?

शेख हुसेन : ऐसा कैसा होगा ? मै खुद हरएक मेंबरके सामने मीटिंगकी नोटीस पेशकीया और दस्तखत लीया हुं !

रंगराव : अरे लेका ! हा बघ कोरा आहे कागद आणि सह्या तुझ्या लखपतीच्या हंडिकॅपवरच केल्या आहे ! अरे तूं मुनसीपालिटीच्या मीटिंगला बोलावलेंस का रेसीसच्या मीटिंगला ?

शेख हुसेन : हां ! ऐसी कैसी गलती हो गई भाई ? मैं भूलके हंडीकॅपही सामने रखदीया शायद ! लेकीन् वो गधोंने आंख मूचकर दस्तखत कैसी करदिये भाई ? तोबा ! तोबा ! ये तो नसीबकी खोपडी फुटनेकी नौबत आ पहुंची !

अंबू : एक दिन नसीबका चक्कर फिर जायगा !

शेख हुसेन : अरे क्या मश्करी कर रहे यारो ! चलो भाई रंगराव ! वो पांडोबा शिरस्तेदार तेरे पहिचानका है उसे जरा समजाके दुसरी नोटीस लिखवा लेयेंगे ! आजतक डनबार, किलटोय, दिलावर को पांच रुपये लगाताथा ! आज जैसाके नोकरीके लिये वो पांडोबा शिरस्तेदार कोही पांच रुपये लगा देता हूं !

रंगराव : अरे लेका पांच रुपये त्याला कशाला देतोस, लाव तुझ्या डनबारला ? त्या सह्या कापून दे नोटिशीला गोंदांनीं चिकटवून.

शेख हुसेन : सुभान अल्ला ! तूने तो अच्छी हिकमत निकाली ! इसी वास्ते मै हरहमेश करतां हु कि हमारे हिंदुभाई बडे अक्कलमंद और चलाख होते है ? और

नही तो हम् ? अरबस्तानके अडमुठे हूंठ लंबेचवडे खडे है !

रंगराव : तूं आतां खडा रहा किंवा बैठा रहा! मला तुझ्याशीं गप्पा मारायला वेळ नाहीं ? अंबे, गंगे, रस्ता कसा आरशावाणी करून टाका ? मला गेलें पाहिजे आतां डॉक्टरांकडे कालचा रिपोर्ट द्यायला. "

रंगराव म्युनिसिपालिटीच्या दवाखान्यांत जाऊन पोहोंचला तेव्हां डॉ. बचनाग नर्स कोकिलेसह बाहेर पडण्याच्या बेतांत होते. रंगरावाला पाहातांच त्यांच्या कपाळाला आंठयाच पडल्या; कारण त्यांच्या नेतृत्वाखालीं काम करीत असलेल्या आरोग्य खात्याचें ' कर्तृत्व ' (!) दर्शविणारे आंकडे हा रोजच्या-प्रमाणेंच आपल्याला ऐकविणार ही त्यांची खात्रीच होती. परंतु तो रिपोर्ट ऐकणें व त्यानुसार कांहींतरी उपाययोजना करण्याचाहि आपला मानस असल्याचा अभिनय करणें त्यांना भाग होतें! त्यामुळें रंगरावानें केलेल्या सलामाचा स्वीकार करीत त्यांनीं विचारलें, " काय रंगराव, सर्व खैरियत्र आहे ना ? "

रंगराव : सर्व खैरियत आहे ! नागमोडीच्या बोळांतलें मेन गटार तुंबून फुटल्या-मुळें समोरच्या दोन घरांतील माणसें बुडून मेलीं ! तुम्हांला वर्दी द्यायला प्रेसि-डेंटनीं सांगितलं आहे ! बाकी खैरियत !

डॉक्टर : ओ ! ड्रॉऊनिंग केसिस ! ऑल राईट ! एनिथिंग मोअर ?

रंगराव : वेताळपेठ चौकांतील पाया खचल्यामुळें, आज चार महिने झुलत्या मनोऱ्यासारखीं झालेलीं दोन, तीन मजली घरें कोसळून घरांतल्या भाडेकऱ्यांचीं बायकामुलें आणि रस्त्यांतल्या चार माणसांचा चेंदामेंदा झाला ! बाकी सर्व खैरियत !

डॉक्टर . ओ ! कांपाऊंड फ्रॅक्चर्स ? स्कल फ्रॅक्चर्स ! एनि मोअर ?

रंगराव : गांवच्या सेटलिंग टँकमध्यें कॉलऱ्याच्या रोग्यांचे कपडे धुतले गेल्यामुळें शहरांत धडाकून कॉलरा सुरू झाला आहे ! बाकी खैरियत आहे !

डॉक्टर : ओ ! कॉलरा एपिडेमिक ! कॉलरा केसिस ! एनि मोअर ?

रंगराव : एन्फ्लुएन्झा, क्षय, देवी, प्लेगची मृत्युसंख्या कालरात्रीं बारा वाजे-पर्यंत दीडशेंच होती ? बाकी सर्व खैरियत आहे !

डॉक्टर : लिट्ल् मोअर, ए बिट मोअर, किंचित जास्त आहे! वेल, एनि मोअर!

रंगराव : बाकी सर्व खैरियत आहे पण कालपासून—

डॉक्टर : गो टू हेल विथ युवर खैरियत! कमलांग, कोकिल!"— असें म्हणून त्याच्याकडे अधिक लक्ष न देतां डॉ. बचनाग घाईघाईनें दवाखान्याबाहेर पडले. रंगरावाला त्यांच्या बेफिकीरीचें बिलकुल आश्चर्य वाटलें नाहीं; कारण हें नित्याचेंच होतें. शिवाय जो डॉक्टर त्या म्युनिसिपल दवाखान्यांत औषधाकरितां म्हणून येणाऱ्या रोग्यांचे हाल प्रत्यक्ष डोळ्यांनीं पाहूनहि यत्किंचित द्रवत नव्हता तो या गांवच्या केवळ ऐकीव रिपोर्टाला काय दाद देणार? त्यालाहि तेथें अधिक थांबायला वेळ नव्हता. कारण दुपारीं चार वाजतां म्युनिसिपालिटीच्या मेंबरांची जी मीटिंग होणार होती तिला प्रेक्षक म्हणून हजर राहाण्याची विनंती धेनुवल्लभाकडे जाऊन करण्याची कामगीरीहि प्रेसिडेंट साहेबांनीं त्याला सांगितली होती. कलेक्टरच्या बंगल्यावरचें काम आटोपून प्रेसिडेंटसाहेब परस्पर धेनुवल्लभाकडे जाऊन त्यांना स्वतः म्युनिसिपालिटीच्या कार्यकारिणीच्या बैठकीला घेऊन येणार होते! शिवाय हें 'शुभ वर्तमान' कळविल्याबद्दल मानसन्मानाकरितां सदैव हपापलेल्या धेनुवल्लभाकडून कांहींतरी चांगलीशी बक्षिशी मिळणारच ही खात्री असल्यानें तो त्यांच्याकडे जाण्यास घाईघाईनें बाहेर पडला.

संध्याकाळचे सहा वाजले तरी एकहि सभासद म्युनिसिपालिटीच्या सभेच्या दिवाणखान्यांत हजर नव्हता! कारकून पांडोबा सर्व तक्रारी-अर्जांचे कागद—त्या दिवशींच्या अजेंड्याचे—क्रमवार लावून केव्हांचा सभासदांची वाट पाहात बसला होता. लोकांच्या अर्जांची व तुंबून राहिलेल्या कामांची संख्या एवढी प्रचंड होती कीं, ती पाहून कुणाचीहि छाती दडपून जावी. परंतु नागरिकांनीं 'जबाबदार प्रतिनिधि' म्हणून विश्वासानें (?) निवडिलेल्या नगरपित्यांपैकीं अजून एकाचाहि पत्ता नव्हता! इतक्या उशिरां आल्यावर त्या तक्रारी-अर्जांचा ते कोणत्या मार्गानें निकाल लावणार याची पांडोबाला स्वच्छ कल्पना होती. त्याला याबद्दल मनापासून वाईट वाटे. परंतु तो तेथें केवळ कारकून म्हणून

असल्यामुळें त्याच्या वाईट वाटण्याला तेथें काय किंमत होती ? आलेले अर्ज सभासदांपुढें मांडण्यापलिकडे त्याला अधिक कांहींच करतां येण्यासारखें नव्हतें. अर्जाची जुळवाजुळव करीत बसलेला असतांना शेख हुसेन पट्टेवाला तेथें आला. पांडोबाला अदबीनें सलाम करून तो म्हणाला, " अरे भाई पंडुरंगराव ! वो आपना टोलनाकेवाला मुझे कहताथा के, वो गट्टुलाल मारवाडीनें चालीस गाडी माल बगर टोल देते हुवे अपने दुकानमे लेआया ! क्या साला ए लोक तो दिनदिवाले डाके मार रहे है ? "

पांडोबा : मरूं देतेरे बाबा ! मला कशाला ह्या कर्मकटकटी सांगतोस ? तुझं आणखीन् व्याह्याचं घोडं पाहिजे कशाला ? नुसत्या कडबा-वैरण बैलांना पाठविण्याच्या पत्रव्यवहारांतच चाळीस बैल मरून पडल्याचा रिपोर्ट आला आहे. एक लाख रुपयांचा डेपोंतला माल इकडून तिकडे हलवतांना गहाळ झाल्याचें आढळून आलें आहे. बँकेंत पैसा भरणा करतांना पांच हजारांचा एक बटुरा अचानक नाहीसा झाल्याचा नुकताच टेलिफोन आला आहे. ह्या नगाऱ्याच्या घाईंत तुझ्या टोलनाक्याच्या टिमकीला कोण विचारतो ? अरर् मेंढरें आलीं रे आलीं ! ते बघ जिन्यावर खूर वाजताहेत ! तोंड बंद कर ! तोंड बंद कर."

शेख हुसेन चटकन् बिला-पट्टा सांवरीत दारावर जाऊन अदबीनें उभा राहिला. पांडोबा टेबलावरच्या कागदांत तोंड घालून बसले. कांहीं वेळानें चीफ ऑफिसर गायतोंडे, डॉक्टर, प्रो. ठोंबे, वराहशास्त्री, गट्टुलाल मारवाडी, कोंडिबा सलूनवाले वगैरे मेंबर्स सभागृहांत उपस्थित झाले.

डॉक्टर : मिस्टर गायतोंडे, आज आपल्याला फारच उशीर झाला बुवा ! डोंच्यू थिंक ?

चीफ ऑफिसर : काय हो पांडोबा ? आमच्या आधींच मीटिंग भरून बरखास्त झाली नाहीं ना ?

पांडोबा : छे छे ! आपण पहिले येत आहां !

डॉक्टर : होय ना ? दॅटस् ऑल राईट ! कमलांग मिस्टर ठोंबे, गट्टुशेट, कोंडिबा ! यू ऑल जन्टलमेन !

प्रो. ठोंबे : सरटनली नॉट ! वुइ आर रायव्हल्स फॉर मेंबर्स ऑफ पार्लमेंट ! वुइ आर नॉट जन्टलमेन !

कोंडिबा : पार्लमेंट हाय ! हामिभी पारलमिंटाच मेंबरच हाय !

गट्टुलाल : हुं भी डॅमेजींग कमेटीका चोरमन है ! चोरमन है ! अरे पण ये प्रेसिडेंट—"

परंतु तेवढ्यांत प्रेसिडेंट अजागळ व धेनुवल्लभहि तेथें उपस्थित झाले.

प्रेसिडेंट अजागळ : थोडे कलेक्टरच्या बंगल्यावर गेलों होतों म्हणून उशीर झाला ! एक्स्क्यूज् मी ! तसेंच येतांना आमच्या धेनुवल्लभांनींहि कृपा केली इकडे येण्याची, म्हणून त्यांच्या इथें थोडें चहापाणी घेऊन त्यांच्याच मोटारींतून इकडे आलों.

धेनुवल्लभ : सहज म्हटलें काम बघून ठेवलेलें असावें ? म्हणजे पुन्हां अडचण नको ? आज माझ्यामुळें सर्वांना उशीर झाला याबद्दल माफी असावी !

सर्वजण : नेव्हर माइंड ! नेव्हर माइंड !

चीफ ऑफिसर : बरं, श्रीमंतांचं तें घोड्यावर बसायला शिकण्याचें कुठपर्यंत आलें ?

धेनुवल्लभ : जिवंत घोडा लाथ मारण्याचा संभव म्हणून सध्यां लाकडी घोड्यावर प्रॅकटीस् करतों आहें.

प्रेसिडेंट : आयडीया ! आयडीया ! धेनुवल्लभ, या इकडे या असे माझ्याजवळ बसा. नाउ लेट अस बिगिन अवर वर्क सीरीयसली. अहो कारकून, कांहीं सुनावणी अर्ज आहेत का ?

पांडोबा : बरेच आहेत रावसाहेब.

प्रेसिडेंट : ठीक आहे ! वाचायला सुरुवात करा ! सर्व मेंबर्सनीं सूचना, उपसूचना खुल्या दिलानें द्याव्यात !

पांडोबा : धर्मशाळा आणि देवळांच्या ट्रस्टीजकडून पाणीपट्टी आणि भंगीपट्टी माफ करण्याचा अर्ज आहे ? गुरेंढोरें, गोरगरीब, वारकरी आणि पांथस्थ लोकांकरितां—

चीफ ऑफिसर : शट् अप दॅट पांथस्थ ! पुरे झाला तुमचा धर्मावाय !

कोंडिबा : धर्मादाय करून करून समदी पेशवाई बुडवलीत, आतां राहिलेली मुष्टीपालटीची खड्ड्यांत घालायची व्हय ? काय डॉक्टुर, तुमचं काय ओपियम् हये ?

डॉक्टर : ह्या असल्या धर्मार्थ संस्थांतून पाण्याची सांडलवंड, घाण फार होते व त्यामुळें गांवांत रोगप्रसार वाढतो ! म्हणून तेथून अजीबात पायखाने व तोट्या उपटून टाकाव्यात !

प्रेसिडेंट : दॅटस् राईट ! तो अर्ज दप्तरीं दाखल करा ! युसलेस रॅट ! पुढें वाचा!

पांडोबा : अर्ज दुसरा ! परवां आग लागलेल्या कुंभाराचा. तो म्हणतो सगळ्या घराचा कोळसा झाल्यावर बंब आला.

डॉक्टर : ऑल राइट् ! लोणाऱ्याला कोळसे विकून जागा सॅफ करण्याविषयीं मालकाला हुकूम द्या.

प्रेसिडेंट : देअर यू आर ! आय से पांडोबा, थ्रो दॅट रबिश केराच्या टोपलींत ! नेक्स्ट्—?

पांडोबा : अर्ज तिसरा. टांगेवाल्याचा अर्ज आहे ! ड्रेनेजच्या खड्ड्यांत रात्रीं त्याचा गाडीघोडा गडप झाला ! खड्ड्याजवळ तांबडा कंदील नव्हता तरी दिव्याऐवजीं दोन दोन मेंबर्स तरी ड्रेनेजमध्यें उभे करीत जाऊन मला कॉंपेन्सेशन द्यावें !—असें तो म्हणतो.

प्रेसिडेंट : थ्रो दॅट रबिश ! फूल्स् ! राऊडीज् ! गो ऑन् नेक्स्ट !

पांडोबा : चवथा अर्जदार म्हणतो गांवांत पाऊस पडतांच कांहीं भागांत गळ्याएवढ्या खोलीचा पातळ चिखल होतो तरी अशा भागांतील नागरिकांकरितां हजार-पांचशें भोपळे व कांहीं होड्या खरेदी करण्यांत याव्यात. शिवाय तो म्हणतो—

प्रेसिडेंट : तो झक मारतो ! द्या फेकून तो अर्ज. वाचा पुढें—

पांडोबा : अर्ज पांचवा. अर्जदार म्हणतो, वाऱ्यामुळें गांवांत धुराळा फार उडतो आणि त्यांत भर घालण्याकरतांच कीं काय म्युनिसिपालिटीच्या खिळखिळ्या झालेल्या खटाऱ्यांतील सारा कचरा गांवांतील रस्त्यावरच पडून—

चीफ ऑफिशर : पहूं या ! पहूं या ! त्याला म्हणावें यांत तुझ्या बापाचें काय जातें ?

प्रेसिडेंट : छे, छे, हात टेकले अगदीं या लोकांपुढें ! पांडोबा ठेवून या ते सारे अर्ज आणि नमूद करा सर्व प्रकरणांचा आजच निकाल लागला ! बरं सभ्य सभासद हो, आपले कोणकोणते ठराव आहे ते पुढें करा.

प्रो. ठोंबे : ठीक आहे ! सार्वजनिक हौदावरील जातीजातींचे निर्बंध काढून टाकून सर्व जातींना सार्वजनिक हौद उघडा असावा—असा ठराव मी मांडतों आहे.

वराहशास्त्री : याला माझा विरोध आहे ! अद्याप महार, भंगी, कुणबी, मराठा, रोटीबेटी व्यवहाराचा काळ आलेला नाहीं ! आजच हा शिवाशिवीचा प्रकार सुरू केला तर गांवांत खून पडतील !

गट्टूलाल : खूण पडियो ! खूण पडियो ! पंडितजीको म्हारोभी घाट इंजाणके माफक जोरसे टेकूं है !

कोंडिबा : मी माझी प्वारगी कंदी म्हाराच्या घरांत देनार न्हाई !

प्रेसिडेंट : ठीक आहे ! जशी तुमची इच्छा ! पांडोबा, नमूद करा ठराव नापास ! पुढें कुणाचा ठराव—?

प्रो. ठोंबे : आहे ! सक्तीच्या मोफत शिक्षणाचा दुसरा ठराव मांडतों. येवढा तरी ठराव कृपा करून पास कराच. स्वराज्याच्या इमारतीचें स्थानिक-स्वराज्य जोतें आहे व त्याचा पाया सक्तीच्या शिक्षणानें भरभक्कम जर चिणला गेला नाहीं तर हे जोत्याचे दगड निसळून स्वराज्याचा राजवाडा जमीनदोस्त झाल्याशिवाय राहाणार नाहीं. सरकारनें आपल्या हातांत मतांचें कोलीत दिलेलें आहे. या कोलितानें अन्न शिजवून पोटभर जेवतांहि येतें, किंवा स्वतःच्या घराला आग लावून राखरांगोळी करितां येते ! तरी कोलिताचा सदुपयोग करण्याकरितां शिक्षण सर्वत्रांना अवश्य दिलें पाहिजे. येवढा तरी ठराव पास कराच.

प्रेसिडेंट : ऑनरेबल मेंबर्सनीं खुल्या मतानें ठराव पास किंवा नापास करावा.

गट्टुलाल : इंग्रेजी पढियो तो शेटाणी भाग जावे और फेशनमें शेटजी व्यापार

खोटें ?

कोंडिबा : अन् काय वो ! महारभंग्यास्नी शिक्शान् देऊन त्येंचा मैला मंग काय आमी काढणार व्हय ? लई राव सांगताया !

प्रो. ठोंबे : अहो तशी वेळ येणार नाहीं ! इंग्लंडमध्यें भंगी आहेत, अमेरिकेंत भंगी आहेत—आणि ते सुशिक्षितहि आहेत ! शिक्षणामुळें तुमच्यावर कोणतीहि आपत्ति यावयाची नाहीं.

परंतु मंडळींनीं हाहि ठराव हाणून पाडला तेव्हां प्रोफेसरसाहेब निराश होऊन खालीं बसले. नंतर डॉक्टर उभे राहिले. ते उभे राहतांच सर्वजणांनीं अर्णु पूर्वीं ठरल्याप्रमाणेंच टाळ्या वाजवून त्यांचें स्वागत केलें.

डॉक्टर : म्युनिसिपालिटीच्या कांहीं अत्यंत अवश्यक अशा गरजांसंबंधीं मीं दोन ठराव मांडीत आहें. दोन्ही ठरावांचें स्वरूप साधारण सारखेंच असल्यामुळें ते मी सलगच मांडीत आहे. पहिला ठराव असा. येथील एक दानशूर व सुप्रतिष्ठ असे नागरिक श्रीमंत गट्टुलाल शेटजी यांच्या घराच्या पिछाडीची मोकळी जागा, तांगास्टँड व मुतारीकरितां घ्यावी. ही जागा महत्त्वाच्या रस्त्यावर असूनहि ती अवघी तीस हजारांस देण्याचें शेटजींनीं खुषीनें मान्य केलें आहे ! दुसरा ठराव असा कीं, आपल्या सर्वांच्या चांगल्याच परिचयाचे व आपल्या मिठास भाषणानें या नगरांतील साऱ्यांचे आवडते झालेले सुप्रसिद्ध कारागीर कोंडिबा सलूनवाले यांच्या सलूनच्या डाव्या हातचें घर म्युनिसिपल शाळा नं. ४ करितां अडीचशें रुपये भाड्यानें घ्यावें.

चीफ ऑफिसर : या महत्त्वाच्या ठरावाचा विचार करण्याला पांच मिनिटें सवड द्यावी !

प्रेसिडेंट : ग्रँटेड !

सभा तात्पुरती स्थगित होऊन मंडळी त्या ठरावावर खाजगींत चर्चा करूं लागली.

डॉक्टर : हें पहा शेटजी आणि कोंडीबा, आम्हां प्रत्येकाला तुम्ही चार चार

हजारांच्या प्रॉमिसरी नोटांवर सही करून देत असला तर हें तुमचें गाडें पुढें ढकलतों.

वराहशास्त्री : नाहींतर आतां हाणून पाडतों; त्याला काय उशीर ? पहा बोवा, विचार करा !

कोंडिबा : छदाम देणार नाहीं बेट्या ! नाहीं तर नाहीं ! आतांपावतर लई खाल्ला पैका बापाचा तुम्ही !

चीफ ऑफिसर : ए न्हावड्या, रस्ता रुंद करून टाकून घरासमोरचें ड्रेनेज उपसून काढीन !

कोंडिबा : त्यें काई लेका कस्बा-पेरणींत पैसा उडवणं नाहीं आहे !

गट्टुलाल : लोखंड लकडी चूणा भगवाकर बंगला बंधवाणा नहीं है !

डॉक्टर : ए नॉमिनेटड तीन शेंड्या ! तोंड पूस ! तोंड पूस ! काळं लागलं आहे बूट चाटल्याचं !

गट्टुलाल : अरे जा जा जा साला ! बाटली हेलवीवाला ! गमपलाष्टर ! परमेश्वरी होणा ! वो काई दवाखाणेका पीबा खाणा नही है !

कोंडिबा : म्हने कागुद लिवून द्या ! तुमच्या बाचाच पैका किनी—?

चीफ ऑफिसर : ए न्हावड्या, चाप काढतोस काय ! थांब लेका—

आणि मग सारे सभासद त्या न्हावी-शेटजीच्या दुकलीवर अगदीं तुटून पडले. तेहि दोघे कांहीं कमी नव्हते. हाताला लागेल तें—खुर्ची, तक्क्या, दौत, रूळ, वहाणा, बूट—ते इतरांना फेंकून मारूं लागले. साऱ्या हॉलला क्षणांत एकाद्या युद्धभूमीचें स्वरूप आलें. दोन्हीं पक्षांचीं तोंडें व हात सारख्याच जोमानें काम करूं लागले. शेवटीं प्रेसिडेंट, घेनुवल्लभ, पांडोबा व शेख हुसेन पट्टेवाला यांनीं अक्षरशः त्या साऱ्या लढवय्यांना धरून दूर दूर केलें तेव्हांच तें युद्ध संपलें ! मंडळी शांत झाल्यावर घेनुवल्लभ सर्वांना उद्देशून म्हणाले : “ सभ्यगृहस्थहो ! झाला हा प्रकार फार वाईट झाला ! या वर्षांच्या या शेवटच्या सभेच्या दिवशीं आपसांत एकमेकांबद्दल द्वेष, सूड, मत्सर वगैरे ठेवून जाणें, मला तरी कांहीं ठीक दिसत नाहीं. तरी सर्वजणांनीं सर्वजणांना क्षमा करून दुसऱ्याच्या दिवशीं सोनें वाटतांना जसें परस्परांना भेटतात, तसें भेटावें अशी माझी पदर पसरून सर्वांस प्रार्थना आहे. ”

धेनुवल्लभाची विनंती तावडतोब सर्वांनीं मान्य केली. त्यानंतर प्रेसिडेंट अजागळ म्हणाले, "आजच्या सभेचें काम इतकेंच पुरे. मात्र सभा बरखास्त करण्यापूर्वी मी सर्वांतर्फे—ह्या सभेचा असा गोड शेवट केल्याबद्दल धेनुवल्लभांचें मनःपूर्वक अभिनंदन करतों! आतां आपण सगळे यापुढें भाऊ भाऊ आहोंत. आतां यापुढें आपण सर्वजण एकमेकांच्या मागें न लागतां इलेक्शनच्या मागें लागूं या!"

× × ×

इलेक्शनला आतां दोन दिवस उरले होते. सारीं वर्तमानपत्रें व रस्ते उमेदवारांच्या विनंतीपत्रकांनीं भरून गेले होते. प्रत्येकाचे हस्तक मतदारांच्या याद्या घेऊन त्यांना धुंडाळीत असलेले गल्लीबोळांतूनहि दिसत होते. सभा मिरवणुकींनाहि खूप जोर चढला होता. स्वतःची बेसुमार स्तुति व इतरांची निंदा करावयाला कोणीच मागें पुढें पाहात नव्हता. उभ्या असलेल्या उमेदवारांपैकीं फारच थोड्यांना स्थानिक स्वराज्य संस्थेच्या कार्यांत ते घेऊं पाहात असलेल्या जबाबदारीची जाणीव होती. निवडून येण्याच्या त्यांच्या उमेदीमागें 'पैसा खाणें' किंवा 'मान मिळविणें' ह्या पलीकडे दुसरी कोणतीच भावना नव्हती. नागरिकांनाहि ही गोष्ट माहीत होती. एवढेंच नव्हे तर उमेदवारांच्या या विशिष्ट वृत्तीचा जास्त जास्त फायदा कसा घेतां येईल याच्या खटपटींत ते होते. मतामागें कोण जास्तींत जास्त पैसा देतो ह्याच्या ते शोधांत असत. एरवीं संघटनेचें वावडें असलेले हे नागरिक या वेळीं मात्र अगदीं आपापसांत दृढ संघटना करून आपल्या या 'दादा' उर्फ 'पुढाऱ्या' मार्फत उमेदवारांना अगदीं शिस्तींत अडवून त्यांच्याकडून जास्त जास्त रक्कम काढण्याचा पद्धतशीर प्रयत्न करीत होते. ज्या उमेदवारांजवळ नागरिकांचें मन जिंकण्यास अवश्यक असलेल्या लोकसेवेच्या तपःश्चर्येचें भांडवल नव्हतें, परंतु भल्या-बुऱ्या मार्गांनीं मिळविलेल्या संपत्तीचें भांडवल मात्र होतें, ते नागरिकांच्या या विशिष्ट वृत्तीचा फायदा तर घेतच होते; पण त्यांच्यापैकीं कांहींजण याच्याहि थोडें पुढें जाऊन नागरिकांच्या मनांत जातीय, पोटजातीय वाद उत्पन्न करून त्याच्या जोरावरहि मतें मिळविण्याचा वाममार्ग पत्करीत होते. तात्पर्य, देशस्वातंत्र्याला तर नाहींच पण

स्थानिक स्वातंत्र्यालाहि आपण कसे नालायक आहोंत हें दाखविण्याबाबत ह्या स्थानिक स्वराज्य संस्थेच्या पाइकांत जणूं अमदीं चढाओढ लागली होती!

घेनुवल्लभानें तर निवडणूक जिंकण्याचा जणुं पणच केला होता. त्याच्या दृष्टीनें त्याच्या जीवितांत नुकत्याच दोन अगदीं क्रांतिकारक अशा घटना घडल्या होत्या. त्याच्याशीं विवाह करण्याचें कपिलेनें मान्य केलें होतें. कपिला अवघी वीस वर्षांची, आणि हा तर पन्नाशी उलटलेला; ती अत्यंत सुस्वरूप तर हा म्हणजे अगदीं अपरूपाचें खास ध्यान. ती अत्यंत नाजुक साजुक, तर हा अक्षरशः 'घेनुवल्लभ'! आणि असें असूनहि तिनें विवाहाला संमति दिल्यानें घेनुवल्लभाला तो आपला फारच मोठा विजय वाटत असल्यास त्यांत नवल काय? या त्याच्या विजयांत भर घालण्याकरितां म्हणूनच कीं काय यंदाच्या वार्षिक पदवीदान समारंभाचे वेळीं 'रावबहादुर' असा किताब देऊन मायबाप सरकारनें त्याला गौरविलें होतें. ह्या दोन्हीं विजयांवर तो एकदां म्युनिसिपालिटींत निवडून येऊन तेथला प्रेसिडेंट झाला म्हणजे, त्याच्या मतें, अगदीं कळस चढणार होता! पांडोबाला त्यानें केवळ खास याच कामगिरीवर नेमिलें होतें. आणि पांडोबाहि मतें मिळविण्याकरितां अगदीं प्रयत्नांची पराकाष्ठा करीत होता. निवडणुकीला आतां दोनच दिवस राहिल्यानें पांडोबाचे प्रचंड प्रयत्न पाहात असूनहि त्यांनीं किंचित काळजीच्या स्वरांतच पांडोबाला विचारिलें, "कायरे पण, मी हटकून निवडून येईनच ना?"

पांडोबा : त्याची काळजी नको अगदीं! हा दासानुदास काय करामत करतो आहे, कल्पना नाहीं तुम्हांला! काल गांवांतले झाडून आपल्या वर्गाचे सारे लोक, आपल्या अन्नछत्रांत चारून आणून तुम्हांला व्होट देण्याविषयीं बेलभंडार उचलविलें! कालच दोनशें बेवारशी कुत्र्यांना पट्टे अडकावून, चांभारवाड्याच्या प्रत्येक माणसाच्या नांवावर कुत्रेपट्टी देऊन कुत्रे नोंदविले! विचारा, बेवारशी कुत्रें, एक तरी गांवांत फिरकतें कां तें?

घेनुवल्लभ : शाबास! पण हें पहा, पांडू यांत कांहीं गुन्हा होत नाहीं नारे?

पांडोबा : छट्! काय बिशाद आहे कायद्यांची! श्रीमंत, सरदार, रायबहादुर,

खानबहादुर यांच्या हातून कधीं गुन्हाच घडूं शकत नाहीं !

धेनुवल्लभ : खरं ?

पांडोबा : अगदीं निःसंशय खरं ! काय बिशाद आहे कायद्याची बलवंताकडे वक्रदृष्टि करण्याची ! कवड्या, पैसे लावून जुवा खेळा, शिक्षा होते ! रेसीसला यात्रा जमते ! गरीब मारामारी करूं दे, शिक्षा होते ! अधिकारी बूट मारूं दे, पानथरी वांचते ! गरीब गल्लीबोळांतून व्यर्थ हिंडू दे, संशयावरून पकडण्यांत येतें ! श्रीमंत तेंच करूं दे कीं लगेच 'गरिबांचा कनवाळू', 'देशभक्त' म्हणून त्याच्या नांवाचा बोभाटा होतो !

धेनुवल्लभ : पांड्या ! पांड्या ! गहजब केलास तूं ! बेट्या, बालिष्टर कां झाला नाहींस ?

तेवढ्यांत शेख हुसेन पट्टेवाला व धोंडोपंत कंपाउंडर तेथें आले. तेहि निवडणुकीच्या दौऱ्यावरच होते. त्यांना पाहातांच पांडोबानें विचारिलें, "काय हो धोंडोपंत, मग ते टांगेवाले ऐकताहेत का आठशें रुपयाला ?"

धोंडोपंत : छे हो ! ते भलतेंच धरून बसले आहेत ! रोख पंधराशें अगोदर हातांत पाहिजे म्हणतात; नाहीं तर ते कोंडीबा न्हाव्याला देतों म्हणतात.

धेनुवल्लभ : हें पहा धोंडोपंत, पैशाकडे पाहाण्याची ही वेळ नाहीं. कबूल करून टाका ना ! ते तालमींतले काय म्हणताहेत ! शेख हुसेन तूंच गेला होतास ना तिकडे ?

शेख हुसेन : सरकार वो कहते है, हर एक पेहेलवानकू एक महिना बदाम, पिस्ते, खुरमा, मुर्गी, खुराक खिलावेंगे तो ओंठ मिल जायंगे ! और नही तो साफ कहते है की हम उस्ताद मुडदेमल्लीको उंठ देंगे !

पांडोबा : बद्माष लेकाचे ! म्हणावें आम्हांला त्यांच्या उंटाची साफ जरूर नाहीं ! खुशाल—

धेनुवल्लभ : हें पहा पांडोबा, थोडक्याकरितां मागें पुढें पाहूं नका ! जाऊं द्या गेले तर पांच-चार हजार. ही वेळ नाहीं ओढून धरण्याची ! पुढें निवडून आल्यावर आपण याची कसर काढूंच कीं ! तुम्ही आपले मनापासून कामें करा म्हणजे

झालं. पांडू तूं आतां त्या रंगराव मुकादमाला गांठून त्या महारवाड्यांत जा आणि त्या अंबू-गंगूचें काम कोठवर आलें आहे त्याचा तपास कर पाहूं ! बघ, साऱ्या महारवाड्याचीं आणि मांगवस्तीचीं मतें मिळालीं पाहिजेत अं ?

धोंडोपंत : हो बरी आठवण झाली. परवां त्या महारवाड्यांत गेलों होतोंना तेव्हां त्या कोकिलाबाई नर्सचं त्या गंगू महारणीशीं कांहीं तरी हितगूज चाललं होतं ! तेव्हां जरा बेतानीच हं ! ती मोठी पाताळयंत्री आणि दीर्घद्वेषी स्त्री आहे !

पांडोबा : आणि त्यांतून कपिलाबाईचं आणि त्यांचं अलिकडे वांकडं आलेलं !

धोंडोपंत : बघा हं जरा, हवा तसा पैसा सोडा पण तिला बिथरून देऊं नको ! मनांत आणलन् तर ती ऐन वेळीं गोत्यांत सुद्धां आणील हं आपल्या साऱ्यांनाच !

× × ×

—आणि शेवटीं धोंडोपंताची भीति खरी ठरली. इलेक्शन चालू असतां-नाच कोकिला गंगूमार्फत कोणाला तरी खोटीं मतें—गैरहजर किंवा मृत नागरिकांचीं बहुतेक—देण्याचा आग्रह करीत असल्याचा त्याला संशय आला होता. मतांबद्दलचे पैसे देतांनाहि ती आवश्यक ती काळजी घेतांना दिसून येत नव्हती. परंतु बाह्यात्कारीं तरी ती धेनुवल्लभाकरितांच म्हणून खटपट करीत असल्यानें त्या वेळीं त्याला कांहींच बोलतां येईना. त्यांतून तो ज्याच्या हाता-खालीं नोकर म्हणून होता त्या डॉ. बचनागचें व तिचें सूत असल्यानें त्याला सांगून ती एखाद वेळीं आपल्या नोकरीवरहि पाय आणावयाची या धास्तीनें तो तिला कांहींहि न बोलतां अगदीं मूग गिळून गप्प राहिला. त्यांत पुढें इलेक्श-नचा निकाल धेनुवल्लभाला अनुकूल लागल्यामुळें तर मग त्याला या बाबतींत अगदीं कांहींच बोलण्याचें कारण उरलें नाहीं. मतमोजणी झाली तेव्हां निर-निराळ्या उमेदवारांना पुढीलप्रमाणें मतें पडल्याचें जाहीर करण्यांत आलें:—कोंडिबा सलूनवाले—१४००; जगद्गुरु वकील—२; वराहशास्त्री—८०; गट्टुलाल—मारवाडी—१२५०; प्रो. ठोंबे—५०; मुडदेअली—१२००; डॉ. बचनाग—१; रावबहाद्दुर धेनुवल्लभ—१८००. या निकालामुळें धेनुवल्लभाकडचे सारेच खटपटे अगदीं बेहद्द खूष झाले. धेनुवल्लभाला तर अस्मान ठेंगणें वाटूं लागलें. सर्वजण

त्याच्यावर अभिनंदनाचा नुसता वर्षाव करीत होते. मंडळींच्या मतें यशस्वी उमेदवारांची मिरवणूक काढण्याचें घाटत होतें. मिरवणुकीच्या परवानगीचा पास काढण्यासाठीं सर्वत्र वशिले असलेल्या पांडोबानेंच जावें असा सूर निघत होता. पांडोबाहि तिकडे निघण्याच्या तयारींत होता. परंतु तेवढ्यांत समोरून पोलिस ऑफिसर कांहीं महारमांगांना बेड्या घातलेल्या स्थितींत घेऊन येत असलेला दिसला. शेख हुसेन पट्टेवाल्याजवळ तो पोलिंग ऑफिसरची चवकशी करीत असलेला दिसतांच पोलिंग ऑफिसर स्वतःच चुटकन् पुढें झाला.

पोलीस ऑफिसर : अहो पोलिंग ऑफिसर तुमच्या मतदारांच्या याद्या आणा पाहूं ! ह्या केव्हां तयार झाल्या ?

पोलिंग ऑफिसर : १९२४ डिसेंबर अखेरपर्यंत तयार झालेल्या आहेत ! ह्या घ्या ! तसेंच हें पहा, रावबहाद्दुर धेनुवल्लभ यांच्या मतांच्या पेटींत हें पुडकें त्यांच्या स्वदस्तुराच्या सही-शिक्क्यानें दिसत आहे तें ताब्यांत घ्या !

पांडोबा : अहो सरदार हें काय केलैंत ! अहो मला तर विचारायचें ?

धेनुवल्लभ : मी स्वतः पाकिटांत घालून सही करून आलों ! तुला त्याची काळजी नको ! मी खात्रीनें निवडून आलों ! जा तूं तावडतोब धोंडोबाना हांक मारून अत्तर-गुलाब वांटायला घ्या ! अहो पोलीस ऑफिसर—

पोलीस ऑफि. : चूप बसा ! पोलीस ह्यांना कैद करा. कायहो पोलिंग ऑफिसर, जानेवारी, फेब्रुवारी १९२५ सालांत हीं दहा माणसें मेलेलीं आहेत, त्यांचें व्होटिंग झालेलें आहे कीं काय तें पहा ! काय रे बेशरम, ह्या नोटा कुणी दिल्या ! बोल लवकर नाहीं तर पाठच फोडतों !

महार : या कोकिळाबाईनीं दिल्या. या रावबहादूरास्नी मत देन्यापायीं दिल्या जी. पिन्याच्या नांवानें सही करून कागद घालायला लावला त्येंनी !

पोलीस ऑफि : आणखी किती आसामी आहेत ?

महार : चारजण आहेत ! चला दाखवितों ! मी कशाला खोटं बोलूं ?

पोलीस ऑफि. : काय हो, पोलिंग ऑफिसर मयताच्या दहांपैकीं किती जणांचें व्होटिंग झालें आहे ?

पोलिंग ऑफि० : इन्स्पेक्टरसाहेब, या दहांपैकीं आठ असामींचीं मतें पडलीं आहेत.

गट्टुलाल : अरे भाई जाणादो ! दोनसौ तीनसौ तुमभी बांट लेणा ! जानदो ! ए तो खुलो शवदो है !

पोलीस ऑफि० : पोलीस, ह्याला आधीं बेडी घाल ! शेटजी, हें तुमचें वॉरंट ! तेवढा त्या आठ दिवसांपूर्वीं त्या भिवा रामोशाकडून विकत घेतलेला चोरीचा माल कुठं ठेवला आहेत तो सांगा पाहू ! हं, चला रे याला घेऊन. पोलिंग ऑफिसर, सर्व पेट्या पुन्हां मोहोरबंद करून सरकारांत रवाना करा ! हें इलेक्शन् रद्द झाल्याचा हा सरकारी हुकूम जाहीर करा !

गट्टुलाल : अरे मारा बाप ! अभितो मरि गयो ! इलक्षणमें दहा हजीयारको ठार हुइ गयो ! और वॉरंटमें जेलखाना सात बरस जाईयो ! अरे मरीगयो !

धेनुवल्लभ : अरेरे ! या वयांत मीहि सर्वस्वीं नागावलों ! मूर्खासारखा ह्या बाह्यात्कारी दंभाला लालचावलों ! ह्या स्वार्थसाधू तोंडपूज्यांच्या नादानें पदव्या, कीर्ति व डामडौलाच्या हावेनें लोककल्याणाच्या पवित्र कामाचा आंव घातला !— अंगीं काडीचें कर्तृत्व नसतांना, केवळ बडेजावीच्या लालचीनें, पैशाच्या जोरावर स्थानिक स्वराज्यसंस्थेचा संसार चालविण्याचें ढोंग करूं पहाणाऱ्या माझ्यासारख्या मूर्खाला, परमेश्वरा, शेवटीं हेंच ना प्रायश्चित मिळावयाचें ?"

दुंडा—बेडीला बसलेल्या हिसक्यानेंच त्याच्या प्रश्नाला उत्तर मिळालें !



## प्रकरण ....१० वें

१९३० सालच्या सुमारास कृ. प्र. खाडिलकर, भा. वि. वरेरकर, मा. ना. जोशी, वीर वामनराव जोशी, शं. प. जोशी हे प्रथितयश नाटककार निष्प्रभ झालेले दिसूं लागले. बोलपटाच्या जमान्यांत मराठी रंगभूमि अजिबात खचते कीं काय अशी शंका येऊं लागण्याजोगी परिस्थिति निर्माण झाली होती. थोडक्या पैशांत व थोडक्या वेळांत भरपूर करमणूक देऊं शकणाऱ्या बोलपट गृहांकडे प्रेक्षक वळूं लागले होते. रंगभूमीकडे पाठ वळविणाऱ्या या प्रेक्षकांचें तोंड परत रंगभूमीकडे करण्याकरितां जुने नाटककार व नवे होतकरू नाटककार हे अगदीं कसून प्रयत्न करीत होते. कृ. प्र. खाडिलकरांच्या 'सावित्री'चे (१९३३), व संगीत स्वरूपांतील 'बायकांचें बंड' चे (१९३५) प्रयोग होत होते; श्री. भा. वि. वरेरकर यांच्या 'संसार' (१९३२), 'सदा बंदिवान्' (१९३३), 'जागती ज्योत' (१९३३), 'नामा निराळा' (१९३३), 'स्वयंसेवक' (१९३४), 'समोरासमोर' (१९३७), 'कोरडी करामत' (१९३९) ह्या नाटकांचे प्रयोग निरनिराळ्या नाटक कंपन्या करीत होत्या; मा. ना. जोशी यांचीं 'विश्ववैचित्र्य' (१९३२), 'वशीकरण' (१९३२), 'पैसाच पैसा' (१९३५), 'प्रोफेसर शहाणे' (१९३६); शं. प. जोशीकृत 'तो आणि ती' (१९३९); वा. का. भोळेकृत 'सरलादेवी', (१९३१); ना. वि. कुलकर्णीकृत 'क्षमेची क्षमा' (१९३२) व 'मंगल भुवन' (१९३४), ना. सी. फडकेकृत 'युगांतर' (१९३१), 'संजीवन' (१९३४) हीं नाटकें याच कालखंडांत लिहिलीं गेलीं. परंतु यांपैकीं कांहीं नाटकें नाट्यगुणांच्या अभावीं तर कांहीं चांगल्या प्रयोगाच्या अभावामुळें यशस्वी होऊं शकलीं नाहींत. ना. गों. ताम्हनकर व अ. ह. गद्रे यांनीं लिहिलेल्या नाटिका, 'आनंद नाटक संगीत मंडळी' नें 'नाटकधंद्याची कठिण स्थिति' पाहून 'ब्लॅक आर्ट, घोस्ट सीन्स, सिनेमा रेडिओ, बॅकग्राऊंड म्यूझिक, मायक्रोफोन' वगैरे साधनांची जोड देऊन 'गोकुळचा चोर' सारखीं केलेलीं अगदीं अभिनव स्वरूपाचीं नाटकेंहि प्रेक्षकांचें

नाटकांवरून उडालेलें लक्ष परत वेधूं शकत नव्हतीं. मराठी रंगभूमीच्या या अशा अनवस्थाकाळीं तिला पुन्हां आपलें पूर्ववैभव प्राप्त करून देण्याचा पहिला यशस्वी प्रयत्न प्रथम जर कोणी केला असेल तर तो ता. १ जुलै १९३३ रोजीं स्थापना झालेल्या 'नाटयमन्वंतर लिमिटेड' या संस्थेनें. या नाटयसंस्थेच्या साहाय्याला व मार्गदर्शनाला 'महाराष्ट्र नाटक मंडळी' तील गाजलेले नटद्वय—श्री. अण्णासाहेब कारखानीस व श्री. केशवराव दाते, तसेंच श्री. के. ना. काळे, के. या. भोळे, श्री. वि. वर्तक, अ.ळतेकर हे नव्या दृष्टीचे तरुण कलावंत आणि सौ. ज्योत्स्ना भोळे, सौ. पद्मा वर्तक, सौ. सुधा आपटे वगैरे अभिनयकुशल नटी असल्यामुळें ह्यांच्यातर्फे झालेलीं 'आंधळयाची शाळा' (१९३३) व 'लपंडाव' (१९३३) हीं श्री. वि. वर्तककृत नाटकें जुन्या जमान्यांत गाजलेल्या नाटकांइतकीं लोकप्रिय झालीं. 'नाट्यमन्वंतर' हें नांव सार्थ करण्यासारख्या अशा पुढील प्रायोगिक सुधारणा या संस्थेनें केल्या: (१) स्त्रियांच्या भूमिका स्त्रियाच करीत. (२) स्वगत भाषणें कटाक्षानें गाळलीं. (३) खरीं दारें, खिडक्या, भिंती दाखविणाऱ्या फ्लॅटसीनची योजना केली व 'ड्रॉपस्'ची—म्हणजे मधून मधून स्थलविशेष दर्शविण्याच्या दृष्टीनें लागणाऱ्या पडद्यांची उणीव भासूं नये म्हणून अंक एक प्रवेशी केले. (४) अगदीं आवश्यक तेथेंच कथानकांतील भावभावनांचा उत्कर्ष करणारें असें जें मर्यादित संगीत त्यालाच फक्त नाटयांत वाव ठेविला; संगीताचे साथीदार रंगभूमि व प्रेक्षक यांच्यामध्यें न बसतां विंगमध्यें—पडद्याआड बसूं लागले; आवश्यक तेथें भाव-उत्तेजक अशा पार्श्वसंगीताची योजना केली.

प्रायोगिकदृष्टया 'नाटयमन्वंतर' इतका कलापूर्ण जरी नव्हे तरी प्रेक्षकांचें लक्ष परत मराठी रंगभूमिकडे खेंचून घेण्याच्या दृष्टीनें अधिक व्यापक, विधायक व चिरस्थायी स्वरुपाचा दुसरा प्रयत्न जर कोणी केला असेल तर तो श्री. प्रल्हाद केशव अत्रे यांनीं. जवळ जवळ एक तप मराठी रंगभूमि त्यांनीं आपल्या नाटकांच्या जोरावर अक्षरशः गाजवून सोडिली होती. रंगभूमीला नवचैतन्य देण्यांत जुन्या अतिरथि महारथींना आलेलें अपयश डोळ्यापुढें

असतांना त्यांनीं मराठी रंगभूमीवर प्रवेश केला व आपल्या नाटकांच्या जोरावर तिच्या ठिकाणीं अगदीं अभिनव स्वरुपाचा असा उत्साह निर्माण करण्यांत यश मिळविलें. श्री. अत्रे यांनीं पुढील नाटकें लिहिलेलीं आहेत : ‘ गुरुदक्षिणा ’ ( १९२६ ), ‘ वीरवचन ’ ( १९२८ ), ‘ साष्टांग नमस्कार ’ ( १९३३ ), ‘ घराबाहेर ’ ( १९३४ ), ‘ भ्रमाचा भोंपळा ’ ( १९३५ ), ‘ उद्यांचा संसार ’ ( १९३६ ), ‘ लग्नाची ‘ बेडी ’ ( १९३६ ), ‘ वंदे भारतम् ’ ( १९३७ ), ‘ पराचा कावळा ’ ( १९३८ ), मी उभा आहें ( १९३९ ), ‘ पाणिग्रहण ’ ( १९४४ ) व ‘ जग काय म्हणेल ? ’ ( १९४५ ).

श्री. कृ. कोल्हटकरांनीं सुरू करून दिलेली व रा. ग. गडकऱ्यांनीं उन्नतावस्थेस नेलेली विनोदी नाटकांची परंपरा यशस्वीपणें जर कोणी पुढें चालू ठेविली असेल तर ती श्री. अत्रे यांनीं. अत्र्यांच्या पूर्वी विनोदी नाटकें लिहिणारे मा. ना. जोशी ( ‘ विनोद’ कर्ते ), शं. प. जोशी ( ‘ खडाष्टक’ कर्ते ) होऊन गेले नाहींत असें नाहीं; परंतु त्यांची पठडी वेगळी. कोल्हटकर—गडकरी परंपरेचा शब्दनिष्ठ व मार्मिक उपहासात्मक विनोद नाटकांतून यावयाचा तर त्याच्या कर्त्याच्या ठिकाणीं त्याच परंपरेला शोभेसा विशिष्ट दृष्टिकोन व अभिजात प्रतिभा हीं दोन वैशिष्टयें हवींत. तीं अत्रे यांच्याजवळ भरपूर प्रमाणांत असल्यामुळें आपल्या गुरूंच्या तोडीस तोड अशीं विनोदी नाटकें ते लिहूं शकले. त्यांनीं केवळ विनोदी नाटकें लिहिण्यांतच यश मिळविलें आहे असें नाहीं तर ‘एकच प्याला’च्या प्रकृतीचीं गंभीर, भावपूर्ण स्वरूपाचीं नाटकेंहि पण लिहिलीं आहेत. ‘ साष्टांग नमस्कार ’, ‘ भ्रमाचा भोंपळा ’ व पराचा कावळा ’, ‘ पाणिग्रहण ’ हीं त्यांचीं विनोदी नाटकें जितकीं यशस्वी झालीं आहेत तितकींच ‘ घराबाहेर ’ व उद्यांचा संसार ’ हीं गंभीर स्वरूपाचीं प्रमेयात्मक नाटकें आणि ‘ वंदे भारतम् ’ व ‘ मी उभा आहें ’ हीं कांहींशीं प्रचारकी स्वरूपाचीं नाटकेंहि यशस्वी झालेलीं आहेत.

‘ संशयकल्लोळ ’ ( गो. ब. देवल १९१६ ), ‘ भावबंधन ’ ( रा. ग. गडकरी १९१८ ), ‘ सं. स्थानिक स्वराज्य किंवा सचित्र म्युनिसिपालिटी ’

श्री. मल्हाद केशव अत्रे



जन्म : १८९८

स्वभाव मूळचा छांदिष्टच; आणि त्यांत आतां वयाची भर पडल्यामुळें तो अगदीं कळसाला पोहोंचलेला होता ! कोणातरी एका संस्थानिकानें त्यांना साष्टांग नमस्काराचें महत्त्व पटवून दिल्यापासून त्यांना हल्लीं तोच एक नाद लागला होता. ते स्वतः तर नमस्कार घालीतच परंतु आपल्या मुलाबाळांना एवढेंच नव्हे तर घरीं येणाऱ्या प्रत्येक पाहुण्यालाहि त्याची इच्छा असो वा नसो, साष्टांग नमस्काराच्या महत्त्वावरील आपलीं प्रवचनें ते ऐकवीतच. कोणत्याहि गोष्टीचा अतिरेक झाला कीं तिचें अंगभूत सौष्ठव नष्ट होऊन तिचें विडंबन मात्र होतें. रावबहादुरांच्या नमस्काराच्या नादाचें असेंच झालें होतें. अतिरेकामुळें त्यांचीं साष्टांग नमस्कारावरील भाषणें लोकांचा हास्य-विषय मात्र होत ! आजहि तसेंच झालें होतें. उपरोधाच्या अर्थानें मुलांपैकीं कोणीतरी दुसऱ्याला 'दिसत नसेल तर चष्मे घाला ' असें वास्तविक पहातां म्हटलें होतें. परंतु तेवढेंच ऐकलेलें एक तुटक वाक्य पकडून रावबहादूर चष्म्यावरून नमस्कारावर घसरले.

एकटे रावबहादूरच नाहीं तर जवळ जवळ त्यांच्या घरीं असलेली प्रत्येक व्यक्ती कमालीची नादिष्ट—छांदिष्ट होती. त्यांचा मुलगा सिद्धेश्वर याला ज्योतिषाचें, वडील मुलगी शोभना हिला काव्याचें व धाकटी मुलगी मिरा हिला लघुकथा लिहिण्याचें वेड होतें म्हणाना. याच्याच जोडीला आणखीहि एक मजेदार वैशिष्ट्य या कुटुंबीयांचें होतें; तें म्हणजे प्रत्येकजण स्वतःच्या छंदाचें कमालीचें कौतुक व दुसऱ्याच्या छंदाची टिंगल अगदीं न चुकतां करीत असे. आतां आजचीच सकाळचीच गोष्ट पाहा. शोभना आपल्या भावंडांना वडिलांच्या आदेशानुसार नमस्कार घालण्याबद्दल सांगत होती. परंतु प्रत्येकजण त्यांत अंगचुकारपणा करीत होता. त्यामुळें ती शेवटीं वैतागानें म्हणाली, "वा, बरीच सोंगं करतां येतात कीं तुम्हाला. रोज कांहींना कांहीं तरी सबब काढून नमस्कार चुकवतां हें का मला समजत नाहीं ! मी आतां बाबांना सांगतें सगळं. कोणत्या मुहूर्तावर या नमस्काराची सुरवात झाली कोणास ठाऊक !

सिद्धेश्वर : अग, तुला ठाऊक नाहीं ! पण मला ठाऊक आहे ना कोणत्या मुहूर्तावर सुरवात झाली तें ! मागल्या मंगळवारीं म्हणजे नऊ तारखेला सुरवात

झाली या नमस्कारांना. त्या दिवशीं चकचकीत लिहिलें होतें 'सकाळ' मधल्या साप्ताहिक भविष्यांत—कीं या दिवशीं कोणत्याहि नवीन कार्यास प्रारंभ करूं नये. कार्यसिद्धींत अडथळे उत्पन्न होतील! मीं बाबांना त्या दिवशीं अगदीं जीव तोडून सांगितलं कीं तुमचं नमस्काराचें हें प्रकरण या महिन्यांत जरा लांबवून करा. सध्यां शनि जरा वक्री आहे. तो थोडा मार्गी होऊं द्या.

शोभना : न करत्याचा वार शनिवार. आतां नमस्कार घातले असतेस तर शनीनें हातच बांधून ठेवले असते नाहीं तुझे!

सिद्धेश्वर : थट्टा करूं नकोस, शोभना—त्या तापसी स्वारीची थट्टा करूं नकोस! एवढा मोठा विक्रमादित्य राजा पण त्यालादेखील लुळा पांगळा बनवून या स्वारीनें तेलाच्या घाण्यावर बसविलें! चौदा चौकड्यांचा राजा रावण पण त्याच्यादेखील दहा तोंडांतले तीनशें वीस दांत या स्वारीनें बाहेर काढले. आजच्या या सुधारणेच्या युगांत देखील या स्वारीच्या सामर्थ्याचे पुरावे पटवून देतां येतील. घोड्यांच्या शर्यती आणि विलायतेच्या बोटी शनिवारींच कां सुटतात? शनिवारींच लावलेल्या नाटकांना लोकांची तरी गर्दी कां होते?

शोभना : मग नाहीं घालणार ना तूं नमस्कार? नको घालूस जा. मिरा, चल तूं नि मी—

मिरा : मला नाहीं बाई वेळ आतां! परवां मी ती गोष्ट लिहायला सुरवात केली आहे ना? कालपासून चार ओळी देखील लिहावयाला मिळाल्या नाहींत मला!

शोभना : दिवे ओवाळा तुझ्या त्या गोष्टीवरून! दिवस नि रात्र कागदावर कांहीं तरी खरडत बसते! म्हणे, 'सकाळ झाली होती—सूर्य उगवला होता—कोंबडा कुकुच कू करीत होता—आणि गाढव हों हों करीत होतें—आणि म्हणे अशा वेळीं एक व्यक्ति लपत छपत चालली होती!'

मिरा : पुरे पुरे आजीबाई! तुमच्या त्या पांचट कवितांपेक्षां पुष्कळ बऱ्या असतात आमच्या गोष्टी!

त्यांच्या या उखाळ्या पाखाळ्या अगदी ऐन रंगांत आलेल्या असतांनाच कवि भद्रायु भाडपरांची स्वारी तेथें येऊन पोहोंचली. ते रावबहादूरांच्या येथें

येत असत ते वास्तविक पाहतां चंदूला—रावबहाद्दुरांचा सर्वांत धाकटा मुलगा—शिकवायला म्हणून; परंतु बहुधा शिकवणी बाजूला राहून शोभनेशीं काव्या-संबंधीं ऐसपैस गप्पा मारण्यांतच त्यांचा वेळ जाई. जगांत त्यांना काव्यापलीकडे कांहींहि दिसत नसे. त्यांच्याच शब्दांत काव्य महात्म्य सांगावयाचें तर, " काव्य खावें, काव्य प्यावें, काव्य घ्यावें सारखें । काव्य गावें, काव्य व्यावें, बड-बडावें अन् मुखें ॥ काव्य ल्यावें नखशिखीं, अन् काव्य घ्यावें मस्तकीं । काव्य छातीवरि धरोनी, अन् मरावें शेवटीं ॥" त्यांच्या साऱ्या काव्यविषयक गोष्टी एकट्या शोभनेखेरीज कोणीहि ऐकून घेत नसे. शोभना मात्र अक्षरशः एकाद्या भक्ताच्या भाविकतेनें त्या कविराजांनीं सांगितलेल्या साऱ्या 'सुरस व चमत्का-रिक गोष्टी' ऐकून घेत असे. भद्रायु दिसतांक्षणींच तिनें त्याला पहिला प्रश्न केला, " कविराज, काल आला नाहींतसे ?

भद्रायु : काल 'महिला मंडळा'त माझें काव्यगायन होतें.

शोभना : खरंच कीं काय ? मला ठाऊक असतें तर मी देखील बरोबर आलें असतें. बरं, म्हटल्यात तरी कोणत्या कविता काल ?

भद्रायु : कोणकोणत्या म्हणून काय सांगूं ! बहुतेक सगळ्या कवितांचें पारायण झालेंच एकेकदां !—बाकी शोभनाबाई, सगळ्यांत रंग भरला त्या शेवटल्या कवितेला !

शोभना : कोणती कविता ती ?

भद्रायु : ती हो ! " साडेतीन वर्षांच्या आंत देवीच्या आजारानें मरण पावलेलें चिमुकलें छबकडें ! " कवितेचं नुसतं पहिलं कडवं मी पुरतं म्हणतों तोंच जिकडून तिकडून हुंदक्यावर हुंदके—हुंदक्यावर हुंदके ! रडतां रडतां सगळ्यांना अगदीं पुरेवाट झाली. माझ्याहि डोळ्यांतून अश्रूंचे घळघळ पाट वाहूं लागले ! पण तसाच मी आपला कविता गातों आहें आणि रडतों आहें !

शोभना : नुसतं तें वर्णन ऐकूनच माझ्या काळजांत नुसती कालवाकालव सुरू झाली आहे !

भद्रायु : पुढे तर ऐका ! पांचव्या कडव्यांपर्यंत मी आल्यावर मात्र श्रोत्यांना

दम निघेना! चहूंकडून एकदम केविलवाण्या किंकाळ्या उठल्या—' नका—नका—आतां नाहीं ऐकवत— ' आणि असें म्हणून सारी मंडळी नळावर धांवली! तोंड धुतां धुतां अगदीं बेजार! मीहि अध्यक्षांच्या खांद्यावर मान टाकून रडत बसलोन् काय! दोन स्त्रियांना तर अगदीं डोलींत घालून घरीं पोंचवावं लागलं! आणि एक पेन्शनर गृहस्थ तर तेथल्या तेथें फिट येऊन पडला! दोन तास झाले तरी शुद्धीवर येईना! शेवटीं सरकारनं पेन्शन बंद करण्याचा ठराव पास केला आहे असें जेव्हां कोणी त्यांच्या कानांत ओरडलें तेव्हां तो एकदम उठून बसला आणि चालूं लागला!

शोभना : भद्रायु, कुठून मिळविलीत बरं एवढी प्रतिभा? खरंच गडे. आतां पर्यंत एकंदर किती कविता लिहिल्या असतील तुम्ही!

भद्रायु : कुणी खानेसुमारी केली आहे! मला आठवतें तेव्हांपासून मी कवि-ताच लिहितों आहें! हें बघा, कविता लिहून लिहून माझा हा हात अन् हीं बोटें किती मऊ झालीं आहेत!

आणि कविराजांनीं पुढें केलेला हात शोभनेनें खरोखरीच हातांत घेतला व ती म्हणाली, " खरंच किती लुसलुशित हात आहे तुमचा! आतां मला कळलं! असलीं नाजुक बोटं आहेत म्हणून तुम्हांला इतक्या कोंवळ्या कोंवळ्या कविता लिहितां येतात! खरं ना हें!" तिचें वाक्य पुरें होतें न होतें तोंच तिचा एक बालपणापासूनचा मित्र शंतनु तेथें येऊन पोहोंचला. खांद्यावर बंदुक, डोक्याला हॅट, अंगांत खाकी शर्ट व खालीं ब्रीचेसवर गुडघ्यापर्यंत उंच बूट—असा शिका-ऱ्याचा पोषाख त्याच्या अंगावर होता. त्याला भद्रायूनें चालविलेली ही सलगी आवडलेली नसावी. त्याला पाहतांच तीं हि दोघें किंचित् ओशाळल्यासारखीं होऊन एकमेकांपासून दूर झालीं. शंतनूनें जरा तिरसटपणानेंच शोभनेला विचा-रिलें, " हे इसम कोण?"

शोभनेनेंहि जरा तेढ्यानेंच विचारिलें, "आपल्या मतें कोण असावेत?"

शंतनु : मला वाटतें कीं हे एक वैद्य तरी असावेत—नाहीं तर कासार तरी असावेत!

शोभना : असा समज व्हायचं कारण ?

शंतनु : नाहीं—ज्या अर्थी तुझा हात हे हातांत घेऊन बसले होते त्या अर्थी एक ते तुझी नाडी तपाशीत तरी असावेत नाहीं तर तुला बांगड्या तरी भरण्याच्या बेतांत असावेत असा कोणाहि तिऱ्हाइताची समज होणें साहजिकच आहे !

शोभना : मला वाटतं आपला कांहीं तरी गैरसमज—

शंतनु : छेः ! छेः ! माझा मुळींच गैरसमज झाला नाहीं. इतक्या उघडपणें गोष्टी चालल्यानंतर गैरसमज होण्याचं कारण काय ? उलट साऱ्या गोष्टी मला चांगल्याच समजून चुकल्या ! शोभना, माझ्या पत्राला इतके दिवस तुझें उत्तर कां मिळालें नाहीं याचें कारण मला आज कळलें. थोड्या फार गोष्टी माझ्या कानावर आल्याच होत्या—पण प्रत्यक्ष पाहाण्याचा आतांपर्यंत योग जुळून आला नव्हता.

शोभना किंचित् फणकाऱ्यानेंच यावर कांहींतरी उत्तर देण्याच्या बेतांत होती; परंतु तेवढ्यांत तेथें मिरा, रावबहाद्दुर, त्रिपुरी नांवाची शोभनेची बालमैत्रिण व एक साहेबी पोषाखांतला कोणी अपरिचित गृहस्थ इतकी मंडळी अचानकपणें आली.

रावबहाद्दूर : अग या त्रिपुरीला ओळखलीस का ?

शोभना : इश्श न ओळखायला काय झालं ? पण ती मात्र एम्. ए. झाल्यापासून आम्हांला—

त्रिपुरी : अग एम्. ए. च काय पण आतां सिनेमा नटी सुद्धां होणार आहें ! आणि मग तर तुला बिलकुल ओळखणार नाहीं ! शोभे, आज इतक्या वर्षांनीं मी तुझ्याकडे आलें आहें तरी—

शोभना : अग तसं नाहीं ग ! उगाच जरा तुझी थट्टा केली. एक्सक्यूज मी अं ?

रावबहाद्दुर : ए पुरे बुवा तुमच्या त्या उखाळ्या पाखाळ्या ! बरं हे गृहस्थ कोण त्रिपुरी ? येवढी एम्. ए. झाली म्हणतेस पण यांची ओळख करून देण्याचा साधा एटिकेट देखील तुला नाहींना ?

त्रिपुरी : आय एम् रिअली सॉरी हं ! अगदीं साफ विसरलेंच कीं ! हे मल्लिनाथ घोष. हे इंडोबंगाल म्हणून एक सिनेमा कंपनी काढण्याच्या विचारांत आहेत.

यांच्याच कंपनींत मी प्रथम काम करणार आहें. हे चांगले नामांकित ॲक्टर पण आहेत !

शंतनु : अस्सं ! कोणत्या फिल्ममध्यें काम केलं आहे यांनीं ?

मल्लिनाथ : 'अलिबाबा आणि चाळीस चोर' या फिल्ममध्यें मी एकोणचाळिसाव्या चोराचं काम केलं आहे.

भद्रेश्वर : मला नाहीं आठवत तुम्हांला पाहिल्याचं ! मी तो फिल्म पाहिलो आहे!

मल्लिनाथ : सुरवातीपासून अखेरपर्यंत आम्हांला तेलाच्या बुधल्यांतच बसून राहावं लागलं ! मग कसा दिसणार मी तुम्हांला ?

रावबहाद्दुर : बरं—बरं—बरं ! म्हणजे त्या बुधल्यांत ते चोर लपतात आणि मार्जिना का कोणशी ती त्या चोरांच्या डोक्यावर कढत तेल ओतते—आतां आठवलं ! खरंच का हो पण तुमच्या डोक्यावर कढत तेल ओतलं ?

त्रिपुरी : खरंच म्हणजे काय खोटं ओततात वाटतं ! अहो यांच्या डोक्यावर तर खाजगी अदावतीमुळें मार्जिनाचं काम करणाऱ्या त्या नटीनें अगदीं उकळलेलें तेल ओतलं ! सहा महिने हे डोक्याला बँडेज बांधून पडले होते ना बिछान्यावर !" —असें म्हणून त्रिपुरी मोठमोठ्यानें खो खो हंसूं लागली. इतरांच्याहि लक्षांत तिची ही बनवानवी आली आणि मग साऱ्यांचीच हंसतां हंसतां पुरेवाट झाली ! हंशाचा भर ओसरल्यावर त्रिपुरी म्हणाली, " हें पहा मी आज तुम्हां सर्वांना आमंत्रण द्यायला आलें आहे. येथून जवळच अशोकबाग नांवाचें एक सुंदर स्थळ आहे, बहुतेक तीच जागा आम्हीं आमच्या स्टुडिओला घेऊं म्हणतों. परवांचे दिवशीं त्या ठिकाणीं वनभोजनाचा बेत करण्याचें आम्हीं ठरविलं आहे आपण अगदीं सगळ्यांनीं जरूर जरूर आलं पाहिजे—रावबहाद्दुर, तुम्हीं सिद्धेश्वर, तुम्ही कविराज,—शंतनु तूं, शोभना, मिरा तुम्ही दोघी—अगदीं साऱ्यांनीं आलं पाहिजे हं !" सगळ्यांनीं मोठ्या आनंदानें त्या निमंत्रणाचा स्वीकार केल्यावर मल्लिनाथ व त्रिपुरी निघून गेलीं; व बाकीची मंडळीहि आपल्या नित्य व्यवसायाला लागली.

× × ×

अशोकबागेंत वनविहाराकरितां गेलेली रावबहाद्दुरांच्या घरांतील मंडळी भोजनाला अवकाश होता म्हणून बागेंत हिंडत होती. एकत्र हिंडणें, त्या मंडळींचे स्वभावविशेष लक्षांत घेतां, त्यांना फारसें मानवण्यासारखें नव्हतें. त्यामुळें निरनिराळ्या सबबींच्या बुरख्याखालीं तें सारेजण चारी दिशांना पांगले. मिरा बागेंतील एक दूरचा कोपरा शोधून काढून तेथेंच एक लघुकथा 'जमवीत' बसली; शोभना कवि भद्रायूबरोबर त्याचीं तेथील सृष्टिसौंदर्याचीं काव्यमय वर्णनें भाविकतेनें ऐकत हिंडत होती; सिद्धेश्वर वर्षभविष्याचें एक जाडजूड पुस्तक मन्द्राळू मनानें वाचीत व त्याच्या आधारें मनाशीं कांहींतरी आडाखे जुळवीत बागेंतील शिवाच्या, देवालयांत नंदीसारखा मान हलवीत बसला होता; शंतनु आपल्या बंदुकीनिशीं व चंदू आपल्या गलोलानिशीं अनुक्रमें पांखरें व चिंचा यांच्यामागें लागले होते; आणि रावबहाद्दूर, त्रिपुरी व मल्लिनाथ या जोडीला गांठून त्यांना साष्टांग नमस्काराचें महत्त्व सिनेमाच्या धंद्यांतील लोकांना इतर सर्वांपेक्षां कसें अधिक महत्त्वाचें आहे हें सविस्तर, सोदाहरण व सप्रयोग पटवून देण्याची पराकाष्ठा करीत होते! रावबहाद्दुरांचें प्रवचन चालू असतां मल्लिनाथ मध्येंच केव्हां झटकला हें त्रिपुरीच्या लक्षांतहि आलें नाहीं. वाटेंत चंदू-शंतनूची जोडमोळी भेटली. त्यांना सहज त्रिपुरीनें विचारिलें कीं त्यांना मल्लिनाथ कोठें आढळला कीं काय म्हणून. त्यावर चंदू म्हणाला : "अग, त्या पलिकडल्या कुंजांत ते मिराला सिनेमांत काम कसं करायचं असतं तें समजावून सांगत बसले आहेत! आमच्या मिराला देखील कुठल्यातरी सिनेमांत ते म्हणे काम देणार आहेत!" एवढेंच सांगून चंदू पुन्हां तेथून नव्या चिंचेच्या झाडाच्या शोधार्थ पळाला. त्रिपुरी चंदूची ती बातमी ऐकून बरीच अस्वस्थ झालेली दिसली. शंतनूला रावबहाद्दुरांशीं संभाषणांत गुंतवून ठेवून तीहि हळूच तेथून झटकली. चंदूनें सांगितलेल्या कुंजापाशीं ती येऊन पोहोंचली तेव्हां कोणीतरी पाठमोरी व्यक्ति त्या कुंजांतून बाहेर पडतांना तिला ओझरती दिसली. घाईघाईनें पुढें होत तिनें मल्लिनाथाला विचारिलें, "कोण गेलं आतां इतक्यांत इथून?"

मल्लिनाथ : कोण गेलं? हं! मिरा—मिरा—गेली असेल!—नाहीं, मिराच गेली!

कां ? आणि कपाळावर एकदम आठ्यांचं जाळं कां पसरलं ?

त्रिपुरी : काय करीत बसलां होतांत मिराशीं इतक्या वेळ ? कसल्या गोष्टी चालल्या होत्या एवढ्या ?

मल्लिनाथ : पण मला कळत नाहीं, मिराशीं बोललों म्हणून झालं काय ? तुला कांहीं भलतासलता संशय तर—

त्रिपुरी : खरं सांगूं मल्लिनाथ—मिराशीं बोलत बसल्याबद्दल मला तुमचा मुळींच राग आला नाहीं. पण मला नकळत इकडे निघून आलांत म्हणून मला तुमचा फार राग आला. पाहुण्यांना परस्पर सोडून देऊन यजमानानं पसार व्हायचें हें तुमचें आदरातिथ्य होय हो ? रावबहाद्दुरांनीं देखील सत्रा वेळां विचारलं असेल तुमच्यासंबंधीं !

मल्लिनाथ : ओ बॉदर ! डॅम दॅट ओल्ड फूल !

त्रिपुरी : पण एवढें कां तुम्ही त्यांच्यावर संतापलांत ! रावबहाद्दूर किती चांगले आहेत ! आणि बोलतात तरी किती मजेदार !

मल्लिनाथ : रावबहाद्दूर मजेदार बोलतात ! तुझ्या त्या रावबहाद्दुरांचं तोंड म्हणजे गोकाकचा धबधबा आहे नुसता ! एखाद्या पिठाच्या गिरणीप्रमाणें त्यांच्या तोंडाचा पट्टा एकसारखा वाजत असतो आपला ! मला वाटतं त्यांच्या जिभेला एक तांब्याची तार कायमची अडकवून ठेविली तर तिच्यांतून सगळ्या गांवाला मोफत विजेचा पुरवठा व्हायचा ! सकाळपासून त्यांची बडबड ऐकून माझं डोकं फिरून गेलं आहे नुसतं ! शंभर वेळां त्यांनीं मला विचारलं असेल तुम्ही नमस्कार घालतां का म्हणून ! आणि मी लाख वेळां त्यांना सांगितलं असेल कीं नाहीं म्हणून ! तरी त्यांचा आपला विचारण्याचा सपाटा चाललाच होता. त्यांच्या या कटकटीला कंटाळून तर मी इकडे निघून आलों आणि तुझी वाट पहात बसलों—

त्रिपुरी : खरंच, तुम्ही इतक्या वेळ माझी वाट पहात बसलां होतां इथें ? खरंच सांगतां हें ?"

मल्लिनाथ त्यावर कांहीं उत्तर देणार तोंच हातांत वर्षभविष्यांचें जाडजूड

पुस्तक घेतलेली सिद्धेश्वरांची स्वारी अचानकपणें तेथें येऊन पोहोंचली व म्हणाली, "शोभने, अग मी सुद्धां सकाळीं इथं आल्यापासून तुला एकीकडे कसं भेटतां येईल या विवंचनेंत आहे. पण तुझ्या भोंवतीं मंडळींचं एवढं मोठं लटांबर होतं कीं मला बोलतांच येईना."

मल्लिनाथ : यांच्याशीं कांहीं कुंडलीबाबत चर्चाबिर्चा करावयाची होती काय तुम्हांला—?

सिद्धेश्वर : नाहीं—दुसऱ्याच एका अत्यंत खाजगी आणि महत्त्वाच्या कामासंबंधीं बोलायचं आहे, तेव्हां—

मल्लिनाथ : तेव्हां—मी इथून निघून जाऊं म्हणतां कीं काय ?

सिद्धेश्वर : तसं मी आपण होऊन कसं सांगूं ! सुज्ञास अधिक काय बोलायचं!!

मल्लिनाथ सिद्धेश्वराची ती उघड सूचना पाहून अगदीं सर्दच झाला. परंतु उगाच या तऱ्हेवाईक माणसाशीं वितंडवाद नको म्हणून तो त्रिपुरीला म्हणाला, "अच्छा ! त्रिपु, मी जरा भोजनाची तयारी कुठपर्यंत झाली आहे तें पाहून येतों तोंवर यांचं खाजगी आणि महत्त्वाचं काम संपेल अशी आशा आहे !" असें किंचित् उपरोधानें म्हणत तो चटकन् त्या कुंजाबाहेर पडला. तो गेल्यावर त्रिपुरी सिद्धेश्वराला म्हणाली, "इतकं काय महत्त्वाचं काम काढलं आहेत बाई? मला कांहीं कल्पनाच होत नाहीं !"

सिद्धेश्वर : तुलाच काय पण परवां तूं भेटेपर्यंत मला स्वतःला तरी या गोष्टीची कल्पना कुठं होती ? बरं त्रिपुरी, आतां चटकन् एक आंकडा धर पाहूं मनांत कोठला तरी !

त्रिपुरी : इश्श आंकडा मनांत धरूं ! अन् तो कशाला ?

सिद्धेश्वर : कशाला म्हणजे ? मी सांगतों म्हणून धर, आटप लौकर. नाहीं तर कोणी तरी येईल, आणि आमचं काम पुन्हां फिसकटेल !

त्रिपुरी : बरं धरला मनांत आंकडा ! पुढं ?

सिद्धेश्वर : कोणता आंकडा धरलास ?

त्रिपुरी : हात्तिच्या, सांगायचंच का तें तुला ? मला वाटलं हुडकून काढतोस कीं काय ! बरं, सहा धरला होता.

सिद्धेश्वर : सहा ? ठीक ! सहान् दोन आठ—आठ दुणें सोळा—सोळा न् एक सत्रा——

त्रिपुरी : हें काय करतोस !

सिद्धेश्वर : हें नाहीं तुला कळायचं ! हें आमचं संख्याशास्त्र आहे !—जरा थांब—सोळा ! न् एक सत्रा—सत्रा त्रीक एकावन्न अन् तीन चौपन्न—म्हणजे पांच न् चार—नऊ अं ! नऊच आले का शेवटीं ? म्हणजे झालं—बाराच वाजले आमच्या कामाचे !

त्रिपुरी : पण नवाचा नि तुझ्या कामाच्या काय संबंध ?

सिद्धेश्वर : नवाचा काय संबंध ? त्रिपुरी, दुनियेंतल्या प्रत्येक दुर्दैवी गोष्टीचा या नवाशीं संबंध आहे. आमच्या संख्याशास्त्राप्रमाणें नऊ हा सर्व आंकड्यांतील सैतान आहे ! या नवानें जगात काय घोटाळे माजविले आहेत तें सारें वर्णन करूं म्हटलें तर अगदीं नाकीं नऊ येतील ! नाना फडणीस कधीं मेले ? १८०० सालीं ! म्हणजे एक अन् आठ मिळून नऊ आले कीं नाहीं ! पेशवाई केव्हां बुडाली ? १८१८ सालीं ! कर १८१८ तल्या आंकड्यांची बेरीज ! आली कीं नाहीं अठरा ! म्हणजे फिरून एक न् आठ नऊच ! लोकमान्य टिळकांचं आयुष्य एवढं कष्टांत कां गेलें ! नांवाचीं अक्षरें मोज त्यांच्या ! बा-ळ—गं—गा—ध—र—टि—ळ—क ! आहेत कीं नाहीं नऊ अक्षरें ?

त्रिपुरी : माझी आत्तापर्यंत कल्पना होती कीं तेरा आंकडा हा सर्वांत वाईट !

सिद्धेश्वर : खोटी आहे कल्पना ती ! साहेब लोकांनीं या तेराचं नसतं स्तोम माजविलें आहे झालं ! आमच्या नवांपुढें त्या तेराचे अगदीं तीनतेरा वाजल्याशिवाय राहायचे नाहींत ! आतां माझीच गोष्ट सांगतों ! मी बी. ए. परीक्षेंत पांचवेळां नापास कां झालों ? आमचे स्टार्सच असे भिकार कीं प्रत्येक वेळीं परीक्षेस नेमका असा नंबर यायचा कीं त्याच्या आंकड्यांची बेरीज हटकून नऊ व्हायची ! पहिल्या परीक्षेला सुरवात नऊ तारखेला होती तर शेवटल्या खेपेस

परिक्षेचा निकाल नऊ तारखेला होता. मी आपला प्रत्येक वेळेला कोरा पेपर देऊन तस्सा उठून यायचा ! म्हटलं विषाची परीक्षा पहाच कशाला ?

त्रिपुरी : सिद्धेश्वर हेंच का तुझं खाजगी आणि महत्त्वाचं काम ? इश्श ! चमत्कारिक आहेस झालं !

सिद्धेश्वर : माझ्या कामासंबंधीं तूं आतां बोलूंच नकोसना ! या नऊ आंकड्यानं त्याचा अगदीं निकालच लावला ! म्हटलं कामाविषयीं बोलायला आतांचा मुहूर्त कसा काय आहे तें पहावं; म्हणून संख्याशास्त्राचा थोडासा आढावा करून पहायला गेलों तों काय ? नवांचा आंकडा एखाद्या ब्रह्मसमंधासारखा दत्त म्हणून पुढें उभा राहिला ! मनांतल्या मनांत लगेच गिळूनच टाकले मी सारे विचार ! सांगेन फिरून केव्हां तरी ! आतांच मी माझ्या कामासंबंधीं बोललों असतों म्हणजे विचकाच झाला असता सगळ्या गोष्टींचा— ! यावर त्रिपुरी कांहीं तरी खरमरीत उत्तर देण्याच्या बेतांत होती परंतु तेवढ्यांत समोरून शंतनु व शोभना येत असलेलीं दिसलीं म्हणून तिनें चटकन् जीभ आवरती घेतली. शोभना जवळ येतांच त्रिपुरी किंचित् मिस्किलपणानें तिला म्हणाली, "शोभूताई, तुमचे कविराज कुठें दिसत नाहींत ग ! गुलाबाच्या ताटव्यांत कविता लिहीत बसले आहेत कीं काय ?"

शंतनु : नाहीं ! सकाळपासून कागदाचा गठ्ठा डोक्यावर घेऊन ते सैरावैरा धांवत सुटले आहेत या बागेंतून ! मला वाटतं संध्याकाळचे आंत ते दहा-बारा सर्गांचें एखादें खंडकाव्य निर्माण करणार आज !

शोभना : तुमच्यापेक्षां पुष्कळ बरे आहेत ते ! ते काव्य तरी लिहिताहेत ! तुम्ही इथं सकाळीं आल्यापासून होलगडं मारण्यापलीकडे दुसरं काय केलं आहे ! दुष्ट कसाब—जंगली राक्षस कुठले !" एवढं म्हणून शोभना त्या रागाच्या झपाट्यांत त्या कुंजाबाहेरहि पडली. त्या कुंजापासून ती दहा-वीस पावलें दूर गेली असेल नसेल तोंच एका चिंचेच्या झाडावर चढण्याच्या प्रयत्नांत असलेली चंदूची स्वारी तिला दिसली. तिनें साहजिकच चंदूला त्या झाडावर न चढण्याबद्दल बजाविलें; त्यावर तो उसळून म्हणाला, "हॅं ! आमचे मास्तरसुद्धां तिकडे एका

झाडावर चढून बसले आहेत. त्यांना मात्र कोणी बोलूं नका!" चंदूचे ते उद्गार ऐकतांच त्याच्याशीं अधिक हुजत घालीत न बसतां शोभना त्यानें सांगितलेल्या झाडाच्या दिशेनं निघाली. तिला कविराजांच्या शोधार्थ फार दूर जावें लागलें नाहीं. एका डेरेदार आम्रवृक्षाच्या फांदीवर बसून कांहींतरी लिहिण्यांत गुंतून गेलेली कवि भद्रायू भाटघरांची स्वारी तिला थोडें पुढें जातांच दिसून आली. तिला भद्रायूचा तो एकंदर बसण्याचा थाट पाहून कमालीचें हंसूं आलें. मोठ- मोठयानें टाळ्या वाजवून त्याचें लक्ष आपल्याकडे वेधून घेत ती म्हणाली, "अहो कविराज, सकाळपासून इथेंच असे अवघडत बसले आहांत वाटतं? मी आपली सगळीकडे तुम्हांला शोधीत होतें. जेवायला चलतांना? पानं वाढून तयार आहेत!"

भद्रायू : शोभना, आम्ही कवि कल्पवृक्षाच्या मधुर फळांचा फराळ करतों आणि मंदाकिनीच्या जलाशयांत उगवलेल्या कमळांच्या कोमल परागांचा नास्ता करतों. आमच्या हिशेबीं असल्या दरिद्री जेवणाची काय किंमत?-

शोभना : पण कविराज, इतक्या वेळ तुम्ही करीत तरी काय होतां इथें? सकाळीं मला चकवून इकडे येऊन बसलांत हो! आणि डोळे किती लाल झालेले दिसतात तुमचे—?

भद्रायु : आज सकाळपासून मला काव्याचा कैफ चढला आहे नुसता! आज या बागेंत स्फुरलेल्या माझ्या काव्यसंपत्तीवर मी स्वतःच इतका बेहद्द खूष आहें कीं त्यामुळें स्वर्गाच्या तुळया मघापासून माझ्या डोक्याला लागत असल्याचा मला भास होत आहे!

शोभना : पण गडे कविराज, तुम्हाला इतक्या भराभर कल्पना सुचतात तरी कशा? अशी काय जादू आहे तुमच्याजवळ?

भद्रायु : शोभने, काव्याच्या साम्राज्यांत या जादूला स्फूर्ति असें संबोधितात! स्फूर्ति म्हणजे वणवा आहे! स्फूर्तीचा थैमान आमच्या डोक्यांत सुरू झाला म्हणजे काव्यनिर्मितीला काय उशीर आहे?

शोभना : पण गडे कविसम्राट, मला हें कळत नाहीं कीं तुम्हाला ही स्फूर्ति येते तरी कशी ?

भद्रायु : स्फूर्ति कशी येते ? आभाळांत ढग कोठून येतात ? समुद्रावर लाटा कां उसळतात ? गांवांत साथीचे रोग कसे उद्भवतात ? वेलीला फुलें कशीं उमलतात ? शोभना, निसर्गाची हीं काव्यमय रहस्यें ज्या वेळीं कळतील त्याच वेळीं स्फूर्तीचें कोडें सुटेल !

शोभना : स्फूर्ति कशी येते हें सांगणं कदाचित् अशक्य असलं तरी स्फूर्ति आली म्हणजे तुम्हाला कसं वाटतं तें तरी तुम्हाला खचित सांगतां येईल !

भद्रायु : शोभने, स्फूर्ति आली म्हणजे आपल्याला एकादा कसला तरी जबरदस्त वाताचा झटका आल्यासारखा वाटतं आणि डोक्यांतून उडाणटप्पू शब्दांच्या टोळ्या हरताळाच्या दिवशीं गांवांतून उनाडणाऱ्या विद्यार्थ्यांच्या तांड्याप्रमाणें सैरावैरा धांवूं लागतात ! कानांतून वृत्तदर्पणांतल्या गण-मात्रांचीं अनोळखी अक्षरें घुमूं लागतात ! असं वाटतं त्या वेळीं कीं घ्यावा कागद आणि खरडावं कांहीं तरी ? घ्यावा कागद आणि खरडावं कांहींतरी !

शोभना : अय्या खरंच ? मग आजच्याहि तुमच्या कविता या अशा स्फूर्तीच्या झटक्यांतूनच जन्मल्या असतील ?

भद्रायु : मग काय शंका आहे ? थांब, दाखवतोंच तुला वाचून ! " असें म्हणून भद्रायु कविता म्हणण्यास तोंड उघडणार तेवढ्यांत शंतनु उपस्थित झाला ! शंतनु तावातावानें म्हणाला, " शोभना, तिकडे मंडळी खोळंबून बसली आहेत आणि हा काय चालला आहे तुमचा तमाशा— ? "

भद्रायु : अडाणी शिकाऱ्या, हा तमाशा नसून हें काव्यगायन आहे !

शंतनु : काव्यगायन करायला वेळ खूप शोधून काढली आहेत ? शरम वाटते आहे का कांहीं सांगायला ?

शोभना : शंतनु, खबरदार असं कांहीं बोलांल तर ! येत नाहीं आम्ही जेवायला ! —असला काव्यमय प्रसंग सोडून, म्हणे जेवायला या. तुम्हीच आधीं चालते व्हा पाहूं इथून !

शंतनु : अस्सं का? ऑल राइट! गुड बाय."—असें म्हणून शंतनूनें परत जाण्याकरितां तोंड वळविलं तोंच लांबून 'पडलों पडलों—आई ग!' अशी चंदूची करुण किंकाळी ऐकूं आल्यानें तो त्या किंकाळीच्या दिशेला धांवतच गेला. शोभना ती किंकाळी ऐकून खचूनच गेली. तिला काय करावें हेंच सुचेना. तिनें भद्रायूकडे बघितलें तर तो अगदीं स्वस्थपणें बसल्याजागींच कागदांची चाळवाचाळव करीत असलेला तिला दिसला. तेव्हां ती चिडून त्याला म्हणाली, "भद्रायु, अहो बघतां काय तुम्ही! चलाना तिकडे."

भद्रायु : शोभना—शोभावती—शुभांगी, लावण्यलतिके, येवढी एकच कविता आधीं ऐकून मग—

शोभना : लावण्यलतिका होरपळली चुलींत! भद्रायु, अहो तुम्हांला कांहीं काळवेळ आहे का? फेंकून द्या तुमचें तें काव्य! माझ्या जिवाचं अगदीं पाणी पाणी झालें आहे हो!" तेवढ्यांत शंतनु बेशुद्ध पडलेल्या चंदूला घेऊन तेथें आलाच. चंदूला त्या अवस्थेंत पाहातांच शोभनेचे पाय भीतीनें लटपटूं लागले. तिचा चेहरा पार पांढराफटक पडला. तरीहि चटकन् तिनें चंदूला मांडीवर घेतलें. शंतनूनें पुन्हां तेवढ्यांत पळत जाऊन आपला रुमाल भिजवून आणिला आणि तीं दोघें मिळून चंदूला शुद्धीवर आणण्याचा आटोकाट प्रयत्न करूं लागलीं. या साऱ्या घडामोडी चालू असतांना कवि भद्रायु मात्र जागचा हलला देखील नाहीं. त्या दोघांकडे पाहात तो स्वतःशींच पुटपुटत होता, "अहाहा, काय कारुण्यपूर्ण प्रसंग दिसतो आहे हा! चंदू शोभनेच्या मांडीवर मूर्च्छित होऊन पडला आहे! भीतीनं, दुःखानं आणि शोकानं तिचा सुंदर चेहेरा कसा अगदीं केविलवाणा झालेला आहे. ती त्याला मधून मधून प्रेमानें कुरवाळत आहे आणि हृदयभेदक आवाजांत हाका मारीत आहे! हा प्रसंग पाहून मला गडकऱ्यांच्या 'राजहंसा'ची आठवण होत आहे. काय काव्यामय प्रसंग आहे हा! बस्स! आतांच्या आतां या करुणप्रसंगावर असें एक सुंदर काव्य लिहितों—कीं जें वाचून अलम् महाराष्ट्रांतले फत्तर मुद्धां पाझरले पाहिजेत." असें स्वतःशींच पुटपुटत तो एकीकडे ज्या काव्यपंक्ती जुळवीत होता त्या पुढीलप्रमाणें होत्या.

हें कोण बोललें बोला।
चिंचेवर चंदू चढला!
आधींच कारटें हुड,
धांवतें कसें दुडदूड
की पूर्वजन्मिंचा सूड!
उगवला कुणी हा बोला। चिंचेवर चंदू चढला।

कांहीं वेळानें चंदू चांगला शुद्धीवर आला. त्याला उचलून खांद्यावर घेत शंतनु किंचित् छद्मीपणें शोभनेला म्हणाला, "शोभनाताई, मी जातों आतां याला घेऊन!...हो—म्हणजे उगाच तुमच्या काव्यगायनांत व्यत्यय नको!

शोभना : नाहीं—शंतनु, असं काय बरें बोलतां? मेलेल्याला मारण्यांत काय अर्थ आहे?

भद्रायु : थांब, शोभने—थांब! झालीच माझी कविता लिहून! तुला वाचून दाखवतों—

शोभना : भद्रायु, आग लावा तुमच्या साऱ्या काव्याला! भाटघरच्या धरणांत बुडवून टाका तुमचं तें सारं काव्य! काडीचीहि माणुसकी ज्याच्या अंगांत नाहीं तो काय काव्य लिहिणार कपाळ? वीट आला आतां मला तुमच्या त्या काव्याचा आणि तुमचा पण! शिकारी असूनहि ह्या शंतनूच्या अंगीं जी माणुसकी आढळली ती तुम्ही 'कवि' असूनहि तुमच्या अंगीं काडीचीहि न आढळावी ना? शंतनु, चला आतां. या काव्यकंगालाचें मुखावलोकन देखील नको यापुढें." असें म्हणत शोभना भद्रायूकडे अक्षरशः न पाहतांच तेथून चालती झाली.

कवि भद्रायु भाटघर भकास मुद्रा करून ती गेलेल्या दिशेकडे शून्य दृष्टीनें पहात तेथें तसाच कितीतरी वेळ बसून राहिला होता.

× × ×

त्रिपुरी आपल्या खोलींत अस्वस्थपणें येरझारा घालीत होती. गेल्या दोन दिवसांत मल्लिनाथाच्या वर्तनांत एक प्रकारचा तुटकपणा तिला आढळून येत होता. तो आपल्यापासून कांहींतरी लपवीत छपवीत आहे अशी पुसटती शंका

तिच्या मनांत येई. परंतु त्याला तसें तोंडावर विचारण्याचा धीर मात्र तिला होत नव्हता. अशा चमत्कारिक मानसिक अवस्थेंत ती असतांनाच तिला दारावरची घंटा वाजलेली ऐकूं आली. तिनें दार उघडून पाहिलें तों समोर सिद्धेश्वराची स्वारी उभी ! त्यानें आज प्रथमच केलेला तो साहेबी पोषाख पाहून तिला अति आश्चर्य वाटलें.

सिद्धेश्वर : गुड् डे त्रिपुरी, ओळखलंस का मला ?

त्रिपुरी : कोण सिद्धेश्वर ! तू होय ! खरंच मी प्रथम क्षणभर तुला ओळखलंच नाहीं !

सिद्धेश्वर : नाहीं ना ! मला वाटलंच तसं ! त्रिपुरी, अगदीं खरं सांग पाहूं मी या पोषाखांत कसा दिसतो तें !

त्रिपुरी : सिद्धेश्वर, खरं सांगूं, तूं आतां एखाद्या देवी डॉक्टरसारखा किंवा बार्शी लाइट रेल्वेच्या गार्डासारखा दिसतो आहेस !

सिद्धेश्वर : मला वाटलंच कीं तुला मी आवडेन या पोषाखांत म्हणून ! बरं पण तें असो. आज मी येथें एका महत्कार्यासाठीं उपस्थित झालों आहे. तुला सवड आहे ना थोडीशी ? मी कांहीं फार वेळ घेणार नाहीं तुझा ! फार झालं तर एक पाऊण तास लागेल मला. फक्त सात-आठ मुद्यांवरच बोलायचं आहे तुझ्याशीं.

त्रिपुरी : सिद्धेश्वर, एक्स्क्यूज मी, पण खरोखरीच मला आतां फारसा वेळ नाहीं. स्टुडिओंत जाण्याकरितां मी गाडीची वाट पहात आहें. ती येईपर्यंत जेवढे तुझे मुद्दे—

सिद्धेश्वर : ऑल राइट ! ऑल राइट ! त्रिपुरी, तुला सुरवातीलाच एक आनंदाची बातमी सांगतों. कालच आमची साडेसाती संपली. सुप्रसिद्ध पंचांगकर्ते होसारित्ति यांचं तसं पत्रच आलं आहे मला काल.

त्रिपुरी : पण माझ्या मागची साडेसाती मात्र अजून संपलेली दिसत नाहीं !

सिद्धेश्वर : तुला कोठची साडेसाती ? कन्या राशीला मुळींच नाहीं साडेसाती हल्लीं !

त्रिपुरी : छेः छेः ! माझ्या माहितीप्रमाणें हिंदुस्थानांत कन्या राशीला कायमचीच साडेसाती आहे !

सिद्धेश्वर : शूः ! असं भलतंच कांहींतरी बोलून आमच्या शास्त्राची थट्टा करूं

नकोस ! आतां हें विषयांतर थांबवून मूळ विषयावरच येतों. माझा पहिला मुद्दा—मूळ घराण्याचा इतिहास—कुलवृत्तान्त इत्यादि. मूळचे आम्ही कोंकणांतले महाडचे रहाणारे. आमचं गोत्र शांडिल्य. आडनांव 'गोरे' पण मूळचें नांव ' काळे '.

त्रिपुरी : मग तुम्ही ' काळ्या ' चे ' गोरे ' कसे झालांत ?

सिद्धेश्वर : ती हकिगत मनोरंजक असली तरी अप्रस्तुत आहे. तस्मात् अलमिति ! आतां दुसरा मुद्दा—वडिलांची माहिती, स्थावर-जंगम मिळकत, वार्षिक उत्पन्न इत्यादि. पण तें सारं तुला माहित आहेच—!—काय ?

त्रिपुरी : पण मला या तुमच्या साऱ्या कुळकथेशीं करायचं आहे काय ?

सिद्धेश्वर : तें आतां ओघाओघानें कळेलच तुला. तिसरा मुद्दा बालपण, शिक्षण इत्यादि. पण त्याबद्दलहि तुला मी कांहीं नव्यानें सांगावें असें नाहीं, खरं कीं नाहीं?

त्रिपुरी : सगळ्याच मुद्यांबद्दल हें खरं आहे ! बरं पण आतां किती राहिले आहेत तुझे मुद्दे ?

सिद्धेश्वर : झालं आतां जवळजवळ निम्म्यावर आलोंच आहें. चवथा मुद्दा संवयी, अंगांतले गुण, कला व स्वभाव. मला स्वतःला वाचनाचा फार नाद आहे. ज्योतिषाचं तर वेडच आहे ! लहानपणीं खेळाची आवड फार. नाटकांचंहि मला थोडंसं अंग होतं. आमच्या कॉलेजांत झालेल्या 'भावबंधनां'त मी केलेलं मोरूचं काम लोकांना फारच आवडलं होतं.

त्रिपुरी : खरोखर, तुला शोभेल असंच काम मिळालं होतं अगदीं !

सिद्धेश्वर : आतां माझ्या स्वभावाविषयीं सांगायचं तर मी अतिशय सालस आणि गोड माणूस आहें. माझ्या म्हणण्याचा भाग असा कीं, तुझा न् माझा स्वभाव जुळेल असाच आहे !—

त्रिपुरी : सिद्धेश्वर, यापुढें 'मला तुझ्याशीं लग्न करण्याची इच्छा आहे' हेंच तूं मला सांगणार आहेस ना ?—

सिद्धेश्वर : त्रिपुरी, तो माझा शेवटचा म्हणजे आठवा मुद्दा आहे. मी ओघाओघानें त्याच्याकडे येणारच होतों कीं !

त्रिपुरी : अरेरे ! तोच आधीं मांडला असतास म्हणजे ही सर्व आधींची व्यर्थ बातायात—

सिद्धेश्वर : व्यर्थ ? म्हणजे, आजचं आमचं हें सगळं हुकलंच कीं काय ?

त्रिपुरी : सूज्ञास अधिक सांगणें नलगे !

सिद्धेश्वर : हरे राम ! म्हणजे एकंदरींत आमच्या साडेसातीचं शेपूट अजून कांहीं संपलं नाहीं तर ! पंडित होसरिर्तीचा होरा सपशेल चुकल्यासारखा दिसतो आहे ! त्यांनीं लिहिलं होतं कीं मामाच्या गोत्रासकट आपलं गोत्र जुळतं—पवर जुळतात—कुंडली तर सोळा आणे जुळते ! म्हणजे पुन्हां आतां कुंडली तपासून घेणं आलं ! बरं, मी येतों आतां !

त्रिपुरी : चहा नाहीं घ्यायचा का ?

सिद्धेश्वर : चहा नको आतां ! चहा आतां कसला गोड लागणार मला !

त्रिपुरी : रागावलास वाटतं माझ्यावरती ?

सिद्धेश्वर : छट्—रागवायचं काय कारण ? एवढ्या तेवढ्या गोष्टीसाठीं मी काय रागावतों आहें ?

त्रिपुरी : देअर यू आर ! दॅट इज दी स्पिरीट ! थांब जरा. मी आत्तां चहा घेऊन येतें आंतून—त्रिपुरी चहा आणायला म्हणून आंत जाणार तोंच दारावरची घंटा जोरजोरानें कोणीतरी वाजवीत असलेलें तिला ऐकूं आलें. तिनें चटकन् पुढें होऊन दार उघडलें. दार उघडतांच शोभना, शंतनु व मिरा घाईघाईनें आंत आलीं. त्या तिघांचे उतरलेले चेहेरे पाहून त्रिपुरी मनांत चरकलीच. शोभनेनें तिला किंचित् बाजूला घेऊन विचारिलें, "त्रिपुरी, अग मल्लिनाथ कुठं आहेत ? सांग सांग लवकर—"

त्रिपुरी : कां ? असं कां विचारतेस तूं ? झालं तरी काय ? मल्लिनाथ आतांच्याच गाडीनें कलकत्त्याला गेले ! त्यांना जाऊन पंधरा मिनिटेंदेखील झालीं नसतील !

शंतनु : शोभने, तिला उगीच आतां घाबरवूं नकोस. त्रिपुरी, इकडे ये आधीं तूं.

त्रिपुरी : ही बघ आलें. पण आधीं मला सांग त्यांना कांहीं अपघात वगैरे तर—?

शंतनु : छेऽग ! अपघात बिपघात कुछ नहीं ! पण आधीं तूं मला हें सांग कीं तुला जाण्यापूर्वीं मल्लिनाथानं काय सांगितलं ?

त्रिपुरी : अरे ते फारच घाईत होते रे त्या वेळीं ! घाईघाईत त्यांनीं मला येवढेंच

सांगितलं कीं कंपनीसाठीं पांच लाख रुपये जमविण्याची व्यवस्था त्यांच्या एका मित्रानें केलेली आहे परंतु हे तेथें प्रत्यक्ष गेल्याशिवाय ती रक्कम हातीं पडणें जड असल्यानें त्यांना तिकडे जाणें भाग होतें. शिवाय आणखीहि पुष्कळ कामं त्यांना तिकडे होतीं तीं सर्वच उरकून एकदम महिन्यानें ते येणार असल्याचेंहि त्यांनीं सांगितलें मला.

शंतनु : बरं आणखी कांहीं ?

त्रिपुरी : आणखीना ? आणखी तसं कांहीं नाहीं !—हो ऽ,जातांना त्यांनीं खर्चा-करितां म्हणून माझ्याजवळून पंचशें रुपये नेले आहेत !

शंतनु : त्रिपुरी, आतां तुला खरं सांगूं का ?

त्रिपुरी : हें पहा आतां उगाच माझा अंत पाहूं नकोस ! लवकर सांग काय असेल तें !

शंतनु : तो पाजी माणूस कलकत्त्याला नाहीं तर मद्रासला जाणार होता !

त्रिपुरी : थट्टा तर करीत नाहींस शंतनु माझी ?

शंतनु : छेः ग ! अशी भलत्याच बाबतींत थट्टा कशी करेन मी ? आणि स्वारी या मिरेला घेऊन पळण्याच्या विचारांत होती !

त्रिपुरी : मग ही तुला कुठें आढळली ?

शंतनु : मिराला त्यानें स्टेशनासमोरच्या हॉटेलांत वाट पहात बसण्यास सांगितलं होतं. तीहि वेडी तिथें हातांत बॅग घेऊन वाट पहात बसली होती !

त्रिपुरी : पण तुला कसं कळलं हें सारं ?

शंतनु : अग मी त्या हॉटेलांत सिगारेट घेण्याकरितां म्हणून सहज गेलों होतों तों कोंपऱ्यांत या मिराबेन बॅगनिशीं बसलेल्या दिसल्या. तिची ती कावरीबावरी मुद्रा पहातांच मी हेरलेंच कीं ही 'लघुकथा लेखिका' कांहीं तरी 'अद्भूत' गोष्ट करण्याच्या विचारांत आहे !

मिरा : मी मुळीं यापुढें गोष्टच लिहिणार नाहीं !

शंतनु : कशाला लिहाल आतां ? ही एकच गोष्ट आतां तुम्हाला भरपूर कीर्ति मिळवून देईल ना !—तर त्रिपुरी, मी तिच्याजवळ चवकशी केली. प्रथम कांहीं

वेळ पत्ताच लागूं देईना. पण जरा अधिक छेडतांच सार्‍या गोष्टी भडाभडा सांगून टाकल्यान्. ही भिंगरी मद्रासला मल्लिनाथाबरोबर जाऊन म्हणे रजिस्टर मॅरेज करणार होती आणि तो मग तिला स्क्रीन लाईनमध्यें हिरॉइनचा चान्स देणार होता ! हें सारं ऐकतांच माझ्या डोक्यांत लख्ख प्रकाश पडला ! मग मात्र हिच्याशीं अधिक चर्चा करीत न बसतां सरळ हात पकडला, टांग्यांत घातली आणि घेऊन आलों इथें !

सिद्धेश्वर : आणि त्या पाजी मल्लिनाथाचा काय पत्ता ?

शंतनु : तो मात्र माझ्या हातांतून निसटला ! तथापि, मी पोलिस स्टेशनावर खबर देऊन ठेवलेली आहे. कदाचित् तास दीड तासांत तो पकडलाहि जाईल असा माझा अंदाज आहे.

ही सारी हकिगत ऐकून त्रिपुरीचा चेहरा पार उतरून गेला. भोंवतालच्या सार्‍या वस्तु गर्रकन् आपल्याभोंवतीं फिरल्यासारख्या तिला वाटल्या. धाडकन् तिनें कोचावर अंग टाकून दिलें.

तेवढ्यांत कवि भद्रायूची स्वारी तेथें उपस्थित झाली. त्यानें आल्याबरोबर बातमी दिली कीं, रावबहाद्दुरांकडे पोलिस मल्लिनाथाला पकडून घेऊन आले. होते पण मल्लिनाथानें त्यांच्यापुढें माफीकरितां साष्टांग नमस्कार घालतांच रावबहाद्दुरांनीं 'या माणसाविरुद्ध आमची कांहींहि तक्रार नाहीं' असें सांगून त्यास सोडून देण्याबद्दल पोलिसांना सांगितलें ! एवढेंच नव्हे तर त्याला प्रवासखर्चीकरितां म्हणून पांच रुपये देऊन ते म्हणाले, "हें बघ, यापुढें नीट नेमानें नमस्कार घालीत जा ! म्हणजे तुझ्या मनांत असले विचारहि यायचे नाहींत आणि तुझ्या हातून भलतं सलतं कांहीं व्हायचंहि नाहीं !" भद्रायु आणखीहि कांहींतरी सांगणार होता परंतु तेवढ्यांत स्वतः रावबहाद्दूरच तेथें उपस्थित झाल्यानें त्याला तोंड आवरतें घ्यावें लागलें. रावबहाद्दूर आंत येतांच सर्वांनीं त्यांच्यावर मल्लिनाथाला सोडण्याबद्दल एकच गहजब करून सोडला !

शोभना : बाबा, साष्टांग नमस्कार आहे तुम्हांला अगदीं ! तुमचा कोणी गळा

कापला तर तुम्ही त्याच्या गळ्यांत गळा घालाल. त्या सर्पाचं डोकं तुम्ही तेथल्या तेथेंच कां ठेचलं नाहींत ?

शंतनु : मी तिथें असतों तर गोळीच घातली असती त्याला !

सिद्धेश्वर : मी तर शनीचा मंत्रच मारला असता त्याला !

भद्रायु : मी तर त्याला असा एकच फटका दिला असता कीं—

रावबहादूदूर : म्हणजे काव्यांतला ना ? तुम्ही अगदीं अनंतफंदीचे बापच कीं !

रावबहादूदूरांच्या त्या अनपेक्षित कोटीक्रमानें त्या तशा परिस्थितींतहि साऱ्यांनाच हंसूं लोटलें. हंशाचा भर ओसरल्यावर सगळ्यांना उद्देशून रावबहाद्दूर शांतपणें म्हणाले, " अरे वेड्यांनो, दुसऱ्यावर सूड घेतांना आपल्या खाजगी गोष्टी का वेशीवर टांगून द्यायच्या असतात ? तुम्हां तरुण मंडळींना हें कळायचं नाहीं बाबांनो ! आणि शिवाय माझें आपलें हें नक्की ठरलेलें आहे कीं, जो माणूस आपल्याला साष्टांग नमस्कार घालील त्याच्या केंसालाहि पण धक्का लागून द्यावयाचा नाहीं ! उद्यां कोणी माझ्या घराला आग लावली आणि मला नमस्कार घातला तर मी त्याला क्षमा केल्याशिवाय राहणार नाहीं ! नमस्काराचं सामर्थ्य माहित नाहीं महाराज तुम्हांला ! आतां चला, या आनंदाच्या भरांत आपण वर गच्चीवर जाऊन सूर्यनारायणाला नमस्कार घालूं या ! "

त्यावर शंतनु चेष्टेनें म्हणाला, "सूर्यनारायणाऐवजीं तुम्हांलाच आम्ही सारे आतां साष्टांग नमस्कार घालतों !" आणि शंतनूसह साऱ्यांनीं अक्षरशः रावबहाद्दुरांपुढें साष्टांग नमस्कार घातला !



## प्रकरण....११ वें

१९३३ ते १९४० या कालखंडांत मराठी रंगभूमीला प्रगतीचे व वैभवाचे दिवस प्रायः ज्यांच्यामुळें दिसूं शकले त्या 'नाट्यमन्वंतर' व 'बालमोहन' या नाटक कंपन्या १९४० च्या सुमाराला जवळ जवळ नामशेषच झाल्या. १९३५ च्या सुमारास 'नाट्यमन्वंतर' आपआपसांतील मतभेदामुळें मोडली गेली व या कंपनीच्या निमित्तानें एकत्र आलेला श्री. केशवराव दाते, केशवराव काळे, आळतेकर, केशवराव भोळे, ज्योत्स्ना भोळे, सुधा आपटे, पद्मा वर्तक हा अभिनयकुशल व नव्या दृष्टीच्या कलावंतांचा अपूर्व संच पुन्हां चौफेर पांगला गेला. अत्रे चित्रपटसृष्टीकडे वळल्यांमुळें त्यांच्या नाटकांधारेंच मुख्यत्वेंकरून प्रसिद्धीस आलेली 'बालमोहन नाटक मंडळी' अगदींच निष्प्रभ झाली. यामुळें १९४० सालच्या अखेरीस मराठी रंगभूमि अगदीं मोडकळीस आलेली दिसूं लागली. या सात-आठ वर्षांत कांहीं जुन्या मुरब्बी नाटककारांनीं व कांहीं नव्या होतकरू नाटककारांनीं आपापल्यापरी रंगभूमीला चैतन्य प्राप्त करून देण्याचे जे प्रयत्न चालविले आहेत ते कांहींना कांहीं कारणांनीं तितकेसे प्रभावी होऊं शकलेले नाहींत. माधवराव जोशी यांनीं 'उधार उसनवार' (१९४६) व प्र. के. अत्रे यांनीं 'जग काय म्हणेल' (१९४६) व 'पाणिग्रहण' (१९४७) हीं नाटकें अलिकडच्याच काळांत लिहिलीं असलीं तरी त्यांच्या कर्त्यांचा जुना कस त्यांत नाहीं हें अगदीं उघड आहे. इब्सेनच्या 'डॉल्स हाऊस' या सुविख्यात नाटकाचें श्री. अनंत काणेकर यांनीं केलेलें 'घरकुल' (१९४१) हें रूपांतर लोकप्रिय होऊं शकलेलें नाहीं. श्री. भा. वि. वरेरकरकृत 'संन्याशाचें लग्न' (१९४५) व श्री. माधव मनोहर यांनीं कॅरेल कॅपेकूकृत 'मदर' या नाटकाचा केलेला 'आई' (१९४२) हा अनुवाद कलादृष्ट्या मराठी रंगभूमीला अत्यंत अभिनव व प्रगतिकारक असा दृष्टिकोन देऊं शकणारा असूनहि प्रयोगाभावीं अजून तो केवळ पुस्तकरूपानेंच बाजूला पडून आहे. श्री. नागेश जोशीकृत 'देवमाणूस' व श्री. ह. वि. देसाईकृत 'अर्ध्या वाटेवर' ह्या

श्री. मोतिराम गजानन रांगणेकर



जन्म : १९०७

नाट्यप्रयोगांचे शंभरावर प्रयोग झाले आहेत तरी त्यांनीं मराठी रंगभूमीला कांहीं विशेष मानाला चढविलें आहे वा लोकाभिरुचींत कांहीं विशेष बदल केला आहे असें म्हणणें जरा जडच जाईल. या गेल्या सात-आठ वर्षांत नाट्यतंत्रांतील संवाद, संविधानक व प्रयोगदृष्ट्या अगदीं क्रांतिकारक जरी नाहीं तरी बरीच प्रगतिकारक व यशस्वी अशी नाट्यरचना सातत्यानें व निष्ठेनें करीत राहण्याचें श्रेय मुख्यतः श्री. मोतिराम गजानन रांगणेकर यांसच द्यावें लागेल.

श्री. रांगणेकर यांनीं आतांपर्यंत एकूण सात नाटकें व तीन एकांकिका लिहिलेल्या आहेत.

**नाटकें :** ' आशीर्वाद ' (१९४१), ' कुलवधू ' (१९४२), ' नंदनवन ' (१९४२), ' कन्यादान ' (१९४३), ' अलंकार ' (१९४४), ' माझें घर ' (१९४५), ' वहिनी ' (१९४५).

**एकांकिका :** ' फरारी ', ' सतरा वर्षें ', ' तुझं माझं जमेना ' (१९४७).

नाट्यक्षेत्रांत पडण्यापूर्वीं त्यांत करावयाच्या कार्याबद्दल रांगणेकरांच्या कांहीं कल्पना निश्चित झालेल्या दिसतात. नाटकाला अटळ असलेल्या बोलपटाशीं स्पर्धा करण्याच्या दृष्टीनें नाटकाचा कालावधि, भाषा व प्रयोग या बाबतींत कोणकोणत्या सुधारणा करावयाच्या तें त्यांनीं प्रारंभापासूनच ठरविलें होतें. त्याची स्वच्छ कल्पना त्यांनीं आपल्या ' आशीर्वाद ' नाटकाच्या दुसऱ्या आवृत्तीच्या प्रस्तावनेंत खुलासेवार दिली आहे. त्यांतील कांहीं महत्त्वाचा भाग पुढें देत आहें :

" नाट्य-निकेतन ही संस्था आम्ही स्थापन केली तेव्हां (१९४१) ' आशीर्वाद ' हें मुहूर्ताचें नाटक मी लिहिलें. त्यापूर्वीं मराठी रंगभूमि मृतप्राय झाली होती व तिला ही अवकळा बोलपटामुळें आली, असें म्हणण्याची फॅशन पडली होती. जुनींपुराणीं नाटकें आणि जुनी चाकोरी यांतूनच प्रवास करणारी रंगभूमि, बदलत्या काळाच्या ओघांत, आसन्नमरण व्हावी यांत नवल नव्हतें... ' नाट्यनिकेतन ' ही संस्था स्थापन करतांना आम्हीं या बाबतींत कसोशीनें प्रयत्न करण्याचें ठरविलें; आणि ' आशीर्वाद ' नाटक लिहितांना सर्वतोपरी

**नवीन सजावट** प्रेक्षकांपुढें उभी कशी करतां येईल, याचा विचार करून तें नाटक लिहिलें. **तीन तासांचें नाटक** लिहिणें मला दोन कारणांसाठीं अवश्य वाटलें. एक थिएटरची उणीव आणि दुसरें बोलपटांचें आकर्षण...अडीच-तीन तासांत विपुल करमणूक करणारे बोलपट लोकांना जास्त जास्त आवडूं लागल्यामुळें, पाल्हाळिक संवादांचीं जुनीं नाटकें प्रेक्षकांना कंटाळवाणीं वाटूं लागलीं... तेव्हां तीन तासांच्या अल्पकाळांत **आटोपशीर पण चित्तवेधक संवाद** लिहिणें ही मला महत्त्वाची गोष्ट वाटली. आणि त्याहीपेक्षां जर पटलें असेल तर तें हें, कीं भाषेची रोषणाई करण्यापेक्षां कथानकाचा वेग वाढविणारी साधी, सुटसुटीत आणि श्रोत्यांच्या मनाचा वेध घेणारी भाषा वापरणें, हें होय....**नाटक वाचण्यासाठीं लिहावयाचें नसून पाहण्यासाठीं** लिहावयाचें असतें, याची पूर्वीपेक्षांही आजच्या बोलपटाच्या जमान्यांत तीव्रतेनें जाणीव होण्याची आवश्यकता उत्पन्न झाली आहे......

...'आशीर्वाद' नाटक प्रथमतः रंगभूमीवर आणतांना मी विष्णुपंत औंधकर, चिंतामणराव कोल्हटकर, ज्योत्स्ना भोळे, आशालता वगैरे नटनटी यांचें सहकार्य मिळविलें होतें. माल कितीही चोख असला तरी तो आकर्षक रीतीनें गिऱ्हाइकांपुढें मांडणें हें विक्रेत्याचें कर्तव्य असतें. ही व्यवहारनिपुणता आहे......कलेच्या नांवानें आक्रोश करीत बुडून मरण्यापेक्षां, धंद्याच्या आश्रयानें कलेची सेवा करणें मी केव्हांही जास्त मातब्बरीचें समजतों......"

रांगणेकरांचीं सर्व नाटकें त्यांची ही भूमिका सार्थ करणारीं अशींच आहेत. कथेला उलटसुलट पेंच पडत गेल्यामुळें उत्तरोत्तर आकर्षक होत जाणारें कथानक, मतिमान् व मार्मिक संवाद, अकृत्रिम परंतु अत्यंत परिणामकारक असा विनोद, आटोपशीर पण आकर्षक अशी सजावट व उत्तम प्रयोग—या गुणांमुळें आज त्यांचीं बहुतेक नाटकें लोकप्रियतेच्या शिखरावर आहेत. त्यांचें 'माझें घर' हें नाटकहि वर उल्लेखिलेल्या सर्वगुणांनीं संपन्न असेंच आहे. एकत्रकुटुंबपद्धतीचे कट्टे पुरस्कर्ते व आपल्याला स्वतःला त्यांतील अनभिषिक्त राजाच समजणारे श्री. नानासाहेब परांजपे यांच्या जाच-जुलमाची—हेकेखोर हुकूमशाही

वृत्तीची प्रतिक्रिया त्यांच्या घरांतील तरुण पिढीकडून—मुलगे नारायणराव व बाजीराव, मुलगी शांता व सुना लक्ष्मी व शोभा त्यांच्या प्रकृतीधर्मानुसार कशी अगदीं निरनिराळ्या स्वरूपाची झाली याचें मोठें मार्मिक व उद्‌बोधक असें चित्र या नाटकांत रेखाटलेलें आहे.

'माझें घर' या नाटकाचा पहिला प्रयोग ता. ३१ ऑगस्ट १९४५ रोजीं मुंबई येथील ग्रँटरोडवरील 'नॉव्हेल्टी' थिएटरांत 'नाट्य-निकेतन' या नाटक मंडळीनें करून दाखविला. हें नाटक गोष्टरूपानें पुढें दिलें आहे.

## माझें घर

नाटककार
**मोतिराम गजानन रांगणेकर**

"तूं सून आहेस घरांतली. हें घर आमचं आहे. इथं आम्हीं म्हणूं तसं सगळ्यांनीं राहायला हवं. मनांत असो वा नसो–एकाच घरांत राहणारीं सारीं माणसं मरेपर्यंत तिथंच राहिली पाहिजेत. कुटुंबांत प्रत्येकाला मत असून चालत नाहीं. घरांतल्या कर्त्या माणसानं जें ठरवलं तें सगळ्यांनीं ऐकलं पाहिजे; तरच कुटुंब-संस्था टिकते. प्रत्येकाला मतस्वातंत्र्य असलं तर एका घराचीं दहा शकलं होतील. मी जिवंत आहें तोंपर्यंत माझ्या मतानंच साऱ्यांनीं चाललं पाहिजे. समजलं ?"

ही 'समज' नानासाहेब परांजपे हे आपली सून लक्ष्मी हिला देत होते. समजच द्यावयाची असल्यामुळें त्यांनीं आवाज कमालीचा उंचावला होता. कुटुंबांतील कोणत्याहि व्यक्तीनें त्यांच्या अगदीं क्षुल्लक आज्ञेचाहि भंग केला तरी त्यांचा आवाज तत्क्षणीं एकदम इतका उंचावला जात असे. आणि ह्या उंचावलेल्या आवाजांत जें भाषण ते अशा वेळीं करीत त्यांत 'घराची मालकी', 'एकत्र-कुटुंबपद्धतीचे फायदे' 'मतस्वातंत्र्याचे तोटे', 'घराचीं शकलें होण्याची धास्ती' वगैरे मुद्दे अगदीं ठराविक पद्धतीनें व न चुकतां मांडले जाऊन शेवटीं 'राणा-भीमदेवी' थाटांत स्वतःच्या मृत्यूची धमकी देऊन ते त्या भाषणाचा समारोप करीत. गेलीं तीन तपें नाना हें भाषण यत्किंचितहि मोका मिळतांच आपल्या

कुटुंबियांपुढें करीत आलेले होते. आणि कुटुंबांतील सारी मंडळी तें भाषण, 'राणाभीमदेव' लोकप्रियतेच्या शिखरावर असतांना त्याचे श्रोते ज्या श्रद्धेनें त्याचीं भाषणें ऐकत व थरारून जात त्याच श्रद्धेनें आजतागायत ऐकून घेऊन थरारले जात ! आजचाहि प्रसंग तसाच होता.

कुटुंबांतील साऱ्या मंडळींचा एकत्र फोटो काढण्याचा बेत आज नानांनीं केला होता. अर्थात फोटोंत प्रत्येकानें कोठें, कसें व कोणत्या पोषाखांत बसावयाचें हें नानांनीं स्वतः जातीनें ठरवून दिलें होतें. ठरल्याप्रमाणें त्यांचा थोरला मुलगा नारायण, मुलगी शांता व पत्नी पार्वती ही मंडळी आपआपल्या पोशाखांनिशीं फोटोकरितां म्हणून जय्यत तयार झाली. प्रत्येकानें अगदीं नानांनीं सांगितल्या बरहुकूम पोषाख केले होते. धाकटा मुलगा बाजीराव व सून लक्ष्मी हीं दोघें मात्र कोठें दिसत नव्हतीं. नानाहि जांभळा रुमाल, पार्शी फॅशनचा कोट, हातांत चांदीच्या मुठीची काठी अशा आपल्या 'खास फोटो'च्या पोषाखानिशीं माडीवरून खालीं येत होते. जिन्यावरून उतरतां उतरतांच त्यांनीं पुकारिलें, "चला, झाले का सगळे तयार ?"

शांता : पण बाजीराव आहे कुठं ?

नाना : पहा, त्याला जातांना चार चारदां बजावून सांगितलं होतं, कीं अगदीं कुठं बाहेर जाऊं नकोस. आणि गेलास तर वेळेवर ये. पण त्याच्यां पायावर नक्षत्र पडलं आहे ना !

पार्वती : गेला असेल पंजाबला !

नाना : पंजाबला ?—म्हणजे ? काय ग शांता ? काय भानगड आहे ही ?

शांता : किनई नाना, त्याच्या खिशांत मघां मीं एका मुलीचा फोटो पाहिला, पंजाबी ड्रेस घालून काढला होता.

नाना : म्हणजे—नारायण, काय प्रकार आहे हा ?

नारायण : मला कुठं काय सांगितलं आहे त्यानं ? पण आल्यावर विचारायला हवं त्याला.

नाना : अलबत् विचारायला हवं. म्हणजे आहे काय हें ? घरांत सून आणायची,

ती आम्हीं का त्यानं ? बाजीरावच दिसतो मोठा ?

पार्वती : मोठ्या प्रेमानं बाजीराव नांव ठेवलंत ना त्याचं ! तें खरं करून दाखवतो आहे.

नाना : तें आपलं आम्हीं पेशव्यावरील प्रेमानं ठेवलं. म्हणून काय हाही बाजीराव मस्तानी घेऊन येणार ? अरे वा: ! आणि लक्ष्मी कुठं दिसत नाहीं ती ?

नाना शेवटचें वाक्य म्हणत असतांनाच लक्ष्मी बाहेर आली. परंतु लक्ष्मीचा पोषाख पाहतांच सारे आश्चर्यानें स्तंभितच झाले कारण नानांनीं ठरवून दिलेला नऊवारी लफ्फेदार शालू, ठसठशीत नथ व गोठपाटल्यांऐवजीं लक्ष्मी पांचवारी जॉर्जेटची साडी, पाठीवर केंसाचा शेपटा व हातांत दोन-दोन सोन्याच्या बांगड्या—अशा वेषभूषेंत बाहेर आली होती.

पार्वती : अगबाई ! हें काय ?

शांता : हें काय वहिनी ?

आणि नानांनीं "आं ? म्हणजे आहे काय हें ?" असे आश्चर्योद्गार काढून प्रारंभीं दिलेली समज लक्ष्मीला आपल्या खड्या आवाजांत ऐकविली. त्यांच्या त्या कडकडाटानें माणसेंच काय पण सारें घर हादरून गेलें. एकट्या लक्ष्मीवर मात्र त्या भाषणाचा कांहींचाहि परिणाम झालेला दिसला नाहीं ती तें सारें भाषण शांतपणें ऐकत उभी होती नाना मात्र बोलतां बोलतां इतके संतापले होतें कीं, शेवटीं शेवटीं त्यांच्या तोंडून शब्दहि निघणें मुष्कील होऊं लागलें होतें. परंतु लक्ष्मी आपला पोषाख बदलण्यास बिलकुल तयार होईना. शेवटीं पार्वतीबाई वैतागानें तिला म्हणाल्या, " अग झालं तरी काय तुला आज ? "

लक्ष्मी : कांहीं नाहीं. हें पातळ नेसावसं वाटलं मला आज

पार्वती : अग पण फोटो काढायला जायचं आहे—सांगितलं होतं ना तुला ?

लक्ष्मी : फोटो माझा काढायचा आहे, असं वाटलं मला. माझ्या शालूचा आणि दागिन्यांचा फोटो काढायचा असला, तर ते घेऊन जा बरोबर. मग मी कशाला आणखी येऊं ?

नाना : नारायण, तुझी बायको आज भारी चढेल झालेली दिसते आहे.

पार्वती : कधीं आजपर्यंत एक अ काढला नाहीं तोंडून आणि आजच काय हिला झालं म्हणतें मी ?

शांता : आणि शिकली तरी कुठं हें असं बोलायला ?

लक्ष्मी : तें शिकायला कॉलेजांत जावं लागत नाहीं. अनुभवानं हें शिक्षण मिळतं. लग्नापूर्वी मी किती उमेद्दी बाळगल्या होत्या. पण आज दोन वर्षांत त्यांचा चक्काचूर झाला आहे. या घरांतलं फर्निचर आणि मी यांत मला फारसा फरकच वाटत नाहीं. मला स्वतःला कांहीं आवडीनावडी असतील, इच्छा असतील, भावना असतील, असं तुम्हांला चुकून देखील कसं वाटत नाहीं ? फोटो काढायला जातांना मी काय नेसायचं तें देखील मी ठरवायचं नाहीं ?

नाना : काय रे नारायण, काय म्हणते आहे ही ?

नारायण : म्हणजे–ही–अग,—

नाना : असं ' तत पप ' काय करतोस ? हा फोटो काढायचा का अवतार ? बोल कीं तूं.

नारायण : मी काय सांगूं ? ती फोटोला यायला पहिल्यापासूनच तयार नव्हती.

नाना : कां ?

लक्ष्मी : एवढ्यासाठींच, कीं ज्या कुटुंबांत ऐक्य नाहीं, सुख नाहीं, आणि परस्परांबद्दलची मायाहि नाहीं, त्या कुटुंबानं असा ' फॅमिली ग्रुप ' काढून आपल्या आणि लोकांच्याहि डोळ्यांत धूळ फेंकण्याचं कारण नाहीं. मी या घरांत कुणीच नाहीं, ही जाणीव असतांना गौरीसारखी फोटोंत सजून बसायला माझी मुळींच तयारी नाहीं.

नाना : म्हणजे या घरांत काय तूं सत्ता गाजवायला पाहाते आहेस ?

लक्ष्मी : सुनेला हक्कानं जेवढी सत्ता प्राप्त होते, तेवढीच सत्ता हवी आहे मला.

नाना : आम्हीं जिवंत असतांना ? शक्य नाहीं. या घरांत असली सत्ता तुला आम्हीं जिवंत असेतोंपर्यंत मिळणं शक्य नाहीं.

लक्ष्मी : मग असल्या घरांत एक निर्जीव बाहुलं म्हणून राहाणं मलाहि शक्य नाहीं.

पार्वती : म्हणजे कुठं जाणार तूं ?

लक्ष्मी : जगाच्या पाठीवर यांच्याबरोबर कुठंहि संसार करीन." असें म्हणून ती ताडकन् आंत निघून गेली. नारायणहि तिच्या पाठोपाठ जाण्याच्या बेतांत होता.

नाना : नारायण—लक्षांत ठेव, तूं आमचा मुलगा आहेस—या घराचा उंबरठा तुला ओलांडतां येणार नाहीं—

पार्वती : तो काय जातो ? पंचवीस वर्षें माया लावली आहे त्याला आमची. ही काल-परवां घरांत आलेली.

नाना : काय वाटेल तें झालं तरी घर मोडूं देणार नाहीं मी. प्रत्येकजण असा सवता सुभा करायला लागला तर घराचीं शकलं होऊन जातील. मनांत असो वा नसो—एकाच घरांत राहणारीं सारीं माणसं मरेपर्यंत तिथंच राहिलीं पाहिजेत. बदला ग कपडे. फोटो रद्द." असें म्हणून नाना तावातावानें माडीवर निघून गेले. हॉलमध्यें आतां फक्त पार्वती व शांताच तेवढ्या राहिल्या. झाल्या प्रकारानें त्यांचीं डोकीं सुन्न होऊन गेलीं होतीं. एकमेकींशीं बोलण्याचाहि त्यांना धीर होत नव्हता. त्या अशा चमत्कारिक मनःस्थितींत असतांनाच तेथें अचानकपणें नानांचा धाकटा मुलगा बाजीराव हा आला. त्याच्याबरोबर एक तरुण अपरिचित मुलगीहि दिसत होती; त्या दोघांनीं तर पोषाखाबाबतींत लक्ष्मीवरहि ताण केली होती. बाजीरावानें अंगांत बुश कोट घातला होता व त्या मुलीनें पंजाबी पोशाख पेहेरला होता. त्या दोघांचे ते पोषाख व हातांत हात घालून घरांत येणं पाहून पार्वती व शांता चकितच झाल्या !

बाजीराव : चला आम्हीं अगदीं वेळेवर आलों नाहीं ?

पार्वती : वाः तें काय विचारावं ? आणि कायहो बाजीराव, ही कोण आणली आहेत बरोबर मस्तानी ?

बाजीराव : हिचं नांव शोभा. शोभा, कर सासूबाईंना नमस्कार—

पार्वती : काय मांडला आहेस पोरखेळ हा—?

बाजीराव : आई, नाहीं का पसंत तुला सून ही ? म्हटलं आज अनायसीं 'फॅमिली ग्रुप' निघायचा आहे तर हिलाहि मांडावी त्यांत—!

शांता : म्हणजे हे फोटोंत घालायचे का कपडे ?

बाजीराव : हो—छान दिसतील ते फोटोंत !

शांता : हो तर ! तुझ्या वहिनीलाहि दे मडमेचे कपडे आणून. ही पंजाबीण, ती मडम, आणि आम्हीं या अशा !

बाजीराव : मोठा छान ' ग्रुप ' होईल, नाहीं ? पण नाना कुठं आहेत ? आणि वहिनी कुठं गेली ? नारायणहि दिसत नाहीं !—चला म्हणावं लवकर फोटोला.

शांता : फोटोचा बेत नानांनीं रद्द केला आहे.

बाजीराव : म्हणजे ?

शांता : म्हणजे वहिनी फोटोसाठीं यायला तयार नाहीं. समजलं ? जा ह्या तुझ्या पंजाबिणीला घेऊन आलास तसा. चल ग आई "—असें म्हणून शांता पार्वतीचा हात धरून बाजूच्या खोलींत रागारागानें निघून गेली. त्या दोघी निघून गेल्यावर शोभा बाजीरावाला म्हणाली, " म्हणजे आपण येवढी जी फोटोची तयारी केली ती फुकटच जाणार का आतां ? "

बाजीराव : फुकट कशाला जाते ? आपण दोघंच जाऊं फोटो काढायला. पण थांब, मला जरा वहिनीला भेटूं दे."

तेवढ्यांत लक्ष्मी व नारायण तेथें आले. त्या दोघांच्या हातांत एक एक बॅग होती. तीं दोघेंहि बाहेर पडण्याच्या तयारींत दिसलेलीं पाहून बाजीरावानें आश्चर्यानें विचारिलें, " औ—हें काय ? अरे, तुम्हीं कुठं चाललां ? "

नारायण : अरे, असा मोठ्यानं ओरडूं नकोस.

बाजीराव : अग पण वहिनी, हा दादा नानांना आणि आईला सोडून घराबाहेर पडायला तयार झालाच कसा ?

लक्ष्मी : ते तयार झाले नाहींत. मी त्यांना तयार केलं आहे. चाललों हं भावोजी आम्हीं. तुम्ही दोघं आनंदांत रहा इथं. शक्य तों कुणाला दुखवूं नका बरं !"

लक्ष्मी घराबाहेर पडली. नारायणहि जड पावलांनीं तिच्या पाठोपाठ गेला. हा सारा प्रकार पाहून शोभा पार गोंधळून गेली. ती बाजीरावाला म्हणाली, " हें काय ? मी आलें आणि तुमची वहिनी गेली. "

बाजीराव : सीतावनवास आहे हा ! फरक इतकाच, कीं पुराणांत रामाबरोबर

सीता गेली आणि इथं सीतेनं रामाला खेंचून नेलं.

शोभा : मग आतां युवराज भरताचा काय विचार आहे ?

बाजीराव : राजा दशरथाला सामना द्यायचा !

× × ×

नारायण आणि लक्ष्मी घरांतून गेल्यापासून नाना पार खचून गेले होते. गोष्टी या थराला येतील अशी त्यांना कल्पनाच नव्हती. कारण गेल्या तीन तपांत कांहीं यःकिंचित् कारणाकरितांहि घरांत कोणी त्यांचा शब्द खालीं पडूं दिला नव्हता. विशेषतः नारायण असलें कांहीं तरी 'विपरीत' करील अशी पुसटशी शंकाहि कधीं त्यांच्या डोक्यांत यापूर्वी आलेली नव्हती. कारण नारायण हा त्यांचा पहिलाच मुलगा असल्यामुळें त्यांनीं आपल्या ऐन उमेदींत व त्याच्या अगदीं कोंवळ्या संस्कारक्षम अशा वयांत स्वतःचें 'प्रमुखत्व' व कुटुंबांतील इतर घटकांचें 'गौणत्व' त्याच्या मनावर इतकें पक्कें ठसवून दिलें होतें कीं, तो नानांच्या खेरीज इतर कोणाच्या किंवा स्वतःच्या मतानें कांहीं करील ही त्याच्याबाबतींत एक अशक्य कोटींतील गोष्ट होती ! परंतु आज नानांच्या दुर्दैवानें ही गोष्ट शक्य कोटींतील झाली होती, एवढेंच नव्हे तर गेल्या दोन महिन्यांत त्या दोघांपैकीं कोणीहि नानांच्या घरांत चुकून सुद्धां डोकावलें नव्हतें. नानांच्यापेक्षां पार्वतीबाईंना ही गोष्ट फार लागून राहिली. कारण इतर दोन्ही मुलांपेक्षां नारायण स्वभावानें फार दुबळा—परतंत्र आहे ह्या त्याच्यांतील वैगुण्याच्या जाणिवेमुळेंच त्याच्यावर त्यांचा अधिक जीव असे. दुसऱ्यांवर सत्ता गाजविण्याची हौस असलेल्या माणसांचा हा प्रकृतिधर्मच आहे. नानांचें मनोदुःख जरा वेगळ्या प्रकारचें होतें. नारायण घरांतून गेल्यामुळें होणाऱ्या यातनांपेक्षां सहस्रपट अधिक यातना एकत्रकुटुंबपद्धतीच्या त्यांच्या आदर्शाला तडा गेल्यामुळें त्यांच्या मानी मनाला होत होत्या. घराबाहेरील जगांतील प्रत्येकजण आपल्याकडे बोट करून 'एवढंसं वीतभर घर तुम्हांला शाबूत ठेवतां येत नाहीं ना ?' अशा अर्थाचा उपहासगर्भित प्रश्न आपल्याला विचारीत आहे असा त्यांना क्षणोक्षणीं भास होई आणि या विचाराच्या जाणिवेनें त्यांना अधिकच

खचल्यासारखें होई. त्यांच्या मनाचा पूर्वीचा तो कणखरपणा—ताठरपणा हळु हळु ढांसळत जाऊन त्याऐवजीं एक प्रकारचा दुबळेपणा—कमकुवतपणा त्यांच्या मनोभूमींत हळु हळु परंतु निश्चितपणें प्रवेश करीत होता. नानांच्या ह्या वाढत्या दुबळेपणाबरोबर कुटुंबांतील इतर घटक मात्र दिवसेंदिवस अधिकाधिक प्रबळ होत होते. वट्ट अंबाडा, नऊवारी महेश्वरी लुगडें, कपाळाला ठसठशीत कुंकू व हाताच्या मधल्या बोटांत एक बदामाची अंगठी—अशा थाटानें केवळ नाकासमोर पाहात अगदीं वेळेवर कॉलेजांत जाऊन तास संपतांच त्याच पावलीं परतणारी त्यांची शांता आताशीं पाठीवर दोन वेण्या, पांचवारी प्रिंटेड पातळ, कपाळीं एवढीशी टिकली व भांगांत बंगाली पद्धतीचें कुंकू नि हातांत दोन दोनच नक्षीदार बांगड्या—अशा अगदीं अद्यावत् वेषभूषेनिशीं कॉलेजांत जाऊन कॉलेज सुटल्यावर बरीच उशीरां घरीं परत येऊं लागली होती. 'एक्स्ट्रॉ तास', 'लायब्ररींत वाचन करणें', 'मैत्रिणीकडे अभ्यासाला जाणें', 'प्रोफे-सरांकडे डिस्कशनला म्हणून जाणें'—वगैरे घराबाहेर जाण्याचीं बरींच निमित्तें ती अलिकडे सांगूं लागली होती. नानांना हें बिलकुल खपत नसे. परंतु पार्वती-बाईच स्वतः शांताची कड घेऊन, शेवटीं प्रकरण अगदीं निकरावर आलें म्हणजे, "त्या नारायणासारखीच हिलाहि तुमच्या मनांत बाहेर घालवायची आहे काय?" असा निर्वाणीचा सवाल करून पतिराजांना त्या गप्प करीत! परंतु बाजीरावाच्या बाबत मात्र मध्यस्थी करणें त्यांच्या आतां अगदीं आंवाक्याबाहेरचें झालें होतें. केवळ घराचीं अधिक शकलें व्हायला नकोत म्हणून त्या दोघांनीं आपल्या-मनाविरुद्ध बाजीरावाला त्याच्या इच्छेप्रमाणें शोभेशीं लग्न करण्याची परवानगी दिली होती. परंतु लग्न होऊन ही नवी सून घरांत आल्यापासून 'परांजपे घरा-ण्याच्या वळणा'चा कांहीं मागमूसहि घरांत दिसेनासा झाला होता! तिची वेष-भूषा, तिचें बाजीरावाबरोबर हिंडाफिरायला व नाटकसिनेमे पाहाण्याकरितां बाहेर जाणें, त्याच्या मित्रांशीं मोकळेपणानें गप्पा मारीत बसणें—वगैरे वगैरे एक ना दोन शेंकडों गोष्टी त्यांच्या 'बालबोध वळणा'च्या संकेतांना क्षणोक्षणीं समूळ उध्वस्त करीत होत्या. नानांना त्या दोघांचे हे 'थेर' पाहाणें आतां अगदीं

अशक्य होत चाललें होतें; आणि ह्या त्यांच्या वागण्यामुळेंच शांतेचें वळणहि हळु हळु बिघडत आहे ह्या जाणिवेनें पार्वतीबाई अतिशय बेचैन होत होत्या; परंतु तिला प्रच्छन्नपणें बोलायला त्यांची बाजू तितकीशी पक्की नव्हती. कारण शांता आतां जवळ जवळ तेवीस वर्षांची झाली होती तरी तिचें लग्न जमविण्या-बाबत त्यांना अजूनपावेतों यश आलेलें नव्हतें. आतांपर्यंत पाहिलेल्या स्थळांपैकीं दोन-तीन स्थळें त्यांना स्वतःला व शांतीलाहि पसंत होतीं; परंतु नानांनीं तीं सारीं स्थळें कधीं 'त्या मुलाचें घराणें आपल्या तोलाचें नाहीं' तर कधीं "'तो मुलगा लग्नाआधींच एकत्र कुटुंबांतून वेगळा झाल्याचें' कळल्यावरून तीं सर्व स्थळें नाकारलीं होतीं. वाढत्या शिक्षणाबरोबर व वयाबरोबर शांतेच्या लग्नांतील अटी व आनुषंगिक अडचणीहि वाढत चालल्या होत्या. बरोबरीच्या मुलींचीं लग्नें होऊन त्यांना दोन-दोन मुलेंहि झाल्याचें शांतेच्या दृष्टोत्पत्तीस येई तेव्हां ती मनांतल्या मनांत फारच खट्टू होई. त्यांत बाजीराव हा तिचा धाकटा भाऊ असूनहि त्याचें लग्न आधीं झाल्यानें ती फारच डिंवचल्यासारखी झाली होती. तिच्या कॉलेजांत एक कोणी शहाणे आडनांवाचे तत्त्वज्ञानाचे प्राध्यापक होते. त्यांच्याशीं तिचा परिचय बराच वाढत जाऊन शेवटीं त्याचें प्रेमांत रूपांतर झालें होतें. परंतु त्यांच्या लग्नांत एक मोठी अडचण होती आणि ती म्हणजे त्या प्राध्यापक महाशयांचें आधीं लग्न झालेलें होतें! बायकोशीं कांहीं घरगुती कारणांवरून तीव्र स्वरुपाचा बेबनाव झाल्यामुळें त्यांनीं तिला टाकली होती. शांतेला हें सारें माहीत होतें, आणि तरीहि त्यांच्याशीं विवाहबद्ध व्हावें असें तिला फार वाटत होतें. शेवटीं एक दिवस मनाचा हिय्या करून ती त्या प्राध्यापकांना घरीं घेऊन आली व आईच्या नकळत परस्पर माडीवर घेऊन गेली प्रा. शहाण्यांनीं सारी वस्तुस्थिति नानांना मोकळेपणानें सांगितली; परंतु नानांनीं त्यांना पार धुडकावून लाविलें व त्यांना इतःपर घराची पायरीहि न चढण्याबद्दल व शांतीला कॉलेजांत न जाण्याबद्दल बजाविलें. शांतेची त्यामुळें फारच निराशा झाली. परंतु नानांच्यापुढं आधिक कांहीं बोलण्याची तिची प्राज्ञा नव्हती. मुकाट्यानें तीं दोघें नानांच्या खोलींतून बाहेर पडलीं. तीं दोघें

खालीं यायला आणि बाहेरून बाजीराव व शोभा यायला एकच गांठ पडली. बाजीरावाला शांतेच्या प्रेमप्रकरणाची थोडीफार कल्पना होतीच; परंतु तरीहि आपल्याला ह्यांतलें जणुं कांहींच माहीत नाहीं असा मुद्दाम आविर्भाव करीत तो शांतेला म्हणाला, " ओः—हे कोण शांते ? "

शांता : प्रोफेसर आहेत आमच्या कॉलेजांत.

बाजीराव : कॉलेज समजून चुकून इथं आले वाटतं ?

शांता : घरीं आलेल्या पाहुण्याळा असा प्रश्न विचारणं सभ्यपणाचें नाहीं, बाजी.

बाजी : ओः—पाहुणे आहेत होय ? मग हरकत नाहीं. म्हटलं मुद्दामच आले तेव्हां आपलं नांव ?

शांता : प्रा. शहाणे.

बाजीराव : नांव चांगलं—अर्थपूर्ण आहे. माझं नांव बाजीराव.

प्रा. शहाणे : पहिले कीं दुसरे ?

बाजीराव . तिसरे ! आणि ही मिसेस बाजीराव ऊर्फ शोभा.

शांता : सर, तुम्ही नका त्याचं बोलणं मनावर घेऊं. तो असाच सगळ्यांशीं वागतो ! बराय सर, जा तुम्हीं आतां. आय् ॲम् व्हेरी सॉरी. मग काय करणार ? नाना नकार देणार असं वाटलंच होतं मला ! तुमची पहिली बायको जिवंत असली म्हणून काय झालं ? दोन लग्नं काय करीत नाहींत कुणी या दिवसांत ?

शोभा : अस्सं—म्हणजे यांची पहिली बायको जिवंत असतांना तुम्ही यांच्याशीं पुन्हां लग्न करणार होतां ?

प्रा. शहाणे : मग आतां काय हिला या वयांत पहिलेपणाचा नवरा मिळणार आहे ?

शोभा त्यावर कांहीं उत्तर देणार तेवढ्यांत पार्वतीबाई तेथें अचानकपणें प्रकटल्या.

पार्वती : शांता, केव्हांपासून हांका मारतें आहे मी तुला आंतून ? जरा भाजी निवडून यायला सांगणार—

शोभा : मी येतें ना !

पार्वती : तूं ? बाजीरावाची मस्तानी, तूं हात लावायचा का कशाला ?

शोभा : पण आतां यापुढें मलाच करावं लागणार तुमच्या हाताखालीं. तुमच्या मुलीचं म्हणे लग्न ठरलंय् !

पार्वती : कुणाचं ? शांताचं ?—काय ग, काय सांगतीय ही ?

शांता : आई, आतां मी आणखी किती वर्षं थांबूं ? माझं लग्न नको का व्हायला?

पार्वती : अगदीं उघड उघड विचारतेस आणखी किती थांबूं म्हणून ? लाज नाहीं वाटत तुला ?

शांता : ती वाटूनच इतकीं वर्षं गप्प राहिलें. म्हटलं, तूं, नाना—माझ्या लग्नाची कुठं—

पार्वती : अग पण ठरवलं तरी आहेस कुणाशीं कार्टे—

शोभा : अहो, हे तुमच्यासमोर उभे आहेत प्रो. शहाणे—यांच्याशींच !"

भावी जांवयाला प्रत्यक्ष समोर उभा राहिलेला पाहातांच पार्वतीबाई कमालीच्या गडबडल्या. मुलीनं रीतीविरुद्ध कांहींहि केलें कीं तिच्यावर तोंड टाकणें ही जी त्यांची गेल्या कित्येक वर्षांची संवय होती तिच्यामुळें इतका वेळ त्या तिच्यावर तोंड करीत होत्या. ह्या त्यांच्या संवयीला विचाराचें व भावनेचें अधिष्ठान कधींच नसे. कुटुंबप्रमुख म्हणून मानले गेलेल्या नानांच्या आचार–विचारांचा तो केवळ परिणाम होता. परंतु 'आपल्या मुलीचं योग्य वेळीं व शक्यतों चांगल्या माणसाशीं लग्न व्हावं' ही जी प्रत्येक आईच्या ठिकाणीं नैसर्गिक भावना—इच्छा असते ती प्रा. शहाण्यांना—भावी जांवई म्हणून प्रत्यक्ष डोळ्यासमोर उभे राहिलेले पाहातांच पार्वतीबाईंच्या ठिकाणीं एकदम जागृत झाली. आपण फटकळपणानें कांहीं तरीच बोलून गेलों ह्या जाणीवेनें त्या कमालीच्या ओशाळल्या. आपला आवाज एकदम खालीं आणून त्या अति अगत्यानें शांतेला म्हणाल्या, "हो का ?—मग अगोदर कां नाहीं सांगितलंस ? चहा नाहीं का द्यायचा त्यांना ?"

शांता : हो तर आतां आणतें करून. तोपर्यंत सर जरा बसा हं इथें." असें म्हणून शांता लगबगीनें आंत निघून गेली.

प्रा. शहाणे : मला वाटलं होतं—तुम्ही आपल्या मुलीला टाकून बोलाल !

पार्वती : कशाबद्दल ? लग्न जमवल्याबद्दल ? छे: हो सर ! ( शांतेनें प्रा. शहाणे यांना 'सर' म्हटलेलं ऐकून पार्वतीबाईच्या भाबड्या मनानें घेतलें कीं आपणहि त्यांना 'सर' असें म्हटलेंच पाहिजे ! ) आईला का मुलीबद्दल कधीं असं वाटतं ? तिच्या अंगाला हळद लागलेली पाहून माझ्या डोळ्याचं पारणं फिटेल.

प्रा. शहाणे : तुमच्या या शब्दांनीं मला कितीतरी हुरुप आला आहे.

पार्वती : अहो सर, मुलीनं परस्पर लग्न जमवलं तरी नवरा चांगला बघितला म्हणजे झालं. तुम्हीं प्रोफेसर कीं काय ते आहांत ना ? म्हणजे चांगलेच आहां. कुणी उपटसुंभ नाहीं कांहीं. आतां यांना मात्र—

प्रा. शहाणे : हो ऽ ! आतां तीच मुख्य काळजी !

पार्वती : छे:-छे: ! तुम्ही नका करूं त्यांची काळजी ! मी घालतें त्यांच्या कानावर सर.

प्रा. शहाणे : नाहीं—पण आम्ही परस्पर लग्न जमवलेलं पाहून—

पार्वती : प्रथम बोलतील ते—स्वभावच आहे त्यांचा. सगळं कांहीं त्यांना स्वत: करायला हवं. —पण थांबा तसं कशाला, आतांच मी वर जाऊन त्यांना विचारून येतें—थांबा हं सर, जरा तुम्ही. असें म्हणून प्रा. शहाण्यांकडून कांहीं उत्तर येण्यापूर्वीच पार्वतीबाई त्या उत्साहाच्या भरांत वर गेल्याहि. त्यांची पाठ वळतांच शांता बाहेर आली. आईपासून इतका वेळ लपवून ठेविलेली प्रा.शहाण्यांच्या पहिल्या लग्नाची गोष्ट तिला आतां वर गेल्यावर नानांकडून नक्कीच कळणार या कल्पनेनें ती कमालीची भेदरली. तिनें आपली भीति प्रा. शहाण्यांजवळ व्यक्तहि केली.

प्रा. शहाणे : शांता, आतां मात्र इथून पळच काढला पाहिजे.

शांता : हो ऽ ! तरच निभाव लागेल. आईला ती गोष्ट कळली म्हणजे तीहि नक्की फिरेल !

प्रा. शहाणे : निघायचं असेल तर याच क्षणाला निघूं या.

शांता : पण घर सोडून जायचं एकदम—म्हणजे—

प्रा. शहाणे : मग मी जाऊं ?

शांता : नको-नको—थांबा सर—मी येतें—चला.

शांता व प्रा. शहाणे घराबाहेर पडून पांच एक मिनिटेंच होत आहेत न होत आहेत तोंच नाना व पार्वतीबाई दोघेंहि माडीवरून कडाडत खालीं आलीं.

नाना : बाजी, कुठं गेली ती कार्टी ? घेऊन ये तिला आधीं माझ्यासमोर.

पार्वती : चांगली फरकटत ओढून आण तिला. प्रोफेसर म्हणे ! पहिली बायको असतांना शांताशीं दुसरं लग्न करायला बघतो आहे !

बाजीराव : पण आई, आतां ती परत येईल असं वाटतं तुला ? तिच्या इच्छे-विरुद्ध तिला परत आणण्यांत काय अर्थ आहे ?

नाना : तूं शिकवूं नकोस आम्हांला. म्हणे तिच्या इच्छेविरुद्ध ! तिच्या इच्छेचा काय संबंध ?

बाजीराव : नाना, आतांपर्यंत तुम्हीं असा कधीं विचार केला आहे, कीं शांता आपल्या बरोबरीच्या मुलींचीं लग्नं झालेलीं पाहून स्वतःच्या मनाशीं किती कुढत असेल ? तिचं लग्न तुम्हीं पूर्वीच केलं असतं तर, तिला पहिलेपणाचा नवरा मिळाला असता—चांगला नवरा मिळाला असता. पण तिनं इतकीं वर्षं तुमची वाट पाहून अखेर नाइलाजानं हा दुसरेपणाचा नवरा गांठला तर तिचा काय अपराध ?

नाना : म्हणून काय आम्हीं असल्या माणसाशीं तिचं लग्न झालेलं उघड्या डोळ्यांनीं पाहाणार ? मोठा आला आम्हांला अक्कल शिकवायला ! मुलांचं हित आम्हांलाच जास्त कळतं. तुला अजून मिसरूड सुद्धां फुटली नाहीं, हें लक्षांत ठेव.

शोभा : लांब मिशाचा माणूस जास्त अनुभवी असतो म्हणायचा !—वाढवा हो उद्यांपासून मिशा !

नाना : तोंड संभाळून बोल. तूं कुणापुढं बोलते आहेस, असं वाटतं तुला ?

पार्वती : भारीच शेफारली आहे ! अजून काय आपल्या बापाच्याच घरीं आहेस असं वाटतं आहे तुला ? इथं सून म्हणून आली आहेस तूं. बिचारी लक्ष्मी कधीं तोंड वर करून बोलली नाहीं दोन वर्षांत !

बाजीराव : पण एकदां बोलली ती शेवटचंच बोलून गेली ! आतां कसले तिचे गुण गातेस ? तिच्यासारखी सहनशील बाईहि या घराला विटली, यांतच काय

तें तुम्ही समजा म्हणजे झालं. वहिनीच्या पायानं—हिच्या पायानं—घरांत लक्ष्मी चालून आली आहे, घराला खरोखरीच शोभा आली आहे अशा सात्त्विक, आनंदमय कल्पना तुमच्या डोक्यांत कधीं चुकून तरी आल्या का ? उलट, आणखी दोन माणसं आपल्या सत्तेखालीं आलीं, असंच तुम्हांला वाटलं. ही तुमची सर्वाधिकाऱ्याची जाणीव तुम्हीं मनांतून काढून टाकली असती, तर या घरांतून जावंसं कुणाला वाटलं असतं ? वहिनी गेली, दादा गेला, शांता मेली—

नाना : आणि आतां तूंहि चालता हो घरांतून. फार ऐकलं तुझं मघापासून.

बाजीराव : ठीक आहे. आम्हींहि घरांतून जावं अशी तुमची इच्छा असेल तर माझी त्याला ना नाहीं. एकत्रकुटुंबपद्धतीचा आव राखण्याकरितां आतांपर्यंत तिघांना तुम्हीं या घराबाहेर काढलें आहेत! आज आतां आम्हां दोघांना बाहेर काढत आहांत. आणि तरीहि एकत्रकुटुंबपद्धतीचा महिमा तुम्ही एकीकडे गातच रहाल. असो. तुमची मर्जी! देव तुमचं कल्याण करो!

शोभा : जातांना नमस्कार करायला हवा का मी ?

पार्वती : तुला तुझ्या घरांत आईबापांनीं रीत लावली असेल तर ना!

शोभा : बाकीच्या साऱ्या रीती तिनं मला सांगितल्यान्—पण घरांतून सासु-सासऱ्यांनीं हांकून लावल्यावर त्यांना जातांना नमस्कार करायला हवा कीं नाहीं हें मात्र तिनं सांगितलं नाहीं. कारण तिला कल्पनाच नव्हती, जगांत असले सासु-सासरे असतात म्हणून!"

बाजीराव आणि शोभा केवळ नेसत्या कपड्यांनिशीं तशींच घराबाहेर पडलीं. पार्वतीबाईचें सारें उसनें अवसान गळून गेलें व त्या डोळ्याला पदर लावीत जड पावलांनीं माजघरांत निघून गेल्या. नाना परत माडीवर जाण्याच्या तयारींत होते तोंच त्यांना "नाना" म्हणून कोणीतरी हांक मारलेली ऐकूं आली म्हणून त्यांनीं चमकून मागें वळून पाहिलें तों हॉलच्या दारांत थरथर कांपत उभा असलेला नारायण त्यांना दिसला.

नाना : एकटाच आलास ?

नारायण : हो—एकटाच.—मला तुम्हांला सोडून राहाणं—हें घर सोडून राहाणं अगदीं असह्य झालं. येथून गेल्यापासून नाना, एक दिवस—एक क्षण मी तुम्हांला विसरूं शकलों नाहीं. इतकीं वर्षं मी इथं होतों...पण तुम्ही ऊठ म्हटलं म्हणजे उठायचं, आणि बस म्हटलं कीं बसायचं, एवढंच मला माहीत !

नाना : शिस्तच होती आमची तशी.

नारायण : हो—पण तुमच्या या शिस्तीपायीं माझ्या आयुष्याचं काय झालं तें तुम्ही कधीं पाहिलंत का ? आज पंचविशी उलटून गेलेला मी—पण तुमच्या हातांतलं नुसतं कळसूत्री बाहुलं होऊन बसलों आहे. मला तुम्ही स्वतंत्रपणानं विचार करायला आजपर्यंत कधीं सवडच दिली नाहींत. तुम्ही नाचवाल तसं मी नाचायचं—तुम्ही बोलाल तें मी बोलायचं—तुमचे विचार, तुमचीं मतं—सारं सारं कांहीं माझ्या रक्तांत भिनून गेलं आहे. माझा मी राहिलोंच नाहीं. तुमच्या इच्छे-प्रमाणें माझं पळापळानं आयुष्य वाढलं आहे. इतकीं वर्षं मीहि समजत आलों, तुमच्या सत्तेखालीं सर्वांनीं या घरांत निमूटपणं दोन वेळां जेवून ढेंकर देण्यांत समाधान आहे. तुमचीच शिस्त बरोबर असं मला आतांपर्यंत वाटत होतं.

नाना : आणि आतां तुला ती चुकीची वाटली ?

नारायण : हो—दोन महिने तुमच्यापासून देहानं दूर गेल्यावर मला माझा दुबळे-पणा कळून आला. तुमच्या पांगुळगाड्याशिवाय मला चालतां येईना—बोलतां येईना—विचार देखील करतां येईना. बाजीराव लवकर सावध झाला. त्याला तुम्हीं उडाणटप्पू म्हणत होतां—पण तोच त्याच्या त्या मनसोक्त वागणुकीमुळंच जगा-यला अधिक लायक ठरला. कुठं गेला तो ?

नाना : हांकून लावला मी त्याला आणि त्याच्या बायकोला.

नारायण : हांकून लावलात ? सुटला बिचारा ! तो सुखी झाला—जिवंत झाला. मी मात्र मेलों आहे.

नाना : मग तूंहि परत—

नारायण : नाहीं जाऊं शकणार नाना ! बाहेर जायला मला पाय कुठं आहेत. तुमच्या पांगुळगाड्याशिवाय मी कसा चालणार ? बिचारी लक्ष्मी ! तिला चालतां

येत असून देखील मी तुमच्या पांगुळगाड्याला धरून चालायला सांगत होतों तिला. पण ती अखेर कंटाळली—वैतागली—आणि—आणि निघून गेली. मी मात्र पुन्हां आलों आहें—तिला सोडून आलों आहें. मला ती मोकळी हवा मानवत नाहीं. मला हेंच कोंदटलेलं—कुरसलेलं वातावरण हवं. याच वातावरणांत मी वयाचीं सत्तावीस वर्षं काढलीं. आपल्या हक्काच्या मालमत्तेप्रमाणें आमची विल्हेवाट लावीत असतांना आपण एकत्रकुटुंबपद्धतीचा पायाच खिळखिळा करीत आहांत याची तुम्हांला कधींहि जाणीव झाली नाहीं ना? मुलं मोठीं झालीं तरी त्यांना आपल्याच इच्छेप्रमाणं वागायला लावायचं—दुसऱ्या घरच्या मुली सुना म्हणून आल्या तरी त्यांच्यावरहि आपल्याच मतांची सक्ति करायची आणि एकत्र कुटुंबाच्या सुखाची अपेक्षा करायची—कसं शक्य आहे हें नाना?

तेवढ्यांत पार्वतीबाई बाहेर आल्या. नारायणाला परत घरीं आलेला पाहातांच त्या एकदम आश्चर्यानें उद्गारल्या, "कोण नारायण? अरे तूं आलास?"

नारायण : होय आई.

पार्वती : बरं झालं आलास तो. कसं खायला आलं होतं घर. आत्तां बाजी गेला—अगदीं उघडं उघडं वाटलं असतं आम्हांला! तो गेला तर गेला—बरं झालं तूं आलास. आतां मात्र तूं आम्हांला सोडून जाऊं नकोस—जायला निघालास तरी जाऊं देणार नाहीं मी तुला.

नाना : नारायण यापुढें इथें क्षणभरहि राहातां कामा नये. तो आपणहून जाणार नसला दर मी त्याला सक्तीनें परत लक्ष्मीकडे जायला लावीन." असें म्हणून नाना ताडकन् माडीवर निघून गेले.

नारायण आणि पार्वती आश्चर्यानें दिङ्मूढ होऊन त्यांच्या पाठमोऱ्या आकृतीकडे नुसतीं पाहातच राहिलीं!

× × ×

लक्ष्मीनें आपलें नवें—स्वतःचें घर अतिशय आकर्षक पद्धतीनें सजविलें होतें. घरांतील निवडक फर्निचर, भिंतीवरील चित्रें, इतर सामानसुमानाची आटोपशीर मांडणी—या साऱ्यांवरून तिची सौंदर्यदृष्टि सहज लक्षांत येण्यासारखी

होती. या नव्या घरीं नारायणाचें मन रमावें, त्याला नानांची आठवण होऊं नये म्हणून तिनें आटोकाट प्रयत्न केले. परंतु त्यांत तिला यश आलें नाहीं ! या नव्या आयुष्यांत त्याचें मन गुंतविणें अशक्य झालें. स्वतंत्रपणें आचार-विचार करण्याची कधीं सवयच नसल्यामुळें त्याला या नव्या बिऱ्हाडीं प्राप्त झालेल्या स्वातंत्र्याच्या वातावरणांत अगदीं चोरट्यासारखें वाटूं लागलें. त्याची ती कुचंबणा पाहून लक्ष्मीलाच त्याची कींव आली व तिनें त्याला परत नानांच्या घरीं जाण्यास आपण होऊन सांगितलें. आणि तोहि तत्क्षणीं नानांकडे निघून गेला ! त्या तशा स्थितींतहि सासरीं परत न जाण्याचा स्वतःचा निश्चय लक्ष्मीनें मात्र कायम ठेविला. नारायण निघून गेल्यावर तिनें शांतपणें दार लावून घेतलें व ती आपल्या नित्याच्या गृहकृत्यांना लागली. कांहीं वेळानें दारावर थाप ऐकूं आली म्हणून तिनें परत दार उघडिलें तों दारांत बाजीराव–शोभेचें जोडपें हंसत उभें राहिलेलें दिसलें. त्यांच्या हातांतल्या बॅगस् पाहून ती किंचित् चरकलीच. परंतु त्या दोघांच्या तोंडावर दिसणारा आनंद तिच्या मनांत येणाऱ्या शंकेशीं अगदीं विरोधी स्वरूपाचा तिला वाटला. तिनें बाजीच्या हातांतील बॅग आपल्या हातांत घेत विचारिलें, " कां, फार आनंदांत दिसतां आहां?

बाजीराव : आनंद ना ?—तुरुंगांतून सुटल्याचा—पिंजऱ्यांतून सुटल्याचा—

लक्ष्मी : म्हणजे—म्हणतां तरी काय तुम्ही ?

बाजीराव: इतकं सांगितल्यावरहि कळत नाहीं तुला ? ऐक, ज्या नानांच्या घरांतून तूं दादाला घेऊन निघून गेलीस त्या घरांतून आज आम्हांलाहि नानांनीं ' चले जाव ' म्हणून सांगितलं."

आणि मग बाजीरावानें सारी इत्थंभूत हकिगत लक्ष्मीच्या कानावर घातली.

बाजीराव : बरं पण दादा कुठें आहे ? ऑफिसांतून नाहीं का आला अजून तो ?

लक्ष्मी : गेले दोन दिवस ते ऑफिसांत गेलेच नाहींत

बाजीराव : कां–आजारी आहे कीं काय ?

लक्ष्मी : हो !

बाजीराव : कुठं आहे तो ?

लक्ष्मी : इथं नाहीं.

शोभा : म्हणजे ? कुठं हॉस्पिटलांत आहेत कीं काय ?

लक्ष्मी : हो—आपल्या वडिलांच्या हॉस्पिटलांत !

आणि मग बाजीरावच्या व शोभेच्या लक्षांत चटकन् सारी वस्तुस्थिति आली. नारायण परत गेल्याचें कळतांच बाजीराव अगदीं खवळलाच. परंतु त्याला शांत करीत लक्ष्मी म्हणाली, "आतां व्यर्थ संतापण्यांत काय अर्थ आहे ! जन्मापासून यांचं शरीर, मन, इच्छा, विचार सारं कांहीं नानांनींच घडविल्यावर आतां त्यांच्या या वर्तनाबद्दल त्यांना दोष देण्यांत काय अर्थ आहे ? मला त्यांचा राग येण्याऐवजीं कींवच येते आताशे ! "

बाजीराव : तूं कांहींहि म्हण, पण खरंच दादांनीं अगदीं घात केला ऐन वेळीं !

लक्ष्मी : त्यांना दोष देण्यांत कांहीं अर्थ नाहीं—सांगितलंना मी तुम्हांला एकदां ?

शोभा : हो—आतां नानांनाच कांही वाटलं तर !

बाजीराव : त्यांना कशासाठीं वाटणार ? ते म्हणतील, आला कीं नाहीं एक मुलगा नाक मुठींत धरून ? आतां हळु हळु दुसराहि येईल. आणि सारी मंडळी जमली म्हणजे सर्वांवर आणखी दुप्पट जोरानं सत्ता चालवतां येईल !

शोभा : पण एखादे वेळीं त्यांना असं नाहीं वाटायचं, की तुमचे दादा बायकोला सोडून आले, हें कांहीं बरं झालं नाहीं; त्याला चार समजुतीचे शब्द सांगून परत पाठवावं.

बाजीराव : कुणाबद्दल म्हणते आहेस तूं हें ? नानांबद्दल ? अजून दोन महिने पुरे झाले नाहींत तुला नानांचा सहवास घडून !

लक्ष्मी : कशावरून वाटणार नाहीं त्यांना ?

बाजीराव : तुला हीं दोन वर्षं पुरीं झालीं नाहींत अजून त्यांचा सहवास घडून ! मी त्यांचा बावीस वर्षांचा जुना कैदी आहें.

लक्ष्मी : माणसाच्या मनांत केव्हां परिवर्तन होतं, सांगतां येत नाहीं; मीं लग्न करून तुमच्या घरीं आलें तेव्हां मला कधीं चुकून तरी वाटलं होतं, कीं एक दिवस मी या घरांतून जाईन ? माणसाच्या आयुष्यांत आकस्मिक घटना केव्हां

घडतील, याचा नेम नाहीं.

बाजीराव : या आशेवरच राहणार असलीस तूं, तर आमचं कांहीं म्हणणं नाहीं. त्यासाठीं खुशाल वाटलं तर वटसावित्रीचं व्रत कर ! यमानं जसा सावित्रीला तिचा नवरा परत दिला तसा नानाहि तुला देतील !'

बाजीरावाचें शेवटचें वाक्य पुरें होण्याला व घरांत नाना, पार्वती व नारायण यावयाला एकच गांठ पडली ! त्या तिघांना आलेलीं पाहून बाजीराव आश्चर्यानें स्तंभितच झाला.

आल्याबरोबर नानांनीं लक्ष्मीला पहिला प्रश्न केला, "तुला काय वाटलं, मी नारायणाला घरांत ठेवून घेईन ?"

लक्ष्मी : हो.

नाना : काय कल्पना तरी काय होती तुझी आमच्याबद्दल ?

लक्ष्मी : माझ्यावर तुमचा राग असल्यामुळं यांना, तुम्हीं मुद्दामच ठेवून घ्याल, असं मला वाटलं होतं.

नाना : मग खोटं ठरलं कीं नाहीं तें ?—काय रे नारायण ?

नारायण : हो.

नाना : अरे, मोठ्यानं बोल कीं !

नारायण : ( मोठ्यानें ) हो ऽ ऽ !

बाजीराव : पहा—अजून त्याला 'रिंगमास्तर' लागतो मोठ्यानं बोल म्हणून सांगायला !

नाना : 'म्हणे मला करमत नाहीं तुमच्याशिवाय नाना !'—आणि म्हणून या सोन्यासारख्या बायकोला सोडून माझ्याकडे आला !—लग्न कशाला करून दिलं होतं मग ? बायकोबरोबर घरांतून निघून गेला—आणि तिला एकटीच सोडून आपला परत आला !—कसा घेईन मी याला परत घरांत ?

लक्ष्मी : पण त्यांना इथं करमत नाहीं—

नाना : कसं तें पहातोंना मी आतां !—

लक्ष्मी : पण इथं त्यांना करमत नसतांना डांबून ठेवण्यांत काय अर्थ आहे ?

त्यांची ती कुचंबणा पाहून मीच आपण होऊन त्यांना तुमच्याकडे पाठवलं !

नाना : अस्सं—म्हणजे तूं होऊन नारायणाला माझ्याकडे पाठवलंस !

लक्ष्मी : हो.

नाना : आणि मी त्याला तसाच जन्मभर ठेवून घेतला असता तर ?

लक्ष्मी : तर—तर ते सुखी झाले असते. तुम्हांलाहि बरं वाटलं असतं !

बाजीराव : अग, पण तूं नवरा असून एकटीच जन्म काढणार होतीस ?

लक्ष्मी : बायकांच्या नशिबीं केव्हां ना केव्हां एकटेपण येतंच. त्यामुळं तें सहन करायची त्यांच्या मनाची तयारी असतेच. पण पुरुषांना मात्र हें एकटेपण सहन करायची शक्ति नाहीं—हें मी आज दोन महिने अहोरात्र पाहून घेतलं. यांचें पोरकेपण बायकांच्या वैधव्यापेक्षांहि दुःसह ! पत्नी ही पतीची दासी असते, सखी असते आणि माताहि असते म्हणतात. पण हीं तिन्हीं नातीं यांच्या बाबतींत असमर्थ ठरलेलीं पाहिलीं, तेव्हां मात्र मला यांच्यावर तुमचं किती वर्चस्व आहे, याची पूर्ण जाणीव झाली—आणि खरं सांगतें— तुमची अत्यंत चीड आली. एका हाडामांसाच्या तरुणाचं तुम्हीं केवढं निर्जीव बाहुलं करून टाकलं आहे—एका माणसाच्या आयुष्याचें कसं मातेरें करून टाकलं आहे—हें पाहून मला तुमच्याबद्दल किती तिरस्कार वाटला असेल, तें मला आतां तुम्हांला सांगताहि येत नाहीं. आपल्या मुलाच्या आयुष्याचं मातेरं करण्याचा गुन्हा तुम्ही केला आहे—तुम्हांलाहि अमान्य करतां यायचं नाहीं.

नाना : तें मला अमान्य नाहीं म्हणून तर मी नारायणाला घेऊन इथं आलों आहें.

शोभा : म्हणजे ?

नाना : म्हणजे काय कपाळ ! खरं सांगूं तुम्हांला साऱ्यांना ?—तुम्हीं सगळे घरांतून निघून गेल्यावर आम्हीं जेव्हां दोघंच घरांत राहिलों, तेव्हां आमचा आतताईपणा—गाढवपणा लख्ख दिसायला लागला आम्हांला !

बाजीराव : मग आतां—?

नाना : आतां यापुढं आम्हीं या घरांतच रहायचं ठरवलं आहे ! लक्ष्मी, तुझं काय म्हणणं आहे यावर ?

लक्ष्मी : तुम्ही इथं राहिलां तर मला नकोसं कसं होईल ?

पार्वती : अग, पण एवढ्याशा जागेंत साऱ्यांना राहायला जमणार कसं ? त्यापेक्षा मी म्हणतें—

बाजीराव : काय—त्या घरीं जाऊं या ? नको रे बुवा ! तिथं गेल्यावर पुन्हां साऱ्यांचा पहिला आयुष्यक्रम सुरू व्हायचा. काय दादा ?

शोभा : ( नानांची नक्कल करीत ) हो—' माझीं मतं तीं कुटुंबांतील साऱ्या माणसांचीं मतं...कुटुंबांत प्रत्येकाला मत असून चालत नाहीं ! मी जिवंत आहें तोंपर्यंत—'

नाना : ( हंसत हंसत ) बस बस—फार फाजील होत चालली आहे ही लवंगीमिरची !—तें कांहीं नाहीं. साऱ्यांनीं इथंच एकत्र राहायचं.

बाजीराव : पण इतके दिवस एकत्र राहात होतोंच कीं !

नाना : हो–पण त्या वेळीं तुम्हीं सारे माझ्या घरांत होतां; आतां मी तुमच्या घरांत राहायला आलों आहें.

लक्ष्मी : खरं ?

नाना : खरं म्हणजे काय—सपशेल खरं !

बाजीराव : आणि तें घर ?

नाना : बंद. चांगलं कुलूप ठोकून आलों आहें भलं भक्कम. हा मी आणि ही आलों आहों, एवढंच काय तें त्या घरांतलं. बाकी सगळं तिथंच राहील !



प्रकरण....१२ वें

# सिंहावलोकन

ज्ञानेश्वराच्या काळीं 'कळसूत्री बाहुल्यांच्या स्वरूपांत असलेल्या' अवस्थेपासून १९४५ सालीं लिहिल्या गेलेल्या मो. ग. रांगणेकरकृत 'माझें घर'पर्यंतचा मराठी रंगभूमीचा इतिहास या नाट्यकथांद्वारें मांडण्याचा प्रयत्न येथवर केला आहे. या प्रचंड कालखंडांतील मराठी रंगभूमि ज्या नाना तऱ्हेच्या वैशिष्ट्यांनीं विभूषित झालेली दिसते त्या वैशिष्ट्यांचें थोडें सिंहावलोकन केल्यास कीर्तिशिखराच्या रोखानें पडत असलेलीं तिचीं भविष्यकालांतील पाऊलें स्पष्टपणें दिसल्यावांचून राहाणार नाहींत.

शिवकालीन स्वराज्यांत दशावतार, ललित, तमाशा वगैरे प्राथमिक स्वरूपाच्या नाट्यप्रकारांत घोंटाळत असलेल्या मराठी रंगभूमीला इंग्रजी राज्यांत नव्या युगाची दृष्टि लाभली. कानडी नाटकांपासून जरी तिला तत्कालीन स्फूर्ति लाभली तरी तिचा पुढचा सर्व विकास संस्कृत व इंग्रजी नाट्याच्या भाषांतर वा रुपांतर-रूप पायामुळेंच झाला. तत्कालीन नाटककारांनीं अनुवादांत कोठल्याहि प्रकारचा कमीपणा न मानितां उलट अभिजात रसिकतेनें व संग्राहक व्यासंगी वृत्तीनें ह्या दोन्ही भाषांतील आदर्श नाट्यकृति स्वकीयांपुढें मांडून त्यांना प्रगतीचा पल्ला दाखविला. परशुरामतात्या गोडबोले, कृष्णशास्त्री राजवाडे, किर्लोस्कर, देवल वगैरे मंडळींनीं कालिदास, भवभूति, शूद्रक वगैरे संस्कृत नाटककारांचीं नाटकें मराठींत आणिलीं, तर आगरकर, परांजपे, देवल, बेलसरे, कानिटकर, महाजनि वगैरेंनीं शेक्सपिअरच्या नाट्यकृति भराभरा मराठींत अनुवादित केल्या. दिवसेंदिवस होत असलेल्या कलाविकासाबरोबर केवळ भाषांतरें करण्याची प्रथा मागें पडून मूळ नाट्यकृतीला मराठी साजशृंगार देऊन तिचें रूपांतर करण्याची प्रथा पडूं लागली. हीं रूपांतरें करण्यांत व तीं पाहाण्यांत नट,

नाटककार व प्रेक्षक यांपैकीं कोणीहि यत्किंचित कमीपणा मानलेला नाहीं हें वा. बा. केळकरकृत 'त्राटिका' (शेक्सपिअरकृत 'टेमिंग ऑफ दी श्रू'), गो. ब. देवलकृत 'संशयकल्लोळ' (मर्फीकृत 'ऑल इन दि रँग') व श्री. वि. वर्तककृत 'आंधळ्याची शाळा' (ब्युर्नसनकृत 'गाँटलेट') या नाटकांना जी अपूर्व लोकप्रियता लाभलेली आहे त्यावरून। अगदीं उघड होण्यासारखें आहे. केवळ नाटकांचें अनुकरण करून येथील नाटककार थांबले नाहींत तर पाश्चात्य नाटककारांच्या तंत्राचेंहि त्यांनीं अनुकरण केलें. शेक्सपिअर, मोलिअर, गॅल्सवर्दी, शॉ, इब्सेन वगैरे गाजलेल्या पाश्चात्य नाटककारांच्या विशिष्ट रचनातंत्राच्या अनुकरणाचा प्रयत्न कोल्हटकर, खाडिलकर, गडकरी, वरेरकर, वर्तक, अत्रे, रांगणेकर वगैरे नाटककारांच्या नाट्यकृतींतून सहज दृग्गोचर होण्यासारखा आहे.

परंतु हें अनुकरण चालू असतांना स्वदेशांतील राजकीय, धार्मिक व सामाजिक परिस्थितीची मराठी नाटककारांनीं बिलकुल उपेक्षा केली नाहीं. या विषयासंबंधीं जीं नाटकें लिहिलीं गेलीं तीं केवळ तत्कालीन लोकप्रियतेला जिंकण्यासाठीं म्हणून लिहिलीं गेलीं नाहींत तर त्या विषयांबाबतच्या तद्रूपतेंतून, जिव्हाळ्यांतून, व्यासंगांतून तीं निर्माण झालेलीं आहेत. अर्थात अशा कृति संख्येनें थोड्या असल्या तरी कीर्तीनें त्या फार मोठ्या आहेत. 'कीचकवध' (खाडिलकर १९०७), 'धर्मसिंहासन' (वीर वामनराव जोशी १९२९), 'सत्तेचे गुलाम' (भा. वि. वरेरकर १९२२), 'राजाचें बंड' (त्र्यं. सी. कारखानीस १९२५) हीं राजकीय नाटकें, 'शारदा' (देवल १८९९), 'वधूपरीक्षा' (कोल्हटकर १९१४), 'एकच प्याला' (गडकरी १९१९), 'म्युनिसिपालिटी' (मा. ना. जोशी १९२५), 'उद्यांचा संसार' (प्र. के. अत्रे १९३५), 'कुलवधू' (मो. ग. रांगणेकर १९४२) हीं सामाजिक नाटकें व 'संन्याशाचा संसार' (भा. वि. वरेरकर १९२२) 'करमणूक' (मा. ना. जोशी १९१७), 'दंभस्फोट' (पिंपळखरे १९३५), 'धर्मरहस्य' (नेवाळकर १९०९) 'वंदेभारतम्' (प्र. के. अत्रे १९३७) हीं धार्मिक विषयावरील (धार्मिक रूढीविरुद्ध) नाटकें वरील विधान सिद्ध करण्यास पुरेशीं आहेत.

संस्कृत व इंग्रजी या समृद्ध भाषांतील नाट्यतंत्र आत्मसात् करून त्या द्वारां स्वकीयांच्या जीवनाचें दर्शन घडविण्याचा हा अभिनव परंतु अवघड असा प्रयोग करण्याच्या नादांत मराठी नाट्यतंत्रांत व रंगभूमीवरील जड साहित्यांत अभावितपणें प्रगति होत गेली. संविधानकांत कशी सुधारणा होत गेली हें पाहावयाचें असेल तर भावे, किर्लोस्कर, देवल, खाडिलकर, वर्तक व रांगणेकर ह्यांचीं नाटकें टप्पे म्हणून पाहावींत. स्वभावदर्शनाची कला तर दिवसेंदिवस इतकी सुधारत गेली कीं, त्यामुळें फाल्गुनराव ('संशयकल्लोळ'), लक्ष्मीधर ('मानापमान'), सिंधु ('एकच प्याला'), धेनुवल्लभ ('म्युनिसिपालिटी') यांसारख्या कांहीं व्यक्तींचीं नांवें मराठींत नित्याच्या वापरांतलीं झालीं आहेत. संवाद, संगीत व विनोद या बाबतींत कसकशी सुधारणा होत गेली याची कल्पना परिशिष्ट ख व क वरून चांगल्या प्रकारें येऊं शकेल. सूत्ररूपांत या बाबतची क्रांति सांगावयाचीच झाली तर असें म्हणतां येईल कीं, पूर्वी नाटकांत भाषणें असत, आतां संभाषणें आलीं; पूर्वी नाटकाला संगीत जलशाचें स्वरूप होतें, आतां नाटकाच्या ओघांत शक्यतों सहज बसतील अशीं अल्प गाणीं योजलेलीं असतात; पूर्वी नाटकांत विनोद यावा याकरितां विदूषकाची वा विनोदी प्रवेशांची खास योजना करीत, आतां अशा कृत्रिम मार्गांनीं विनोद उत्पन्न करण्याच्या भानगडींत न पडतां कथानकाच्या ओघांत सहजासहजीं जेवढा विनोद निर्माण होईल तेवढाच आढळूं शकतो. रंगभूमीवरील जड साहित्यांतहि अशाच प्रकारें बरीच प्रगति झाली आहे. दहा अंक व त्यांत अनेक प्रवेश ह्या पद्धतींत बदल होतां होतां आतां तीन अंक व प्रत्येक अंकांत एकच प्रवेश—म्हणजेच प्रवेशरहित अंक—ही पद्धति रूढ झाली आहे. रंगभूमीवरील देखावे व पडदे यांतहि बरीच क्रांति झाली आहे. पडद्यांवर निरनिराळे देखावे रंगवून घेऊन ते 'ड्रॉप्स्'च्या रूपानें पुढें मागें करणें ही पद्धती मागें पडली असून खऱ्या खिडक्या, दारें, भिंती, जिने वगैरेंचा आभास निर्माण करणारे देखावे (फ्लॅटसीनस्) रंगभूमीवर आंढण्याची पद्धति जवळ जवळ रूढ झाल्यासारखीच आहे.

नाट्यसृष्टींतील वर उल्लेखिलेल्या जड व सूक्ष्म घटकांतील चैतन्य व

प्रगति ज्यांच्यावर मुख्यतः अवलंबून असते ते मराठी रंगभूमीवरील नट व नाटककार हे दोघेहि वैशिष्ट्यपूर्ण असेच आहेत. गणपतराव जोशी, नानबा गोखले, केशवराव दाते, नानासाहेब फाटक व पार्श्वनाथ आळतेकर या नटांनीं केवळ आपला अभिनय व गद्य भाषणें यांच्या जोरावर अद्वितीय कीर्ति संपादन केली आहे तर भाऊराव कोल्हटकर, केशवराव भोसले, कुंदगोळकर ऊर्फ सवाई गंधर्व, कृष्णराव फुलंब्रीकर, मास्तर दिनानाथ यांनीं केवळ आपल्या स्वर्गीय संगीतावर मराठी रंगभूमि कित्येक वर्षें झुलवीत ठेविलेली आहे! नारायणराव राजहंस ऊर्फ बालगंधर्व आणि सौ. ज्योत्स्ना भोळे यांनीं अभिनय व संगीत या दोन्हींच्या जोरावर मराठी रंगभूमीवर अपूर्व असें यश मिळविलें तर माधवराव पाटणकर व दत्तोपंत हल्याळकर यांनीं केवळ आपलें रूप व माफक आवाजी यांच्या जोरावर भरपूर लोकप्रियता संपादन करून दाखविली.

नटांप्रमाणेंच नाटककारांच्या बाबतींतहि मराठी रंगभूमि बरीच भाग्यवान आहे. गो. ग. आगरकर, शि. म. परांजपे, कृ. प्र. खाडिलकर, न. चिं. केळकर, वि. दा. सावरकर, वीर वामनराव जोशी, वामणगांवकर यांसारख्या राजकारणांत व समाजकारणांत गाजलेल्या मंडळींनीं स्वतः नाटकें लिहून मराठी रंगभूमीबद्दलची आपुलकी व्यक्त केलेली आहे. नट, नाटककार व दिग्दर्शक या तिन्ही भूमिका पत्करणारे ब. पां. किर्लोस्कर, माधवराव पाटणकर, टिपणीस, कारखानीस, टेंबे वगैरे नाटककारहि मराठी रंगभूमीवर अधून मधून दृष्टोत्पत्तीस येतात. केवळ आपल्या एकट्याच्या नाटकांच्या जोरावर एकेक नाटक कंपनी जवळ जवळ एकेक तप तगवून धरूं शकणारे खाडिलकर, वरेरकर, मा. ना. जोशी, अत्रे व रांगणेकर यांसारखे अफाट कर्तृत्वाचे नाटककारहि येथें अधून मधून निर्माण झालेले आहेत.

## उज्ज्वल भविष्यकाल

मराठी नाट्यसृष्टींतील नाट्यतंत्र, नाट्यविषय, नाट्यार्थी जड साधनें, नट व नाटककार यांच्या कार्याचा आतांपर्यंत जो ढोबळ स्वरूपाचा आढावा घेतलेला आहे त्यावरून एक मोष्ट अगदीं सहज नजरेंत भरण्यासारखी आहे. आणि

ती म्हणजे मराठी रंगभूमि ही अत्यंत प्रागतिक स्वरूपाची आहे. तिच्या विकास-क्रमांत—पौराणिक नाटकें, अद्भुत नाटकें, ऐतिहासिक नाटकें, सामाजिक नाटकें व राजकीय नाटकें—हीं नाट्यप्रकारांचीं जीं क्रमवार स्थित्यंतरें होत गेलेलीं आहेत, तींहि तिची उत्क्रांतस्थितीच दर्शविणारीं अशीं आहेत. गेल्या सात-आठ वर्षांत मराठी रंगभूमीनें ज्या प्रकारची प्रगति दर्शविली आहे त्यावरूनहि तिचा भविष्यकालांतील रोख कीर्तिशिखराच्याच दिशेला आहे असें वाटण्यास भरपूर जागा आहे. 'नाट्य-निकेतन' व 'कला-विकास' ह्या नाटक कंपन्या आपल्या नाटकांचे 'शताब्दिमहोत्सव' साजरे करीत आहेत. अत्रे-रांगणेकरांसारखे नाटककार नवीं नाटकें लिहीतच आहेत; परंतु मा. ना. जोशी, त्र्यं. सी. कारखानीस, भा. वि. वरेरकर यांसारखे जुन्या जमान्यांतले, वयोवृद्ध नाटककारहि नव्या दमानें अधून मधून एकादें दुसरें नाटक लिहित आहेत. माधव मनोहरकृत 'आई' (कॅरल कॅपेकृकृत 'मदर') सारखीं अत्यंत अभिनव तंत्राचीं अनुवादित नाटकें एकीकडे प्रसिद्ध होत आहेत तर दुसरीकडे 'सतरा वर्षें' (मा. गो. रांगणेकर–१९४७) सारख्या छोट्या एकांकिकेंत किती अल्प-काळांत किती मोठा कालखंड व किती प्रचंड स्वरूपाच्या घडामोडी अत्यंत उत्कटतेनें दाखवितां येतात याचा आदर्श प्रयोगरूपानें पाहावयास मिळत आहे. नाट्यछटा, छायानाट्य, मूकनाट्य, श्रुतिगुण नाटिका (*Radio Drama*), यांसारखे नवे नवे नाट्यप्रकार निर्मिले जात आहेत तर 'तमाशा' सारखा प्राथमिक अवस्थेंतील नाट्यप्रकार, सामाजिक, धार्मिक, राजकीय क्षेत्रांतील सुधारणाविषयक विचारांचें आतां बाळसें धरावयास लागून भविष्यकालांतील लोकनाट्यांत त्याला महत्त्वाचें स्थान प्राप्त होण्याचा रंग दिसूं लागला आहे. मराठी रंगभूमीची हीं प्रगतीच्या रोखानें, धीमेपणानें, परंतु निश्चितपणें पडत असलेलीं पाऊलें पाहून तिचा भविष्यकाल उज्ज्वलच आहे ह्याबद्दल मनाची खात्री पटत नाहीं काय ?

---

**परिशिष्ट ( अ )**

# मराठी रंगभूमिविषयक कांहीं उद्बोधक व मनोरंजक उतारे

## ( १ ) पाऊणशें वर्षांपूर्वीची मराठी रंगभूमि

" आमच्या लोकांची साधारण अशी रीत आहे कीं, एकानें एखादा नवा उद्योग अगर धंदा काढला आणि त्यानें तो चार दोन पैसे मिळूं लागल कीं, त्याचें नुसतें अनुकरण करून पैशाच्या आशेनें दुसऱ्यांनीं लगेच तो धंदा काढावयाचा. या योगानें असें होतें कीं, मूळ धंदा काढणाऱ्याची प्राप्ति बुडून त्याचा धंदाही नीट चालेनासा होतो. मग त्यांत सुधारणा वगैरे होण्याचें दूरच राहिलें. हाच नियम त्या वेळीं ज्या नाटक मंडळ्या अस्तित्वांत आल्या होत्या त्यांस लागू पडतो. रा. विष्णुदास भावे यांनीं पहिलें नाटक केल्यापासून पुढें वीस वर्षांत म्हणजे १८४२ पासून १८६२ पर्यंत सरासरी दहा-बारा कंपन्या होत्या. पण पुढें पांच-दहा वर्षांत कंपन्यांवर कंपन्या अस्तित्वांत आल्यामुळें नाटकाच्या धंद्यास तेजी न येतां उलट तो खालावत गेला...... 'चांगल्या मालास चांगली किंमत येते ' अशी एक व्यापारी म्हण आहे. या म्हणीप्रमाणें त्या वेळीं ज्या कांहीं चार-दोन चांगल्या नाटक मंडळ्या होत्या त्यांनाच थोडेबहुत पैसे मिळत असत. बाकीच्यांची फारच वाईट स्थिति होती. या मंडळींना पैशाच्या अभावामुळें पोटभर अन्न मिळण्याची सुद्धां मारामार पडूं लागली. त्यांचा हा धंदा शहरांत चालेना म्हणून पुढें त्या खेड्यापाड्यांतून फिरूं लागल्या, व खेळाचा दोन-तीन रुपयांस मक्ता घेतला तर तो देऊन खेळ करूं लागल्या. या नाटकवाल्यांजवळ सोंगाला लागणारे कपडे किंवा दागदागिने मुळींच असावयाचे नाहींत. तेव्हां गांवांतील एखाद्या इसमाकडे

जाऊन त्याला चार तिकिटें देऊन दोन लुगडीं आणावयाचीं. दुसऱ्या एखाद्या इसमाकडे जाऊन 'तुमच्या घरचीं माणसें फुकट सोडतों' असें सांगून त्याचे-जवळून एखादा जुना मंदील किंवा शालू आणावयाचा. तिसऱ्या एखाद्याकडे जाऊन असेल नसेल तेवढी भीड खर्चून किंवा कोणा इसमास मध्यस्थ घालून एखादा साखळ्यांचा जोड किंवा असलाच दुसरा एखादा दागिना आणावयाचा. अशा रीतीनें मिळविलेल्या सामानावर एक-दोन नाटकें होतात न होतात तोंच पोटाची पंचाईत पडल्यामुळें व दुकानदाराचा उचापतीबद्दल तगादा लागल्यामुळें हे नाटकवाले आपलें चंबूगबाळें आटोपून दुसऱ्या खेड्यास कूच करीत ! अशा प्रकारें पैशाची प्राप्ती नाहीं, शिक्षणाचा अभाव, मंडळी छचोर आणि दुर्व्यसनी,- असा नाटक कंपनीचा थाट जमल्यावर तेथें बोलाचालीस आणि लाथाळीस कधींच वाण पडत नसे; व सकाळीं कंपनीचें अस्तित्व कायम आहे तर संध्याकाळीं तिचा मागमूस राहत नसे ! "

(पृ. ३६।३८ आ. वि. कुलकर्णीकृत "मराठी रंगभूमि" आर्यभूषण छापखाना, पुणें.)

## (२) कालमर्यादातिक्रमणाची परिसीमा

प्रेक्षकांच्या कल्पनाशक्तीवर कालगणनेसंबंधानें अमर्याद ताण पडण्याचें एक मासलेवाईक उदाहरण आम्हीं एकदां पौराणिक नाटकप्रयोगांत पाहिलेलें आठवतें. नाटक लव-कुश आख्यानाचें होतें. पहिले कांहीं प्रवेश झाले. नंतर वाल्मीकी ऋषी व त्याचा शिष्य हे पडद्यापुढें येऊन बसले. विदुषकाची शेंडी धरून संहितेच्या संथेंतील स्वर बसविण्याचा फार्स झाल्यानंतर पडद्याचे आंतून करुण स्वर ऐकूं आला. तेव्हां वाल्मीकीनें शिष्यास हें काय आहे म्हणून विचारलें. शिष्यानें पडद्याचे आंतून जाऊन येऊन सांगितलें कीं, सीता प्रसूत होत आहे व या वेदनेमुळें होणारा हा तिचा विलाप आहे. परंतु यापुढें झालेल्या प्रश्नोत्तरांत विदूषकानें पडद्याआंतून जाऊन येण्याचे श्रमहि घेतले नाहींत. तो प्रकार खालीलप्रमाणें :

( पडद्यांत लहान मुलाचें रडणें ऐकूं येतें. )

वाल्मीकी : अरे, हें काय चाललें आहे ?

विदूषक : गुरुमहाराज, सीतादेवी प्रसूत झाली असून तिचा मुलगा रडत आहे.

( फिरून रडण्याचा आवाज. )

वाल्मीकी : अरे हा वेगळा आवाज दिसतो.

विदूषक : गुरुमहाराज, सीतेला जुळीं मुलें झालीं, त्यांपैकीं दुसऱ्या मुलाचा हा आवाज आहे.

( पडद्यांत गलबला होतो. )

वाल्मीकी : अरे हा गलबला कसचा ?

विदूषक : गुरुमहाराज, सीतादेवीचे दोन्ही मुलगे लव-कुश हे बाललीला करीत असून आपले मातोश्रीपाशीं आभाळांतील चांद मागत आहेत त्याबद्दलचा हा वादविवाद चालू आहे.

( पडद्यांत आवाज होतो. )

वाल्मीकी : अरे, हा धनुष्याची प्रत्यंचा झाडलेला आवाज कसला ?

विदूषक : गुरुमहाराज, लव व कुश हे सात आठ वर्षांचे वयांतच धनुर्विद्यापारंगत झाले असून ते अलीकडे धनुष्यबाणाचाच सगळा खेळ खेळूं लागले आहेत.

( पडद्यांत गलबला होतो. )

वाल्मीकी : अरे, हा गलबला कसला ?

विदूषक : गुरुमहाराज, धनुर्विद्या शिकून परिसमाप्त झालेले दहा-बारा वर्षांचे लव-कुश आपल्यास वंदन करावयास येत आहेत.

( दहा-बारा वर्षांचे दोन मुलगे धनुष्यबाण घेतलेले येऊन वाल्मीकीस वंदन करतात. )

बसल्या बैठकीस अवघ्या एक-दोन मिनिटांत, लव-कुशांच्या जन्मापासून तों ते समाप्तविद्य होऊन तारुण्यामध्यें प्रवेश करूं लागणारे असें दाखविणें याहून कल्पनेचा अधिक अद्भुत खेळ दुसरा एखादा असेल असें आम्हांस वाटत नाहीं.

परंतु कोणीहि सहृदय मनुष्य असल्या या प्रयोगदर्शनास मान डोलवील असेंही पण आम्हांस वाटत नाहीं.

" गद्यगुच्छ "
भाग १ ला } ले. न. चिं. केळकर

प्रकाशक— वि. ग. ताम्हनकर, बुधवार पेठ, पुणें सिटी.
किं. १॥ रुपया.

## ( ३ ) 'फार्सा'चा प्रवेश मराठी रंगभूमीवर कसा झाला ?

मूळ फार्साची कल्पना प. वा. बाळा कोटिभास्कर यांस ४०-५० वर्षांपूर्वी मुंबईतील ग्रांटरोडवरील प. वा. नाना शंकरशेट यांच्या बादशाही थिएटरांत इंग्रजी कंपन्यांचीं नाटकें पाहून सुचली. असें समजतें कीं इंग्लिश नाटकवाल्यांचा आपल्या नाटकाचे शेवटीं एखादा फार्स करून दाखविण्याचा संप्रदाय असे. ते इंग्रजी फार्स पाहून पौराणिक नाटकांतहि एखादा फार्स घातल्यानें प्रेक्षकांचें चित्त वेधेल अशी कल्पना प्रथम प. वा. बाळा कोटिभास्कर यांच्या डोक्यांत आली व ती त्यांनीं लवकरच ठाणें येथें अंमलांतहि आणिली. नेहमींप्रमाणें त्यांच्या नाटक मंडळीचा 'सीताहरण' ह्या नाटकाचा प्रयोग रंगभूमीवर चालला असतां, एका अंकाच्या शेवटीं पडदा पडून आतां पुढील अंकास सुरुवात होणार इतक्यांत रंगभूमीवर एक साठ-सत्तर वर्षांचे वृद्ध बुवा एकदम ओरडत येऊन नाटकाच्या मॅनेजरांस हांका मारीत सुटले. मॅनेजर चकित मुद्रेनें बाहेर येऊन काय गडबड आहे म्हणून तपास करताहेत तों म्हातारे गृहस्थ अधिकच गलबला करून कपाळावर हात मारून बेत म्हणाले, 'अहो ! दगा, दगा, मॅनेजरसाहेब, पहिल्यानें तुम्ही खेळ बंद करा. माझ्या पंधरा वर्षांच्या तरुण सुंदर स्त्रीला कुणी छानछोक तरुणानें भुलथाप देऊन पळविली आहे व तीं दोघें आज तुमच्या नाटकास आलीं आहेत, अशी मला एकानें बातमी दिल्यावरून मी हा धापा टाकीत इथें आलों आहें. तर माझ्या बायकोचा तपास करून तिला हवालीं करा. माझी बायको मला मिळेपर्यंत मी तुम्हांला

तुमचें नाटक करूं देणार नाहीं !' त्या म्हाताऱ्यानें याप्रमाणें मध्यच स्टेजवर अशी गडबड करून नाटकाच्या रंगाचा भंग केल्यामुळें प्रेक्षकवर्ग त्याजवर प्रथम संतापून गेला; तथापि त्याची दयाजनक स्थिति ऐकतांच सर्वांना त्याची करुणा आली व त्यांनीं ओरडून, 'पहिल्यानें ह्या म्हाताऱ्याच्या तरुण स्त्रीचा तपास करा' असा एकच गोंगाट आरंभिला. 'अहो म्हातारेबुवा, घाबरूं नका, तुमच्या कुटुंबाचा शोध लावितों,' वगैरे प्रकारें मॅनेजरांनीं त्या वृद्धास आश्वासन दिलें. तथापि त्याचें समाधान होईना व प्रेक्षकांतील गलबलाहि कमी होईना... शेवटीं त्या घाबरलेल्या स्त्रीसमाजांत मॅनेजराला संगतीं घेऊन ते जरठ नवरदेव शिरले व त्यांनीं कोपऱ्यांत खालीं मान घालून बसलेल्या एका तरुण स्त्रीचा हात धरून तिला फरपटत स्टेजवर ओढीत आणिलें. नंतर मॅनेजरसाहेबांनीं त्या जरठ नवरदेवास आपल्या कुटुंबाला अशी मोकळीक न देण्याविषयीं बोध करून त्याची बोळवणूक केल्यावर, जरठ-तरुणी विवाहापासून होणाऱ्या दुष्ट परिणामांचें प्रेक्षकांच्या मनावर व्याख्यानरूपानें उत्कृष्ट चित्र बठविलें व शेवटीं हंसत हंसत सांगितलें कीं, 'मघांचे म्हातारेबुवा आणि त्यांचें कुटुंब हें दांपत्य आमच्या नाटकांतीलच पात्रें होतीं ! म्हाताऱ्याची स्त्री खरोखरीची नसून एका पोरानें तें सोंग घेतलें होतें !' हें ऐकतांच प्रेक्षकांत जो हंशा पिकला, तो पुसूं नये !

लेख०—हरिश्चंद्र आत्माराम तालचेरकर [ 'रावबहादूर पर्वत्या' (१९०४) या नाटकाच्या ( मोलियरच्या 'लबुर्श्वा झांतियोम'च्या रूपांतर ) प्रस्तावनेंतून. ]

## ( ८ ) गणपतराव जोश्यांची समयसूचकता

पुण्याचा मुक्काम हालवून 'शाहूमंडळी' मुंबईस ग्रँटरोडवरील एल्फिन्स्टन थिएटरांत जेव्हां प्रयोग करूं लागली तेव्हां, तेथें ज्या दिवशीं प्रथमच मॅकबेथ नाटकाचा प्रयोग झाला, त्या दिवशीं पुण्यांतील बाळाभाऊंच्या(जोग) अद्वितीय ॲक्टिंगची कीर्ति अगाऊच ऐकली गेली असल्यानें, प्रेक्षकसमुदाय नाटकगृहांत इतका अनावर भरला कीं, सांगतां सोय नाहीं ! त्या रात्रीच्या प्रयोगांतील बाळाभाऊंचें झोंपेतल्या प्रवेशाचें काम इतकें अलौकिक, संस्मरणीय व परिणाम

कारक वठलें कीं, तो प्रवेश पुन्हां करून दाखविण्यासाठीं प्रेक्षकवृंदानें टाळ्यांचा कडकडाट आणि शिट्यांचा शिटशिटाट एकवाक्यतेनें करीत राहून, तोंडानें एकसारखा 'वन्स मोअर'चा कलकलाट सुरू ठेविला होता. बॉक्समध्यें उभे राहून रावसाहेब पांवगीसारख्यांनीं प्रेक्षकांस विनंतीदाखल भाषण केलें असतांही ऑडियन्स जेव्हां ऐकेना व रंगभूमी पंधरा मिनिटांपेक्षां अधिक वेळ मोकळी पडलेली जेव्हां अधिक वेळ ठेवणें इष्ट वाटेना तेव्हां गणपतरावांनीं नटवेष उतरला व ते साध्या वेषांत रंगभूमीवर येऊन जेव्हां उभे राहिले, तेव्हां ऑडियन्स आश्चर्यचकित होऊन एकदम शांतरसांत निमग्न झाले. या वेळची गणपतरावांची समयसूचकता तारीफ करण्यासारखी होती यांत संशय नाहीं.

गणपतराव साध्या नेहमींच्या पोषाखांत रंगभूमीवर येऊन उभे राहून प्रेक्षकांना सविनय म्हणाले, "मीं साध्या पोषाखांत या रात्रीं मॅक्बेथ नाटकाचा प्रयोग सुरू होण्याच्या आधीं जसा नाटकगृहांत आलों तशाच पोषाखांत आतां आपल्यापुढें येऊन उभा राहाण्याचें कारण असें आहे कीं, मीं आतां आपल्या परवानगीनें पडद्यांत जाऊन, या मॅक्बेथ नाटकाचा प्रयोग पुन्हां प्रथमपासून सुरू करण्याच्या व्यवस्थेस लागणार आहें. याचें कारण असें कीं, जी गोष्ट ब्रह्मदेवाच्याहि हातून आजपर्यंत कधीं घडल्याचें ऐकिवांत नाहीं, ती गोष्ट आमच्यासारख्या नटाकडून घडणें शक्य नाहीं. कोणचीहि गोष्ट प्रत्येक वेळीं जशी संसारांत एकदांच घडत असते, तद्वतच बाळाभाऊंच्या ॲक्टिंगची या चालू नाटकाच्या संसारांत जी गोष्ट एकदां घडली ती पुन्हां संसाराचें पहिल्यापासून प्रदर्शन करायला सुरुवात केल्यावांचून आतां मध्येंच पुन्हां कशी करतां येणार ? संगीतांतलें 'वन्स मोअर' हें संगीत मंडळ्यांना जरी खपत असलें तरी तें निसर्गविरुद्ध असल्यानें अक्षम्यच आहे. **आम्हीं नट म्हणजे संसारांत घडलेल्या गोष्टींचें हुबेहूब प्रदर्शन करणारे आहोंत. संसारांत एकदां मनुष्य मेला असतां त्याला पुन्हां एकदां मरून दाखव म्हणून त्याच्यापाशीं जरी कंठशोष केला तरी त्याच्या कलेवरावर त्याचा काय परिणाम होणार** ? तसेंच दयाबाईचें आहे. ती जर झोंपेंतल्या प्रवेशानंतर मृत्युमुखीं

पडली आहे, तर तिचा आतां ती जिवंत झाल्यावांचून झोंपेंतला प्रवेश पुन्हां कसा होणार ? मृत्युमुखीं पडत असलेला माणूस उत्तम तऱ्हेच्या सजीवावस्थेंतल्या माणसाप्रमाणें सुरेल तालबद्ध ताना मारीत गात गात मरण पावल्याचें अनैसर्गिक कृत्य संगीत नाटकांत जरी 'वन्स मोअर' च्या गजरांत पचनीं पडलें, तरी तें आमच्या निसर्गाच्या प्रतिसृष्टीच्या गद्यनाटकरूप सृष्टींत पचनीं पडण्यइतकें अद्यापि बाष्कळ झालेलें नाहीं, आणि तसें अनैसर्गिक होऊं देण्याचा जो अधिकार आम्हांला मिळाला आहे, तो आम्हीं संगीत नटांप्रमाणें गमावूं आणि फक्त समाजाचें मनोरंजन करणारे दासानुदास भाट बनूं. आम्हांला तो दर्जा नको आहे, आणि **समाजाला अनैसर्गिक वळण देण्याची आमची इच्छा नाहीं !** म्हणून मी आपल्याला अशी विनंती करायला आलों आहे कीं, आपली जी खरी ईच्छा—बाळाभाऊंचा दर्याबाईच्या झोंपेंतल्या ॲक्टिंगचा प्रवेश बघण्याची—ती मी पार पाडण्यासाठीं, हें मॅक्बेथ नाटक पुन्हां पहिल्यापासून करून दाखविण्याची आपल्यापाशीं परवानगी मागतों. आतां एक वाजून गेला आहे. संपूर्ण नाटकाच्या प्रयोगाला तीन तास लागतात. पोलिसची परवानगी आणवितों म्हणजे झालें. आपली मात्र पुन्हां पहिल्यापासून नाटक बघण्याची तयारी असावी म्हणजे झालें ”

वरील आशयाचें गणपतरावांचें भाषण ऐकून प्रेक्षकसमुदाय शान्तचित्त झाला व त्यानें पुढें नाटक चालू करण्यास परवानगी दिल्यावर नाटक सुरु होऊन पुरें झालें व गणपतरावांच्या समयसूचकतेची आणि निसर्गाच्या सत्यतेचें प्रदर्शन दाखविणाऱ्या 'शाहूमंडळी'ची तारीफ करीत प्रेक्षकवृंद नाटकगृहाबाहेर पडला.

[ **गणपतराव जोशी** ( जन्म १५ ऑगस्ट १८६७, मृत्यु— ७ मार्च १९२२) हे 'शाहूनगरवासी मंडळी'चे मालक व प्रमुख नट होत. रामदास, तुकाराम व राणा भीमदेव यांच्या स्वभावांत, मनोवृत्तींत जमीनअस्मानाची तफावत असतनाहि ते त्या तिन्हीं नाटकांतील भूमिका सारख्याच तद्रूपतेनें करीत. नाट्याभिनयांतील त्यांचें नैपुण्य लक्षांत घेऊन तत्कालीन प्रेक्षक त्यां गॅरिक ' असें कौतुकानें म्हणत. ]

(गणपतराव जोशी यांचें चरित्र ले०— ल. ना. जोशी प्रकाशक–स. कृ. शिंदकर, वाङ्मय विहार मंडळ, २४८ सदाशिव, पुणें. मूल्य १॥ रु.)

## (५) लेखकाला दर्जा नाहीं !

'किर्लोस्कर नाटक मंडळी'चे मॅनेजर आणि सर्वाधिकारी शंकर बापूजी मुजुमदार हे ज्यांच्या पुणें—कसबा पेठेंतील घरांत रहात असत ते श्री. गणपतराव खामकर हे गृहस्थ मिलिटरी पेन्शन पे-मास्टरच्या ऑफिसांतील एक कारकून या नात्यानं वारंवार रत्नागिरीला येत असत. त्यांचा माझा परिचय योगायोगानं यापूर्वीच झाला होता. श्री. खामकर गात असतां रत्नागिरींत वारंवार त्यांच्या गाण्याच्या बैठकी होत असत. कृष्णचरित्रावरील माझ्या नाटकांतील पदें गायनशुद्ध आहेत कीं नाहींत हें पहाण्यासाठीं खामकरांकडून तीं गाऊन घेतलीं त्या वेळीं त्यांच्या डोक्यांत एक कल्पना आली. त्या कल्पनेला अनुसरून पुण्याला घरीं जातांना माझे ते दोन अंक बरोबर नेऊन त्यांनीं शंकरराव मुजुमदार यांना वाचून दाखवले. मुजुमदारांना तें नाटक फारच आवडलं. खामकरांनाही आनंद झाला. शक्य तितक्या लवकर हें नाटक पुरें करून आणलं तर आपण तें बसवाल काय असं ज्या वेळीं त्यांनीं मुजुमदारांना विचारलं त्यावेळीं त्यांनीं खामकरांना चांगलाच धक्का दिला. शंकरराव म्हणाले, "नाटक उत्तम आहे यांत शंकाच नाहीं. रचना आणि लेखनपद्धति आमच्या कोल्हटकरी परंपरेंतली आहे. पात्रांची योजना करतांनाही अनुकूलता आम्हांला जास्त आहे. आमचा नारायण (सुप्रसिद्ध नट बालगंधर्व) राधा झाला तर साऱ्या महाराष्ट्राला भुलवील. **पण अडचण एकच आहे–लेखकाला दर्जा नाहीं.**"

"दर्जा नाहीं म्हणजे काय ?" खामकरांनीं विचारलं.

"दर्जा नाहीं म्हणजे असं—" मुजुमदार म्हणाले, "कीं कोल्हटकर, देवल यांच्यासारख्या लेखकांच्या शेजारीं बसायला पोस्टांतला एक कारकून लायकीचा होईल असें मला वाटत नाहीं."

" पण नाटक तुम्हांला आवडलं ना ? " खामकर म्हणाले, " नाटक जर आवडलं, तुम्ही तें घेतलं, लोकप्रिय झालं, तर लेखकाला आपोआप दर्जा येईल. तुमच्यामुळं दर्जा येईल. ' चंद्रहास ' कार बाबा डोंगरे हे देखील एक-कारकूनच आहेत ना ? "

" तीच तर आमची चूक झाली ! " मुजुमदार म्हणाले, " स्वदेश हित-चिंतकांना शह देण्यासाठीं आम्हीं तें नाटक घेतलं त्यामुळेंच आमचा दर्जा बिघडला. **यापुढं लेखक पदवीधर असल्याशिवाय त्याचं नाटक घ्यायचं नाहीं असं आम्हीं जवळ जवळ ठरवूनच टाकलं आहे.** "

खामकरांनीं त्यांच्याशीं बराच वितंडवाद घातला पण त्याचा कांहींच परिणाम झाला नाहीं !

ती हकिकत ऐकून मला मोठा धक्का बसला. नाटकावरचं मन उडालं... मी निराश होऊं नये म्हणून खामकर मात्र मला सारखं उत्तेजन देत होते... त्या नकारामुळें आतां त्यांच्या मनांत एक प्रकारची ईर्षा उत्पन्न झाली होती. मी मात्र हताश झालों होतों. प्रश्न लेखनकौशल्याचा नव्हता, प्रश्न होता तो पदवीचा, प्रतिष्ठेचा, लौकिकाचा ! प्रतिष्ठा मिळवणं अशक्य नव्हतं, लौकिक मिळवणं असाध्य नव्हतं, पण पदवी मिळवणं मात्र सर्वस्वीं अशक्य होतें....माझ्या स्वतःच्या कुटुंबांचीं माणसं म्हणायला जरी फारशीं नव्हतीं तरी माझ्या स्वर्गवासी झालेल्या बहिणीच्या मुलांचा भार सर्वस्वीं माझ्यावर पडला होता. सात-आठ माणसांचं कुटुंब, पंचवीस रुपये पगार—बदली म्हणून त्या वेळीं तीस मिळत होते—ते टिकवून पचवण्याकडेच लक्ष देणं भाग होतं.

[ पृ. ९७-९९ भा. वि. वरेरकरकृत माझा "नाटकी संसार" प्रथम खंड. प्रकाशक स्वस्तिक पब्लिशिंग हाऊस, केळेवाडी, मुंबई ४. ]

परिशिष्ट ( ब )

# मराठी रंगभूमीवरील संगीत

## ( १ ) पदांच्या संख्येंत होत गेलेली घट.

| नाटकाचें नांव | नाटककाराचें नांव | प्रसिद्धि-काल | पृष्ठ-संख्या | पद-संख्या |
|---|---|---|---|---|
| बालिवध | कृ. रा. दांडेकर | १८६३ | ७६ | ८७ |
| पुनर्दर्शन अथवा मदनजन्म | रा. का. ओक | १८६९ | ७८ | २५० |
| सौभद्र | ब. पां. किर्लोस्कर | १८८३ | ९३ | ९८ |
| पद्मिनी | शा. ना. भिडे | १८९४ | ६० | ९५ |
| रघुकुमार नाटक | ना. ब. पैठणकर | १९०२ | ९४ | १३० |
| मानापमान | कृ. प्र. खाडिलकर | १९११ | १२६ | ५४ |
| सत्तेचे गुलाम | भा. वि. वरेरकर | १९२२ | ९२ | २६ |
| साष्टांग नमस्कार | प्र. के. अत्रे | १९३३ | ९८ | १५ |
| कुलवधू | मो. ग. रांगणेकर | १९४२ | ६४ | ७ |

## ( २ ) संगीत नाटकांची लोकप्रियता

" दहा-दहा वीस-वीस कोसांवरून लोक अण्णांचें ( किर्लोस्कर ) नाटक ( सौभद्र, शाकुंतल वगैरे ) पाहाण्यास ( पुण्यास ) येऊन रुपयाच्या तिकिटास पांच रुपये देऊन, नाटकाची रात्र उम्यानें घालवून व प्रसंगविशेषीं तिकिट न मिळाल्यानें हिरमुसलेलें तोंड करून परत तितकी मजल चालत गेलेल्या गृहस्थांच्या गोष्टी मीं ऐकलेल्या आहेत. कुलीन स्त्रियांनीं हट्ट करून नवऱ्याचे पेटींतून पैसे काढून, गरिबांच्या बायकांनीं फणी, करंडे व फण्या गहाण टाकून व विधवांनीं गळ्यांत घातलेलीं कानकोरणीं विकून, अण्णांचें नाटक पाहाण्यास

जाण्याकरितां पैसे उत्पन्न केल्याच्या गोष्टी अनेक ऐकिवांत आहेत. साधारण पैशाचे कामीं हात जड असणाऱ्या गृहस्थांच्याही या नाटकांचे कामीं नाड्या बऱ्याच हलक्या झाल्या; व गरीबांनीं एक दिवसाची उपासमार—एक नाटक पाहाण्याकरितां अनेकवेळां—सोसलेली आहे. परंतु हा सर्व प्रकार केवळ अण्णांचे नवीन टुमीमुळेंच ( ऑपेराच्या धर्तीवरील संगीत नाटकाच्या ) झाला होता असें नाहीं. तर अण्णांचे मंडळीचे अंगीं गूणच तसा होता. अण्णांचें नाटक पाहाण्यास फक्त गृहस्थच जात असें नाहीं, तर धंदेवाले प्रसिद्ध गवयी जात असत व भावड्या म्हणजे प्रतिगंधर्व आहे असे धन्यवाद त्यांच्या तोंडून निघालेले मीं स्वतः ऐकलेले आहेत. नाटकगृहांत तर हे धन्यवाद पावलोंपावलीं ऐकण्यास सांपडत. उन्हाळ्यांत संध्याकाळचे वेळीं उकडत असतां मध्येंच एखादी गार वाऱ्याची झुळुक आली असतां किंवा अंगास वाळ्याचें अत्तर चोपडलेला एखादा चैनी गृहस्थ आपल्याजवळून झपकन् गेला असतां, आपल्या शरीरास व घाणेंद्रियास अनिर्वचनीय सुख होऊन आपल्या तोंडून ‘ अहाहा ’ असा जो एकदम उद्गार निघतो, अशाच तऱ्हेचे उद्गार भाऊरावांची एखादी उत्कृष्ट तान कानीं पडतांच सर्व प्रेक्षकगणांचे तोंडून निघालेला कोणी ऐकला नाहीं ? आपल्या गांवीं किर्लोस्करांचें नाटक यावयाचें आहे, असें ऐकतांच पंचांगांत न सांपडणारा असा एखादा नवीन सणच उपस्थित झाला आहे कीं काय असें लोकांना वाटावें. असो. अशा रीतीनें किर्लोस्कर मंडळीनें महाराष्ट्रांतील लोकांस एका काळीं अगदीं वेड लावून सोडलेलें होतें.”

**सयाजी विजय**, पुणें, ता. ८।३।१९०१

## ( ३ ) तबल्यासाठीं ‘ एकच प्याल्या ’चा लहेरा !

‘सौभद्रा’ पासून ‘मानापमान’ नाटकापर्यंतच्या कालखंडांतील संगीताचें जर परीक्षण केलें तर असें आढळेल कीं, आज संगीताला जो अर्थ आहे त्या अर्थीं तें संगीत नव्हतें. नाट्यहेतु साध्य होण्याकरितां योजलेलें तें संगीत **साधें, स्वच्छ, स्पष्ट शब्दोच्चारपूर्ण, अर्थवाही व रसोत्कर्षसाधक** असें होतें. साकी, दिंडी व आर्या आदि स्वरूपांतील हें संगीत नाट्याला मारक झालें नाहीं;

भावनिर्मिती, रसोत्कर्ष, अर्थवाहन इत्यादि नाट्यहेतूंना त्याची मदतच झाली. नंतरच्या काळांतल्याप्रमाणें त्या काळीं नाटकाच्या पद्यावल्या निर्माण झाल्या नाहींत. परंतु 'मानापमान' नाटकानंतर ही परिस्थिति बदलली. यानंतरच्या काळांत रंगभूमीवर अनेक गवई आले. जुनें साकी, दिंडी यांचें सोपें संगीत नाहींसें होत जाऊन त्याच्या जागीं बैठकींतील **गवई थाटाचें संगीत** आलें. हें संगीत नाट्यहेतूंना मारक झालें. नाटकांतील **नाट्य गौण होऊन** गवई-थाटाचें संगीत प्रमुख बनलें. व शेवटीं एक वेळ अशी आली कीं नाटकाला संगीताच्या जलशाहून वेगळें रूपच उरलें नाहीं. **गवई थाटाच्या या संगीतामुळें नाटककार, नट व प्रेक्षक यांच्या आजपर्यंतच्या भूमिकाच बदलल्या.**

सर्वांत ठळक बदल म्हणजे नाटकांतील पद्यें म्हणण्याला लागणारा काल अनन्त वाटावा, इतका वाढला, हा होय. आजवर नाटकांतील साकी किंवा दिंडी ही सरळ, स्वच्छ म्हटली जाई, परंतु आतां गवई नट एकादें गाणें किती वेळ म्हणेल याचा भरंवसा उरला नाहीं. वि. सी. गुर्जरांच्या 'नंदकुमार' नाटकांतील " तिमिर पटल भाल विपुल " हें गाणें पुरीं वीस मिनिटें गंधर्व गात असे. मूळ गाणें जरी रसपरिपोषाला व नाट्यनिर्मितीला बाधक नसलें तरी अशानें काय होतें पहा. त्या गाण्यापर्यंतचा प्रेक्षकांवर झालेला परिणाम नाहींसा होऊन गाणें संपून नाटक जेव्हां पुन्हां सुरू होतें तेव्हां ते सर्व पूर्वसंस्कारित परिणाम प्रेक्षकाला मुद्दाम आठवावे लागतात. नाट्यपरिणामाच्या ह्या पुनरुज्जीवनांत वेळ जावा हें एकंदर नाट्यनिर्मितीला बाधक नव्हे काय ? शिवाय रंगभूमीवर त्या वेळीं आलेल्या पात्रांपैकीं एक पात्र असें गाऊं लागलें कीं, **बाकीच्या पात्रांना कांहींच व्यवसाय उरत नाहीं** व शेवटीं हीं पात्रें असे कांहीं व्यापार करूं लागतात कीं त्यांची रंगभूमीवर जी एक नाट्यपूर्ण रचना असते ती बिघडून सर्व परिणाम नाहींसा होतो. गंधर्वांचें ' द्रौपदी ' नाटक मला या ठिकाणीं आठवतें. या नाटकाच्या पहिल्या प्रवेशांत, हौदांत फसून पडलेलीं पात्रेंहि लागोपाठ गाणीं म्हणतात. तीं अशा चढाओढीनें कीं त्या वेळीं कंटाळा येऊन हौदांत पडलेल्या एका नटानें दुसरा कांहींच व्यवसाय न उरल्याकारणानें सिगरेट पेटविली. **हौदांतून धुराचे**

**फवारे** वर येतांना दिसतांच त्याचें स्वागत प्रेक्षकांच्या हास्याच्या फवाऱ्यांनीं केलें असलें तर नवल काय ? रंगभूमीवरील गायक नटाला मात्र लोक कीं हंसतात हें उमजेना !

यशवंत संगीत मंडळीच्या ' सौभद्र ' नाटकाची गोष्ट. त्या वेळीं त्या मंडळींत अनेक गवई होते. **नांदीच अर्धा तास झाली.** अंतोबा करंदीकर नारदाची भूमिका करीत, सवाई गंधर्व अर्जुनाचें काम करीत. ९.३० ला नाटकाला सुरुवात झाली, खरी. परंतु या गवई नटांच्या चढाओढींत **सुभद्रेला रंगभूमीवर यायला साडेबारा-एक वाजला !**

संगीताच्या प्रभुत्वामुळें गवई नटांना महत्त्व आलें. मास्तर दिनानाथ तर दोन गाण्यांमधील एक टप्पा याच दृष्टीनें संवादांकडे पहात व ते घाईघाईनें म्हणून गाणें गावयास सुरुवात करीत... सारांश नटांना या गाण्यांच्या 'वन्समोअर' पायीं नाट्याविषयीं बेपर्वाई वाटूं लागली. व त्यामुळें एकापरीनें नाट्याचा ऱ्हास झाला नाहीं काय ?

गवयी थाटाच्या या संगीतानें प्रेक्षकवर्ग बदलून टाकला. पूर्वीं प्रेक्षक नाटकाला येत ते त्याच्या नाट्यवस्तूचें आकर्षण वाटून. परंतु नंतर नाटकांत कांहींच गम्य नसलेल्या लोकांचा प्रेक्षकवर्गात भरणा होऊं लागला. कथापरिपोष, रसनिर्मिती, आदि गोष्टींची या वर्गाला पर्वा नव्हती व त्यांना त्यांत फारसें कळतही नव्हतें. ते मुख्यतः संगीतासाठींच येत. गाणें आलें कीं त्यांनीं नाटकगृहांत प्रवेश करावयाचा, तें संपलें कीं उठून जावयाचें.........हा वर्ग म्हणजे मुलतानी, बोहरी, गुजराथी, फारशी यांचा.........नाटक मंडळ्यांना त्यांनींच ज्याप्रमाणें अलोट पैसा दिला त्याप्रमाणेंच संगीताला ' वन्समोअर ' देऊन नाट्यहानीहि करण्यास त्यांनीं मदत केली.... **फक्त संगीताकरितां नाटक पाहण्याच्या त्या प्रेक्षकांतील वृत्तीचा अतिरेक** इतका झाला कीं वऱ्हाडमध्यें नाटक मंडळी असतांना अनेक पाटील—माल गुजारांकडून ' आज तिरखवाँ तबल्यावर असेल किंवा कादरबक्ष सारंगीवर असेल तर आमचीं दहा

तिकिटें राखा ' असे निरोप येत ! म्हणजे नाट्यवस्तु तर राहोच पण गायक नटांपेक्षांही त्याचे वादकार साध्यरूप होऊन बसले !

गंधर्व नाटक मंडळीचें अतिशय लोकप्रिय झालेलें 'एकच प्याला' नाटक बरेच वर्षांनीं पुन्हां पहाण्याचा योग मी साधला. वास्तविक १९१८ सालीं हें नाटक मी किती वेळां पाहिलें होतें याचा नक्की आंकडा आतां माझा मलाच सांगतां येणार नाहीं. थिएटरवर जातों तोंच एके ठिकाणीं लोकांचा घोळका दिसला. काय आहे म्हणून कुतुहलानें तिकडे जाऊन पहातों तों " तिरखवाँ-साहेब नाटक वाजवावयाला बसणार आहेत. " अशी पाटी लोक वाचीत असलेले दिसले. " वा, वा, तर मग आज मजा येणार हं नाटकाला ! " कोणाचे तरी हे उद्गार ऐकून मी मनांत विचार करूं लागलों, 'नाटककार, नाटक, बालगंधर्व, बोडस यांच्यापेक्षां आजच्या जगांत या पाटीनें एका तबलजीचें एवढें प्रस्थ माजवावें ओं ! ' मराठी रंगभूमीच्या इतिहासांत प्रथम नाटक महत्त्वाचें होतें. नंतर नाटक व नट दोघेहि समान महत्त्वाचे होते. नंतर नट प्रबळ होऊं लागले आणि त्यांच्याकरितां नाटकें लिहिलीं गेलीं. पण आज के. राम गणेश गडकरी, बालगंधर्व, बोडस, रानडे या सगळ्या प्रमुख व्यक्तींना—नाटकाला व नटालासुद्धां—मागें टाकून नाट्यमंदिरांत तबलजीला जास्त महत्त्व महाराष्ट्र रंगभूमीवर आलेलें पाहून माझ्या डोळ्यासमोर अक्षरशः अंधेरी आली. आज मी राम गणेशांचें ' एकच प्याला ' नाटक पहावयास आलों नसून तिरखवांचा तबला ऐकण्याकरितां आलों आहें अशी जाणीव त्या पाटीनें मला दिली. आज 'एकच प्याल्यां'तील पद्यभागाकरितां तबला नसून तबलजीचें वादनांतील कौशल्य, विद्वत्ता, बहुश्रुतता लोकांनीं ऐकावी म्हणून तबल्याकरितां नाटक आहे हें त्या पाटीनें मला सांगितलें. त्या विद्वान् कसबी तबलजीच्या वाजविण्याकरितां त्या प्रख्यात नाटकाचा आज ठेरा भरला जाणार आहे असें ती पाटी मला बजावत होती.

ले.—शुद्धसारंग [ सत्यकथा—एप्रिल १९४५ ]

परिशिष्ट ( क )

# विनोदी संवादांतील स्थित्यंतरें

मराठी रंगभूमीवरील विनोदाच्या स्वरूपांत (व अनुषंगानें संवादांतहि) होत गेलेलीं स्थित्यंतरें दर्शविणारे चवदा निवडक संवाद पुढें दिले आहेत. १६९० सालीं लिहिल्या गेलेल्या व्यंकोजीसुत शाहूराजेकृत 'श्रीलक्ष्मीनारायण-कल्याण' या नाटकापासून १९४३ सालीं प्रसिद्ध झालेल्या मो. ग. रांगणेकर कृत 'कन्यादान' या नाटकापर्यंत—म्हणजे सुमारें अडीचशें वर्षांच्या काल-खंडांतील सुप्रसिद्ध नाटकांतून हे संवाद निवडलेले आहेत. तौलनिक अभ्यास करण्याच्या दृष्टीनें ते मार्गदर्शक होतील अशी आशा आहे.

हे संवाद वाचण्यापूर्वी विनोदाचे निरनिराळे प्रकार माहित असणें अव-श्यक आहे. त्याकरितां प्रस्तुत पुस्तककर्त्याचें (श्री. अ. के. भागवत यांच्या सहकार्यानें लिहिलेलें) '**मराठींतील विनोद**'—भाग १ व २ (स्वाध्याय माला) हे वाचल्यास बरीच उपयुक्त माहिती मिळेल. ह्या दोन भागांत मिळून विनोदाच्या पुढील प्रधान व गौण प्रकारांचें सोदाहरण व थोडक्यांत असें विवे-चन केलेलें आढळेल.

(१) **प्रसंगनिष्ठ विनोद.**

(२) **शब्दनिष्ठ विनोद**—असंबद्धता—अलंकारिक—कोटी व श्लेष—अतिशयोक्ति—सुभाषित वजा वाक्यें—शीर्षकें—ऐतिहासिक संदर्भ.

(३) **उपहासात्मक विनोद**—राजकीय—धार्मिक—बोलणें व कृति ह्यांच्यांतील विसंगतीवर आधारलेला—आत्मखंडन आणि आत्मस्तुति—वैयक्तिक—वाङ्मयविषयक—विडंबन.

(१)

सूत्रधार : तूं कोण रे ?

कंचुकी : तूं कोण रे ?

सूत्रधार : आम्हीं भागवत.

कंचुकी : भाग्यवंत जाले तरी, मंदिल कोठें ? चादर कोठें ? झगा कोठें ?

सूत्रधार : अरे, भाग्यवंत नव्हे रे. आम्ही दशावतार.

कंचुकी : अरे, दश जाले तरी कोठें रे ?

सूत्रधार : अरे, आम्हांस पुसतोस कां ? तूं कोण ? काशास आलास रे ?

कंचुकी : मी, श्रीमन्नारायण जगदाधार सभेस येताती, सभा सिद्ध करायाकारणें आलों.

सूत्रधार : सभासिद्धि काय करावी रे ?

कंचुकी : पाणी बांधावें ! तोरण सिंपावें ! केळीचे खांब घालावे !

सूत्रधार : तसें नव्हे रे कंचुकी. तोरणें बांधावीं, पाणी सिंपावें, केळीचे खांब लावावे.

कंचुकी : अरे ! तसेंच धगडीच्या तसेंच.

शाहूराजा ( भोसले ) [ ' श्री लक्ष्मीनारायणकल्याण ' नाटक—१६९०. ]

( २ )

विदूषक : अहो महाराज, आपणाला जर मुक्ति हवी असेल तर थोडा उपाय आहे. तो ऐकाल तर सांगतों.

सूत्रधार : अहो असें साधन कोणतें कीं, नारायणनामस्मरण न करतां मुक्ति प्राप्त होते ?

सूत्रधार : महाराज, आपण चार आण्याचे पैसे बाजारांत घेऊन जा आणि गंध्याजवळ जाऊन त्याला सांगा कीं, मला मुक्ति दे. म्हणजे तो सोमल, मोरचूद याचा काला करून देईल. तो घ्या आणि स्वस्थ निजा म्हणजे मुक्ति मिळेल.

सूत्रधार : अरे बेट्या, ह्यापासून परमेश्वराचें साधन न होतां नरकाचें साधन मात्र होईल. बरें, अहो महाराज, आपलें नांव काय ?

विदूषक : नाव राहिली समुद्रांत. आपणांस पाहिजे असल्यास घेऊन येतों.

सूत्रधार : अरे, तुझ्या ह्या देहास काय म्हणतास ?

विदूषक : माझ्या देहाला देह असें म्हणतात. अहो, पण तुम्ही माझें नांव विचारतां आणि आपलें नांव सांगत नाहीं याचें कारण काय ?

सूत्रधार : बाबा, मी येथें नाटकास प्रारंभ केला आहे. म्हणून मी तुझें नांव विचारतों. आतां जर करतां माझें नांव विचारशील तर मला सूत्रधार म्हणतात. आतां तूं आपलें नांव सांग.

विदूषक : माझें नांव जर करतां माहीत नसेल तर सांगतों. मला विदूषक, बेलाशक, महादेवी आणि नट अशीं नांवें आहेत. पाहिजे त्या नांवानें हांका मारा !

—विष्णुदास भावे ( ' नरहरी ' नाटक—सुमारें १८५९ )

( ३ )

सूत्रधार : विदूषका, तूं रे काय कारण योजून आलास ?

विदूषक : मी, मी तूं मला सांगितलेंस कीं, विदूषका, प्रयोजन आहे, चल; म्हणून मी आपला गरीब ब्राह्मण आजचा दिवस तरी तूपपोळी चळचळीत मिळेल अशा बेतानें काखेस सोंवळें भांडें मारून आलों. आणखी सूत्रधारा, हा माझा मुलगाही मी आणिला आहे, पाहा. दुप्पट दक्षिणेचें संधान.

सूत्रधार : विदूषका, तूं तर अकलेचा पूर्ण सागर दिसतोस, गड्या.

विदूषक : तो कसारे ?

सूत्रधार : कसारे ? अरे, मी काय तुला सांगितलें ? मी म्हणालों,—विदूषका, तुझें कांहीं प्रयोजन आहे, चल.

विदूषक : मग मी काय बोललों ? तुला प्रयोजन आहे, म्हणजे मेजवानी आहे; चल.

सूत्रधार : पुन : आपलेंच. अरे तुला प्रयोजन नव्हे तुझें प्रयोजन आहे; चल. प्रयोजन म्हणजे कारण.

विदूषक : हं, हं, आतां उमजलों. माझें कारण आहे काय ? मग बरें आहे. काय म्हणतोस ?

सूत्रधार : माझें साहित्य कर.

विदूषक : प्रयोजन नाहीं म्हणतोस, आणि साहित्य तर कर म्हणतोस. तुझें खरें काय समजावें ?

सूत्रधार : साहित्य म्हणजे पापड, सांडगे, लाडू हें नव्हे, बाबा. साहित्य कर म्हणजे मवृत कर.

— वि. ज. कीर्तने [ ' थोरले माधवराव पेशवे ' नाटक–१८७१ ]

(४)

विदूषक : ( आपल्याशीं ) काय तरी करावें, संसारांत काळजी आहे म्हणून जें मी आत्तां ऐकिलें तें खरें. काय हो करावें, त्या बेटया मांजराच्या संगतींनें माझे सर्व उंदीर बिघडून गेले.

सूत्रधार : काय तरी चमत्कार, असें असंबद्ध बोलणारा अकलेचा निधि हा कोण असावा बरें ?

विदूषक : अहो, असें काय जागृदावस्थेंत बरळल्यासारखे बडबडतां ? मी विचारतों याचा जबाब तरी द्या, नाहींपेक्षां कोल्ह्यास पाहून शेपटींत मान घालून सिंहाप्रमाणें पळत तरी सुटा. असे वाचालासारखे गप्प कां राहातां ?

सूत्रधार : काय तरी अरिष्ट हें ! काय हा वाण्यालंकार !

विदूषक : अहो गडबडाचार्य, वाण्यास अलंकार कोठचे ?

सूत्रधार : अरे बाबा, घटकाभर तुझ्या त्या वाक्‌पांडित्यास गवसणी अडकीव.

विदूषक : ही अडकविली, बोला. ( दोन्ही हातांनीं तोंड दाबून धरतो. )

—ब. पां. किर्लोस्कर [ ' शांकरदिग्जय ' नाटक–१८७३. ]

(५)

शंभुसेन : हं, बसा या ठिकाणीं आतां. ही वेळ आणि हें ठिकाण किती शांत आहेत !

फत्तेसिंग : ( स्वतःशीं ) दुष्ट मनाच्या खळबळण्याशिवाय सर्व स्वस्थ आहे !

शंभुसेन : अंधार तरी किती काळाठिक्कर पडला आहे !

फत्तेसिंग : ( मनांत ) त्याच्या कृष्णत्वास योग्य उपमा म्हटली म्हणजे तुमचें हृदय ! किंवा आज रात्रीं होणारें भयंकर कर्म.

शंभुसेन : छे बोवा, असा अंधार आपण साऱ्या जन्मांत पाहिला नाहीं. डोळे असून अंधळ्यासारखेच झालों आहोंत. मघाशीं माझ्या तोंडासमोर चिलटें घोंगा-

चत होतीं तीं दूर करण्याकरितां म्हणून मी जी त्यांना एक थप्पड मारली ती माझ्याच तोंडांत बसली.

फत्तेसिंग : तसेंच, मचाशीं मी कांहींसें काढावयाकारितां म्हणून स्वतःच्या खिशांत हात घालावयास गेलों, तों तो हात तुमच्याच खिशांत शिरला.

—श्री. कृ. कोल्हटकर [ 'वीरतनय' १८९६ ]

( ६ )

फाल्गुनराव : भादव्या, तूं खरं बोलणारा आणि इमानी नोकर आहेस, म्हणून माझ्या मनांतून या दसऱ्याला तुझ्या हातांत एक चांगलंसं रुप्याचं कडं ठोकून चालायचं आहे. कडं चालेल, कीं एक अशा मोठ्या पदराचं पागोटं बांधूं ? बोल. दोन्हीं आवडत नसलीं तर छान त्रिवारी रेशीम कांठांचें धोतर देतों हवं तर. का तूर्त कांहींच नको ? कांहीं हरकत नाहीं, पुढं पाहूं केव्हां तरी. बरं हें बघ, हळूंच जा आणि ती खोलींत काय करते आहे, तें पाहून ये बरं.

भादव्या : ( आपल्याशीं ) धनीसाहेब खूप झाले आणि पहिल्यानं कडं ठोकलं हातांत. कड्याचं झालं पागोटं, पागोट्याचं केलं धोतर आणि माझं 'नाहीं' नाहीं, 'होय' नाहीं, तोंच जे धोतरावरून निसटले ते आले 'पुढें पाहूं' वर ! तरी मेहेरबानी म्हणतों, आहे हें काढून घेतलं नाहीं ! !

गो. ब. देवल, [ 'संशयकल्लोळ'–१९०३ ].

( ७ )

चंपा : बरं पण आज वर्तमानपत्रांत काय नवीन खबरबात आहे ती पाहिलीत का?

गोपाळ : असायचें काय ? नेहमींचें गुऱ्हाळ ! दहा-पांच नारु, खरूज, मलमपट्टीच्या जाहिराती ! वधू पाहिजे, वर पाहिजे, मुलगा हरवला, बाप गमावला, सासरा पळाला इत्यादि इत्यादि. तसेंच उन्हाळा फार आहे, थंडी थोडी आहे पावसाळा मुळींच नाहीं, लोक हवालदील आहेत, झालें !

चंपा : कांहीं का असेना, इतकीं वर्तमानपत्रें निघाल्यामुळें वाण्यांची तर चंगळ झाली आहे; सगळीं आंत-बाहेर जाहिराती व नोटिसा ह्यांनींच भरलेलीं असतात.

गोपाळ : एडिटरांच्या नि कंपाझिटरचे पाठीवर नाहीं जाहिराती छापूं लागले

अजून हें नशीबच ! एडिटोरियलच्या नांवानें तर पूज्यच ! बहुतेक प्रासंगिक बोल नि उपयुक्त माहिती यांनींच भरलेलीं असतात.

चंपा : आणि माहिती तरी काय पण !—काय म्हणे, सदर्न मराठ्याच्या मिटर गेजचें ब्रॉड गेज करण्याचा विचार चालू आहे ! खंडाळ्याचा घाट पाडून सपाट केल्यास शेतकीखात्यास जास्त मदत होईल असें तज्ञांचें मत आहे.

गोपाळ : अग आणखी नाहीं ऐकलीस वर्तमानपत्रें भरून काढावयाची युक्ति. सूर्य नऊ कोटी मैल लांब आहे, अमेरिकन बाई दीडशें वर्षे जगली; सरड्याची जीभ एक पूर्णांक पांच दशांश इंच लांब असते ! मला जर कुणीं छापूं दिलें असतें तर मीं छापलें असतें कीं—प्रत्येक मनुष्याच्या माकडहाडाची लांबी दोन इंच असते, तेव्हां पांच-पंचवीस एडिटरांच्या माकडहाडांची लांबी एका गाढवाच्या शेपटीएवढी होईल !!

—मा. ना. जोशी [ 'सं० विनोद'—१९१६ ]

(८)

चंद्रेश्वर : बाबा, चला लवकर.—स्वयंवर सुरळीत पार पडणार. ह्या चंद्राचें भविष्य खरें ठरल्यावांचून कसें राहील ?

दिनेश्वर : मुला, भविष्यासंबंधानें कोणींहि असा अभिमान धरूं नये.—ह्या पिकलेल्या केसांचा असा अनुभव आहे कीं, स्पष्ट सांगितलेलें भविष्य हमखास खोटें ठरतें, दुतोंडी भविष्य निम्मेंशिम्में खरें उतरतें, आणि अस्पष्ट भविष्य कधींच चुकत नाहीं,—अरे, मी कंसाच्या जवळ होतों, सकाळींच पत्रिका पाहिली होती, सर्व ग्रहं जागच्या जोगीं धट्टेकट्टे होते; दोन प्रहरीं मी कंसाचा हात पाहिला तोहि शाबूत होता; आणि घटका दोन घटकेंत कंसाला कृष्णानें मारून टाकला ! कंसाप्रमाणें त्याच्या नऊहि ग्रहांना कृष्णानें लाथाबुक्यांनीं मारलें ! कंस पृथ्वीवर मेला असला तरी सूर्यलोकांत — चंद्रलोकांत जिवंत आहे, असें सांगून मी जरासंधाचा विश्वास ज्योतिषावर पुन्हां बसविला. पण तेव्हांपासून निश्चय केला, कृष्णासंबंधानें दुतोंडी भविष्य सांगावयाचें; एकतोंडी भविष्य त्या जबरदस्तापुढें चालत नाहीं.

चंद्रेश्वर : मग आज दुतोंडी भविष्य कोणचें वर्तविलें आहे ?

दिनेश्वर : दुतोंडी भविष्याच्या चार जोड्या आज मी तयार केलेल्या आहेत. त्यांपैकीं दोन जोड्या तूं चालविल्या पाहिजेस, आणि मी दोनं चालवितों.

चंद्रेश्वर : चार घोडे रथाला जुंपून मला ते सहज हांकतां येतात !

दिनेश्वर : पहातों आतां कसे घोडे हांकतोस ते !

चंद्रेश्वर : पण बाबा तुमची चाल कोणची तें सांगाल ना ? नाहींतर माझा रथ नेमका तुमच्या रथावर आदळावयाचा !

—कृ. प्र. खाडिलकर [ 'स्वयंवर' १९१६ ]

( ९ )

इंदु : कामण्णा, माझें तोंड किनई कमळासारखें आहे.

बिंदु : हो. कृष्णकमळासारखें ! मग माझें तोंड तर चंद्रासारखें आहे !

इंदु : पण त्या चंद्राला खग्रास ग्रहण बरीक लागलें आहे तेवढें !

बिंदु : हिची मान वांकडी आहे, बरें का हो !

इंदु : अग, मी तुझ्या वांकड्या मानेचें वेडावणें दाखवितें आहे. कामण्णा, खरें पहाल तर मी अप्सरेसारखी सुंदर आहें !

कामण्णा : ( स्वगत ) मात्र चौदा रत्नांबरोबर अप्सरांचा तांडा क्षीरसमुद्रांतून बाहेर आला, आणि ती गर्दी टाळण्यासाठीं ही काळ्या समुद्रांतून वर आली !

बिंदु : अहाहा ! अप्सरेचा अवतार बघा ! अग, तूं जर अप्सरेसारखी असशील, तर मग मला तर रतीसारखें समजावें लागेल !

कामण्णा : ( स्वगत ) रतीसारखी कां ? प्रत्यक्ष रतिच आहेस तूं ! मात्र शंकरानें मदनाला जाळलें त्या वेळीं पतिभक्तीच्या भरांत फार जवळ गेल्यामुळें त्या आगीच्या लोळांत तूं नखशिखान्त करपून निघालीस, एवढेंच !

बिंदु : कांहो, तुम्ही कां बोलत नाहीं ? तुम्हींच सांगा पाहूं आमच्यांत कुणाचें रूप चांगलें तें ?

कामण्णा : मी काय बोलूं दगड ? जी. आय्. पी. आणि बी बी यांच्या दुहेरी धुमधडाक्यांत सांपडलेल्या मुंबई शहराप्रमाणें माझ्या मनाची स्थिती झाली आहे !

रा. ग. गडकरी [ 'सं. भावबंधन'—१९१७ ]

(१०)

उत्तर : बृहन्नडे, मी दिग्विजय करायचा मनांत आणलाच तर—

बृहन्नडा ( अर्जुन ) : हो, आपणाला नको कोण म्हणणार पण—

उत्तर : पण क्षत्रिय कुळांत जन्म झाला म्हणून मनुष्यानें उठतां बसतां मारामारीच करावी असें नाहीं. मी हातांत जर धनुष्यबाण कधीं घेतलाच—

बृहन्नडा : होय, तेवढीच काय ती अडचण !

उत्तर : हातांत जर धनुष्यबाण घेतलाच तर सारी पृथ्वी जाळून सोडीन. पण आपला पराक्रम गाजविण्याकरितां दुसऱ्यांच्या स्त्रियांना रडवित बसवायचें हें काय म्हणून ? मनाची शांतता संभाळून संतोष राखणें हा पराक्रम, बृहन्नडे, जातिवंत क्षत्रियालाहि कांहीं लहान आहे का तूंच सांग बरें ?

बृहन्नडा : नाहीं कुणी म्हटलें ?

उत्तर : आणि ही मनाची शांतता रहावी, संतोष गमावूं नये, म्हणून माझ्यासारख्या क्षत्रियाला गायनवादनासारखी करमणूक अक्षय चालू ठेवावी लागते !... आणि त्यांतून, बृहन्नडे, रणांगणावर कधीं जावेंच लागलें तरी धनुष्याबरोबर सतार नेण्याला मी कधींहि विसरणार नाहीं. धनुष्याची प्रत्यंचा झाडणें आणि सतारीची तार छेडणें—दोन्हीं मला एकदमच करावींशीं वाटतील. शत्रूला आव्हान करायचें तें मला एखाद्या उत्तम रागाच्या आरोहा-अवरोहाबरोबर करितां येईल. आणि नृत्याचा ताल किंवा लय ढळूं न देतां मी शत्रूवर धांवून जाईन.

न. चिं. केळकर [ 'वीरविडंबन '—१९११. ]

(११)

रागोपंत : गाढवा, इतक्या हांका मारल्या, होतास कुठं ? मी गांवाला जायचा—अक्कल नाहीं तुला—माझी तयारी करायची ?

वक्रतुंड : यजमान पुन्हां एकाएकीं बहिर्गमन करणार ?

रागोपंत : गध्या, नाहीं ! गांवाला चाललों आहे.

वक्रतुंड : पुनरागमनाय कीं नितांत गमनाय ? अद्वितीय यजमानांची कीं वहिनीबाईसह वेषाची तयारी ?

रागोपंत : बस् कर तुझा संस्कृत शहाणपणा आणि थोडंसं फराळाचं घाल आणि माझी एकट्याची पेटी तयार कर.

वक्रतुंड : म्हणजे वहिनींचा उत्सर्ग करून यजमान अद्वितियच लंबायमान होणार ! हा केवळ ब्राह्मणाचा प्रलय आहे.

रामोपंत : बरं, बरं ! पेटी तयार कर आणि झटकन् गाडी घेऊन ये पाहूं.

वक्रतुंड : उन्मीलित शकट आणूं कीं अवगुंठनवती शिबिका आणूं ? तुमचं शीर्ष बोडकं, तेव्हां अवगुंठनवती शिबिकाच बरी.

रागोपंत : मूर्खा, माझी कोट—पगडीहि घेऊन ये.

वक्रतुंड : परंतु बरोबर यायला घरांत पाथिकेय शिलक नाहीं. वहिनीबाईनीं सकाळींच त्याची पूर्णाहुति घेतली.

रागोपंत : थांब, गाढवा ! तुझं गीर्वाण भाषेचं अजीर्ण कायमचं मोडून टाकतों. ( पोटावर मारतो—तो जातो )

शं. प. जोशी, [ 'खडाष्टक'—१९२७ ]

(१२)

विठल : ही झुणका-भाकर कुणी केली आहे ?

बिजली : म्हारानं केली आहे ! काय करायचं आहे तुम्हांला त्याच्याशीं ?

विठल : तसं नव्हे. पण भाकर जर तुझ्या काकीनं करून ठेवलेली असेल, तर ती मला नको.

बिजली : काय झालं आहे काकीच्या हाताला ? काय तिच्या हाताला कोड फुटलं आहे, कीं माझ्या हाताला केशरकस्तुरी हसली आहे ? मीच केली आहे ती भाकर ! आतां करा गिळायला सुरवात !

विठल : बाकी एकंदरींत या भाकरीमुळं तुझी जात मला कळली.

बिजली : कशी कळली माझी जात ?

विठल : आतांच नाहीं कां सांगितलंस—कीं म्हारानं भाकर केली म्हणून ?

बिजली : एकंदरींत काय कीं तुम्हाला म्हाराच्या हातची भाकरी आवडते ! म्हार म्हटल्यानं मी रागवायची नाहीं बरं. मला कुणी म्हार म्हटलेलं खपेल पण

श्रीमंत म्हटलं तर माझ्या पायाची तिडीक मस्तकाला जाते.

विठ्ठल : हें पहा. जरा शांत हो—आणि तूंहि जरा हातभार लावना या भाकरीला.

बिजली : अगदीं जातिवंत श्रीमंत दिसतां ! आपलं पोट भरल्याशिवाय तुम्हांला दुसऱ्याची आठवण होत नाहीं !

—भा. वि. वरेरकर [ 'सोन्याचा कळस'—१९३२ ]

( १३ )

कल्याण : साऱ्या जाति मेल्याशिवाय हिंदुधर्म जिवंत रहाणार नाहीं.

सोमेश्वर : खुद्द भगवंतांनीं निर्माण केलेली चातुर्वर्ण्यपद्धति तुम्ही घुंगुरटीं मोडणार ! तुमचे बाप उतरले पाहिजेत स्वर्गातून !

कल्याण : आमचे अजून गेलेच नाहींत तर उतरणार कोठून !

सोमेश्वर : म्हणे जाति मरणार ! परमेश्वरप्रणीत सनातन धर्म बुडवून तुम्हांला काय नरकाचे वांटेकरी व्हायचंय !

कल्याण : आमचं राहूं द्या हो—आम्ही काय नरकांत जाऊं नाहीं तर ड्रेनेज-मध्यें राहूं; तुम्ही तर स्वर्गांत जाल ना ! खुशाल स्वर्गांत जा—नाहीं अगदीं नंदन-वनांत जा आणि पांच रुपये स्क्वेअर फुटानं जागा खरेदी करून प्लॉट्स पाडून इमारती बांधून आरामांत रहा ! आमचं कांहीं म्हणणं नाहीं.

सोमेश्वर : तुम्हांला नरकाची भीति वाटेल कशी ! मेलेल्या जनावराच्या मांसाचे तुकडे चघळणाऱ्या महारमांगांच्या घाणेरड्या घरांतून जाऊन बसणारे व जेवणारे तुम्ही ! तुम्हांला नरकाची भीति काय वाटणार !

कल्याण : तुमच्या स्वच्छतेची, शुद्धतेची आणि पावित्र्याची घमेंड बस करा ! महारमांग काल परवां मेलेल्या जनावराचें मांस खात असतील तर तुम्हीं हजारों वर्षांपूर्वी मेलेल्या रूढीचे मुडदे चघळीत बसलां आहांत अजून ! महारपोरांच्या अंगावर जेवढी घाण नसेल तेवढी कुचकट विचारांची घाण तुम्हां सनातनी लोकांच्या बुरसलेल्या टाळक्यांत आहे. आतां नुसत्या कपड्यांविषयींच म्हणाल तर तुमचीं जानवीं, धाबळ्या अन् मुकटे जर खडकवासल्याच्या तलावांत बुचकळले तर साऱ्या पुण्याला पटकी झाल्याशिवाय राहणार नाहीं !

—प्र. के. अत्रे [ 'वंदे भारतम्'—१९३७ ]

( १४ )

माणिक : मला बोलावलं ?

भार्गव : हो म्हटलं घरांत नवरा या नांवाचा प्राणी असतांना पोपटा—मांजराशीं बोलून वेळ कांढण्याइतका कांहीं प्रसंग अजून ओढवलेला नाहीं आपल्यावर !

माणिक : इश्श ! सहज आपली मिठूजवळ बडबडत बसलें होतें झालं.

भार्गव : तीच इथं माझ्याशीं बडबडत राहिली असतीस, तर मला त्या पोपटा-पेक्षां जास्त बरं वाटलं असतं.

माणिक : बरं—काय बोलूं ?

भार्गव : पोपटाला असा प्रश्न विचारला होतास का ?

माणिक : इश—तो काय सांगणार ?

भार्गव : आणि मी तरी काय सांगणार ?

माणिक : खरंच—काय बोलावं तुमच्याशीं—कळतच नाहीं. ( मिस्किलपणें ) बाकी पण तसं अगदींच कांहीं बोलायला नाहीं असं नाहीं.

भार्गव : ( खोट्या औत्सुक्यानें ) अस्सं ? मग बोल ना.

माणिक : किनई आईला कालपासून थोडा खोकला झाला ! आणि आबांनाहि सर्दी होईल असं वाटत आहे !

भार्गव : हो का ? आणि जिवा गडी बरा आहे ना ?

माणिक : हो ऽ !

भार्गव : आणि तुझा तो बोका ?

माणिक : तो झोपूनच आहे कालपासून. त्यालाच घेऊन पोपटाजवळ बसलें होतें मी !

भार्गव : हो का ?—छान मग तुझ्या आबांनीं माझ्याशीं तुझं लग्न लावून देण्या-पेक्षां त्या बोक्यालाच कां नाहीं घरजांवई करून टाकला ?

माणिक : तो एम्. ए., एल्. एल्. बी. कुठं आहे ?

—मो० ग० रांगणेकर [ ‘ कन्यादान ’ १९४३ ]

परिशिष्ट ( ड )

# रंगभूमीच्या बाह्य साधनांतील स्थित्यंतरें

## ( १ ) मराठी नाटकांच्या अंक-प्रवेशादि विभागणींत होत गेलेले बदल

दृश्य वा श्राव्य कलावस्तु विस्तृत स्वरूपाची असली म्हणजे प्रेक्षक व श्रोते यांच्या सोयीच्या दृष्टीनें तिची विभागशः रचना करणें आवश्यक असतें. चित्रपटांतून ' मध्यंतर ' ( *interval* ) याकरितांच योजिलेला असतो. जुन्या मासिक पुस्तकांतील दीर्घ कथांना देखील योग्य तिथें एक, दोन, तीन असे आंकडे घालून वाचनाच्या सोयीच्या दृष्टीनें रचनेचे टप्पे दाखविलेले आढळतात. कादंबऱ्यांतून प्रकरणांच्या द्वारें ही विभागणी दर्शविली जाते. महाकाव्यांतील 'महा' कथा खंड, सर्ग, कांड यांमधून विभागलेली असते. नाट्यसंविधानकाची विभागणी अंक व प्रवेश यांच्या द्वारां केलेली असते. अंक व प्रवेश यांच्या संख्येंत —संगीताप्रमाणेंच—काय स्वरूपाचे बदल होत गेले हें पुढें दिलेल्या तक्त्यावरून स्थूलमानानें लक्षांत येऊं शकेल.

पुढें दिलेल्या माहितीवरून अंक व प्रवेश यांबाबत होत गेलेल्या बदलाचें स्थूल स्वरूप लक्षांत येऊं शकेल. अर्थात अपवादरूप अशा कित्येक नाटकांचा उल्लेख केलेला नाहीं. उदा. ' विलासतरंगिनी ' ( धों. भि. मराठे—१८७१ ) या नाटकांत अंक-प्रवेश नाहींत, तर शेवटपर्यंत लांब लांब संभाषणें व वर्णनें आहेत; ' मदालसा ' ( चिं. म. गोळे—१८७९ ) या नाटकाचे पूर्वार्ध व उत्तरार्ध असे भाग असून प्रत्येकांत तीन तीन अंक आहेत; ' सैरंध्री ' ( ब. बा. नेने—१८८२ ) या नाटकांत बारा अंक आहेत; ' वेणुनाद ' ( शां. गो. गुप्ते—१९२३ ) या नाटकांत अंकांऐवजीं ' निनाद ' व प्रवेशांऐवजीं ' तरंग ' असे शब्दप्रयोग केलेले आहेत. ' क्षमेची क्षमा ' ( ना. वि. कुलकर्णी—१९३२ ) या

नाटकांत दोनच अंक आहेत. 'रघुनाथसिंग व मनोरमा' (बा. मो. विजयकर—१९३२) या नाटकांत सात अंक असून एकूण प्रवेशसंख्या चौऱ्याहत्तर आहे !

| नाटकाचें नांव | नाटककाराचें नांव | प्रसिद्धी-काल | अंक-संख्या | प्रवेश-संख्या |
|---|---|---|---|---|
| लक्ष्मीनारायण कल्याण | शाहूराजे भोसले | १६९० | १ | ९ |
| व्यवहारोपयोगी नाटक | गोविंद नारायण | १८५९ | ० | ६ |
| थोरले माधवराव पेशवे | वि. ज. कीर्तने | १८६१ | ४ | २२ |
| पार्थ पराजय | द. वा. जोगळेकर | १८८० | ० | ११ |
| सौभद्र | शं. पां. किर्लोस्कर | १८८३ | ५ | ० |
| पानिपतचा दुर्दैवी मोहरा | भाऊसाहेब सोमण (किरात) | १८९८ | ५ | ५० |
| मूकनायक | श्री. कृ. कोल्हटकर | १९०१ | ३ | १५ |
| तोतयाचें बंड | न. चिं. केळकर | १९१२ | ५ | १७ |
| भावबंधन | रा. ग. गडकरी | १९१७ | ५ | २४ |
| × तुरुंगाच्या दारांत | भा. वि. वरेरकर | १९२३ | ३ | ० |
| + मेनका | कृ. प्र. खाडिलकर | १९२६ | ३ | ५ |
| × आंधळ्याची शाळा | श्री. वि. वर्तक | १९३३ | ३ | ० |
| × कुलवधू | मो. ग. रांगणेकर | १९४२ | ४ | ० |

## (२) रंगभूमीच्या बाह्य सजावटींत होत गेलेले बदल

अंक-प्रवेशांच्या विभागणींत व संख्येंत होत असलेल्या बदलाच्या बरोबरच एकीकडे रंगभूमीवरील देखाव्यांच्या—दृश्यांच्या—म्हणजेच अनुषंगानें पडद्यांच्या मांडणींत व स्वरूपांतहि बरेच महत्त्वाचे बदल होत गेले.

---

× ह्या नाटकांतून प्रवेशरहित अंकांची योजना बुद्धिपुरःसर केलेली आहे. नाट्यरचनेंतील कृत्रिमता कमी करण्याच्या कल्पनेनें इब्सेन प्रभृति पाश्चात्य नाटककारांनीं ही रचनापद्धति प्रथम अवलंबिली. आपल्याकडे तिचें प्रथम अनुकरण वरेरकरांनीं केलें. अलिकडे हीच पद्धति मराठी रंगभूमीवर रूढ झालेली आहे.

+ ह्या नाटकाच्या पहिल्या अंकांत एकच प्रवेश असून पुढील दोन अंकांत प्रत्येकीं दोन याप्रमाणें प्रवेश आहेत.

"विष्णुदास भाव्यांचीं नाटकें होण्यापूर्वीच्या काळांत ' ललित ' हा नाट्य-प्रकार सर्वत्र रूढ व लोकप्रिय होता. या " ललितांत जीं सोंगें आणीत तीं ओबडधोबड अशींच आणीत. रात्रीं हिलालांत सरक्या घालून किंवा तेलाचे काकडे पेटवून त्याच्या उजेडांत खेळ करीत. खेळाला सामानसुमानहि फार लागत नसे. पुढें एक अलवानीचा पडदा, पांच-चार धोतरें व लुगडीं, एक-दोन किरीट, थोडा पालापाचोळा आणि राळ एवढें असलें म्हणजे झालें." ( वि. पां. दांडेकर—' मराठी नाट्यसृष्टि '—खंड १ ला. )

" विष्णुदास भाव्यांच्या वेळीं स्थानिक स्वरुपाचीं नाट्यमंदिरें नव्हतीं. प्रथम श्रीमंत आप्पासाहेब सांगलीकर यांच्या मनरंजनाकरितांच नाट्यरचना अस्तित्वांत आल्यानें तिचे प्रयोग करण्याकरितां नाट्यमंदिराची उणीव भासण्याचें कारण नव्हतें. सरकारी दिवाणखाना अथवा श्रीगणपतीच्या देवळांतील सभामंडप हीं सरकारीं स्थळें उपलब्ध असल्यानें या बाबतींत फारसा विचार झाला नसावा...दिवा-बत्तीची सोय हल्लींप्रमाणें अर्थातच नव्हती. सर्व प्रयोग दिवटया-मशालींचे उजेडांत होत. " ( वा. ग. भावे—' विष्णुदास भावे यांचें चरित्र ' ) परंतु भाव्यांना मिळालेलें यश पाहून त्या काळीं ज्या इतर अनेक नाटक मंडळ्या स्थापन झाल्या होत्या त्या सर्वांनाच राजाश्रय मिळणें जड होतें. त्यामुळें ह्या कंपन्या गांवांतील एखाद्या बाजूच्या " देवळांत अथवा मोठ-मोठ्या पडीक वाड्यांत त्या वेळीं नाटकें करत...खोरीं, कुदळी, घमेलीं त्यावेळीं नाटक मंडळीजवळ असत; कारण गांवोगांवीं हंगामी थिएटर बांधण्याचें काम सर्व नटच करीत असत. विशेष कठीण नाहीं अशी जमीन खांदून त्यांत खांब रोवावयाचे, त्यावर बांबू बांधावयाचे व गांवांतून मागून आणलेलीं पालें त्यावर घालावयाचीं. देवळाच्या अगर वाड्यांतील चौकांत ही सर्व व्यवस्था करावयाची. चौथऱ्यास स्टेज समजून त्यावर नाटकें करावयाचीं." ( पां. ग. क्षीरसागर—' मराठी रंगदेवतेच्या स्मरणांतील शंभर वर्षांच्या मौजा '—खंड १ ला ) या नाटकांतून " आतांप्रमाणें पडद्याच्या आंत देखाव्याची किंवा स्थलविशेषाची मांडणी करीत नसून पडदेहि पुष्कळ नसत. पुढच्या एका पडद्यावर काम चाले."

व तो कड्या लावून दोरीनें ओढून घेतां येण्यासारखा केलेला असे. हा पडदा एकदां सारला कीं, नाटक संपेपर्यंत बहुधा पुढें ओढीत नसत. रंगभूमीवर कचेरीचा थाट म्हणजे चार-दोन खुर्च्या ओळीनें घातल्या म्हणजे झाला. देवांची कचेरी ( प्रवेश ) याच खुर्च्यांवर; ती आटपली कीं, राक्षसांची कचेरी याच खुर्च्यांवर व राक्षसांची आटपली कीं, स्त्रियांची कचेरी याच खुर्च्यांवर ! याप्रमाणें सर्व प्रसंगीं विदूषकास येथें मांडणी करण्याकरितां किंवा कांहीं लागलें सवरलें तर तें देण्याकरितां उभे रहावें लागे......या नाटकांच्या वेळीं बहुतेक पडद्यांवर देवादिकांचीं चित्रें काढलीं जात असत. त्यांतल्या त्यांत सर्वांत पुढच्या पडद्यावर गणपति, मारुती अगर शंकर-पार्वती अशांपैकीं एखादें चित्र असून रंगाच्या भपक्याखेरीज त्यांत कांहीं विशेष नसे व साधारणपणें तें ओबडधोबडच असे." ( आ. वि. कुलकर्णी—' मराठी रंगभूमि ' ) याकाळीं " नाटक मंडळींत पिवडी आणि हिंगळक हेच दोन रंग प्रामुख्यानें वापरले, जात. सफेत्याचा उपयोग गंध, भस्माचे पट्टे किंवा काळे केस पांढरे करणें, यापलीकडे होत नसे...... प्रकाशासाठीं डिट्मारचे चाळीस लाईनचे तीन दिवे वर टांगलेले असत आणि फूटलाईटसाठीं तीस चाळीस तांबड्या रंगाच्या मागल्या प्रभावळीच्या चिमण्या ठेवलेल्या असत. या अंधुक प्रकाशांत तोंडाला लावलेली पिवडी पुरेसें काम देत असे..... या काळीं कोंकणांत थिएटरं माडांच्या झापांचीं बांधलेलीं असत. अगदीं परवांपर्यंत मालवणांत झापांचंच थिएटर बांधलं जात होतं. " ( भा. वि. वरेरकर—' माझा नाट्यकी संसार.')

" कोल्हापूरकर नरहरबुवा हे आपली कंपनी घेऊन १८७५ च्या सुमारास हैद्राबाद येथें गेले. त्या वेळीं त्यांनीं पारशी कंपनीचे खेळ पाहून नंतर आपल्या खेळांत पांच-सहा पडदे तयार केले; व तेव्हांपासून पडद्यास सुरुवात झाली......याच सुमारास सुरू झालेल्या ' बुकिश नाटकां ' च्या प्रयोगांत रस्ता, देऊळ, बाग, महाल, डोंगर, जंगल, नदी, वगैरे निरनिराळ्या स्थलांची बरोबर कल्पना प्रेक्षकांच्या मनांत उतरून देण्याचा प्रयत्न होऊं लागल्यामुळें पडद्यांवर तीं तीं स्थलें दिसतील तितकीं हुबेहुब काढूं लागले. त्यांतून कांहीं

नाटकें प्रस्तुत कालचीं स्थलें, माणसें, प्रसंग वगैरेवर रचलीं असल्यामुळें व नव्या इंग्रजी पद्धतीनें चित्रकलेचें शिक्षण इकडील लोकांस मिळूं लागल्यामुळें पडदे रंगविण्यांतहि सुधारणा झाली. मुंबईच्या सात मजली इमारती, रस्ते, आगगाडीच्या सडका, समुद्रांतील बोटी, गिरण्यांतील धुराडीं वगैरे देखावे त्यांतून निघूं लागले......देखावे दाखविण्याच्या कामांत तर फारच अंतर पडलें. म्हणजे बागेचा देखावा दाखवावयाचा झाला तर पूर्वीं पडद्यांवर पांच-चार झाडें व कुंड्या काढून किंवा फार झालें तर झाडाच्या चार-दोन डहाळ्या पुरून दाखवीत असत. पण आतां नुसत्या पडद्यावरच्या झाडांवर न भागवितां खरोखरीच्या कुंड्या व झाडें मांडून तो देखावा दाखवूं लागले; एवढेंच नव्हे तर मुंबईसारख्या ठिकाणीं फिरत्या स्टेजची रचना केली असल्यामुळें बगिच काय पण डोंगर, नदी, आगगाडी, आगबोट यांचेहि हुबेहूब देखावे दाखवूं लागले आहेत." ( आ. वि. कुलकर्णी–' मराठी रंगभूमि ') इंग्लिश ऑपेराच्या धर्तीवर नव्या पद्धतीचीं नाटकें रचणाऱ्या किर्लोस्करादि नाटककारांनीं या नव्या साधनांचा अर्थातच भरपूर उपयोग करून घेतला. संगीत व प्रवेशरहित रचना हें किर्लोस्करांच्या नाटकांचें त्या काळीं मोठेंच वैशिष्ट्य ठरलें. पडदे, रंगसाहित्य या बाबतींत उपलब्ध झालेल्या नव्या साधनांचा अतिरेक वा दुरुपयोग करणारी मंडळीहि त्या काळीं भरपूर होती. " मुंबईस एका नाटक मंडळीनें एका ऐतिहासिक नाटकाचा प्रयोग केला, त्या वेळीं एक विलक्षण प्रकार पहाण्यांत आला. शिवाजी महाराजांनीं अनेक किल्ले काबीज केले असा कांहीं संबंध त्या नाटकांत आला होता...शिवाजी महाराजांची भूमिका घेणाऱ्या नटानें नंगी समशेर घेऊन ती ' महाल ' नांवाच्या अनेक पडद्यांवरून साफ इकडून तिकडे फिरविली. एका बुरुंगांतून शिवाजी महाराजांची ही नक्कल बाहेर येऊन तिनें दुसऱ्या बुरुंगपर्यंत पडद्यावरून तलवार नेली केली कीं, एक किल्ला सर झाला ! पडद्रा लागलीच उचलला जाई व दुसऱ्या पडद्यावर तोच प्रयोग होत असे ! ! " (म. मो. कानिटकर–' नाट्यविषयक सुशिक्षित चर्चा') रंगांबाबत उपलब्ध झालेल्या नव्या साहित्यामुळेंहि नाटकांतील पात्रें इतकीं रंगूं लागलीं कीं त्या

मुळें नाटकाचा मात्र बेरंग होऊं लागला! हुजऱ्यापासून राजापर्यंत, दासीपासून राणीपर्यंत प्रत्येक पात्र 'गोरें' होण्याच्या खटपटींत असल्यामुळें त्यांच्यांतील भेद कळणें तत्कालीन प्रेक्षकांना अगदीं दुरापास्त होई. असाच एक तत्कालीन प्रेक्षक लिहितो, 'अलीकडे पुष्कळशा नटांची रंगण्याविषयीं भलतीच कल्पना झालेली दिसून येते. भूमिका कितीहि हलक्या दर्जाची असो, पण तोंडाला रंग हा लागलाच पाहिजे. जणुं काय नाटकी सृष्टींत काळ्या रंगानें काळेंच केलें आहे! राजा पहावा तो गोरा, बरें त्याचा हुजऱ्या पहावा तोहि तितकाच गोरा. चारुदत्त जितका गोरा, तितकाच त्याला मारायला तयार झालेला मांगहि गोरा! आणि हा रंगहि अकलेनें लावलेला नसतो. नाक हा मध्यबिंदू कल्पून नाकापासून हनुवटीच्या टोकापर्यंतच्या त्रिज्येनें काढिल्या जाणाऱ्या वर्तुळावरच हें रंगीत काम व्हायचें. खालीं गळा तसाच!...कधीं कधीं तर कानही मूळच्याच श्याम वर्णाचे राहून त्यांचा धनी अक्षरशः श्यामकर्णासारखा दिसूं लागतो!' (सवाई नाटकी—'प्रमाद पंचदशी'—रंगभूमि मासिक.)

'किर्लोस्कर कंपनीं'तून फुटून निघालेल्या नारायणराव राजहंसांनीं (बालगंधर्व) 'गंधर्व नाटक मंडळी' स्थापन केली. त्यांना मुख्य नाटककार म्हणून लाभलेल्या नाट्याचार्य "खाडिलकरांच्या नाटकांचें एक मोठें वैशिष्ट्य म्हणजे त्यांतील सजावट किंवा दर्शनीयता (*Spectacular*), सिंहासनाधीष्ठित राजांचे दरबार, स्वयंवराचे सुशोभित मंडप, मयसभा, द्यूतसभा, निबिड अरण्यें, भारी रत्नें, वस्त्रें, धारण करणारे राजपुरुष व राजकन्या इत्यादींनीं त्यांचीं नाटकें दृश्यकाव्याच्या दृष्टीनें मोठीं दर्शनीय असतात. या त्यांच्या वैशिष्ट्यामुळें गंधर्वांची वैभवशाली रंगभूमि कशी दिसते?......मोठें प्रशस्त नाटकगृह असून, त्याच्या एका बाजूला उंच रंगभूमि तयार करण्यांत आली आहे. तिच्यासमोर प्रेक्षकांना बसण्याकरितां अर्धवर्तुलाकार उत्तमोत्तम जागा आहेत. विद्युद्दीपांचा सर्वत्र लखलखाट असून, प्रत्यक्ष रंगभूमीवर आग लागल्यासारखा प्रकाश पसरला आहे. रंगभूमीवर जाड मखमलीचा दोन्ही बाजूंनीं वर ओढला जाणारा पडदा असून, आंत निरनिराळ्या प्रसंगीं उपयोगी पडणारे

असंख्य रंगीत पडदे व पंख ( Wings ) आहेत. नटांचे पोषाख श्रीमंती थाटाचे—भपकेबाज असून, रंगोटीचीं साधनें अगदीं अद्यतन आहेत. " ( वि. सां. वांडेकर—' मराठी नाट्यसृष्टि '—खंड. १ ला. )

" किर्लोस्कर मंडळींत बालगंधर्व आणि किर्लोस्करांशीं स्पर्धा करणाऱ्या स्वदेशहितचिंतक मंडळींत केशवराव भोसले, हे दोघे गायक नट जवळ जवळ एकाच वेळीं उदयाला आले ... ... सुरुवातीपासून शेवटपर्यंत केशवराव भोसल्यांनीं व नंतर त्यांच्याच तालमींत तयार झालेल्या बापूराव पेंढारकरांनीं रंगभूमिवरील देखाव्यांकडे अगदीं कटाक्षानें लक्ष पुरविलें...किर्लोस्करकालीन मराठी रंगभूमीवरील दर्शनी पडद्यांवर बहुधा देवादिकांचीं चित्रें असत. ' महाराष्ट्र मंडळी ' च्या पडद्यावर गंगावतरणाचें चित्र होतें, बलवंत मंडळीच्या पडद्यावर लक्ष्मी आणि सरस्वती विराजमान झाल्या होत्या. इंग्रजी कंपन्या बहुधा नाटकें करीत त्या एक्सलसियर थिएटरमध्यें मस्तमालीचा पडदा होता, तसा प्रथम केशवराव भोसल्यांनीं आणि नंतर ' यशवंत नाटक मंडळी ' नें मराठी रंगभूमीवर आणला...पेंढारकरांच्या ' ललितकला नाटक मंडळी ' चे पहिले पडदे बाबुराव पेंटरांचे बंधु आणि ' महाराष्ट्र फिल्म कंपनी ' चे आद्य संस्थापक श्री. आनंदराव पेंटर यांनीं तयार केले होते. ' संन्याशाचा संसार ' मधील शंकराचार्यांच्या मठाचा आणि ख्रिस्त्यांच्या स्मशानाचा अप्रतिम देखावा आनंदरावांनींच तयार केला होता....१९२१ पासून श्री. पु. श्री. काळे ' ललितकले ' त राहिले, आणि ' शहा शिवाजी ' (टिपणीस) पासून ' स्वयंसेवक ' (वरेरकर) नाटकापर्यंतचे चौदा वर्षांतील सर्व देखावे त्यांनींच तयार केले...आधुनिक पद्धतीचे दिवाणखाने, अजिंठाछाप लेणीं आणि देवालयें व बगीच्यांचे देखावे करण्यांत तर त्यांनीं जवळ जवळ अग्रेसरत्वच मिळविलें असे म्हणतां येईल... सामाजिक नाटकांच्या प्रयोगांकरितां तर काळे यांनीं अगदीं अपूर्व असें देखावे तयार केले. १९२२ पर्यंत विंगा, पडदे आणि झालरींवर नेपथ्यरचनेची बहुतेक मदार असे. परंतु काळ्यांनीं ' सत्तेचे गुलाम ' ( वरेरकर ) चे प्रयोगप्रसंगीं दिवाणखान्यांचीं विंगा—झालरी—विरहित ( flat scenes ) दृश्यें तयार केलीं

आणि एका प्रवेशांत रंगमंदिराच्या तळघरांतून काढलेल्या जिन्यामुळें वरच्या मजल्याचा हुबेहूब देखावा दाखविला. " (व. शां. देसाई—'मखमालीचा पडदा').

चित्रपटांच्या वाढत्या लोकप्रियतेमुळें नाटकांना जी ओहोटी लागली होती तिला तोंड देण्याचे दृष्टीनें जे निरनिराळे प्रयोगात्मक प्रयत्न झाले त्यांत 'आनंद संगीत नाटक' मंडळीनें केलेले प्रयत्न उल्लेखनीय आहेत. प्रतिकूल परिस्थितींत नाटकधंदा टिकविण्याच्या दृष्टीनें काय केलें पाहिजे हें सांगत असतांना या कंपनीचे एक नाटककार श्री. गो. रा. शिरगोपीकर 'गोकुळचा चोर' (१९३२) या त्यांच्या स्वतःच्या नाटकाच्या प्रस्तावनेंत लिहितात, " सद्यःस्थितींत नाटकधंदा व नाट्यकला सुरक्षित ठेवण्याकरितां कांहींतरी अन्य साधनांची जोड दिल्याशिवाय तरणोपाय नाहीं, असा अनुभव आल्यामुळें या नाटकाला ब्लॅक आर्ट, घोस्ट सीन्स, सिनेमा, रेडिओ, बॅक ग्राउन्ड म्यूझिक, मायक्रोफोन वगैरेंची जोड देण्यांत आलेली आहे. हा प्रयत्न प्रयोगात्मकच आहे. " या निवेदना. प्रमाणें 'गोकुळचा चोर' या नाटकाच्या " सहाव्या पानावर पूतनादृश्याचा सिनेमा, १६ व्या पानावर पूतनेची ब्लॅक आर्ट, ३२ व्या पानावर बॅक ग्राउन्ड म्यूझिक, ६२ व्या पानावर पुन्हा सिनेमा, महाबळाच्या प्रवेशांत घोस्ट सीन—अशा तऱ्हेनें बऱ्याच जोडकलांचा उपयोग करून नाटक आकर्षक करण्याचा प्रयत्न केला आहे. या खेरीज गोपगोपींचे खेळ, गाईच्या रूपानें येणारी पूतना, कृष्णाचें घननीलत्व, कालिया-कृष्ण युद्ध, पूतनेचा नाश, इत्यादि घटना असल्यामुळें नाटकाच्या आकर्षकतेंत व मनोरंजकतेंत भरच पडली आहे. " ( वि. पां. दांडेकर—' मराठी नाट्यसृष्टि '—खंड १ ).

१७ मे १९३३ रोजीं स्थापन झालेल्या 'नाट्य-मन्वन्तर' ह्या नाट्यसंस्थेनें रंगभूमीची सजावट व संगीत ह्या बाबतींत बरीच अभिनंदनीय अशी प्रगति करून दाखविली. ' सिनेमा ' ह्या साप्ताहिकाच्या ता. १ जुलै १९३३ च्या 'नाट्य-मन्वन्तर खास अंकांत' कंपनीचे मॅनेजर श्री. के. ना. काळे, संगीत दिग्दर्शक श्री. के. बा. भोळे व नेपथ्ययोजक श्री. भी. म. केळकर

यांनीं या बाबतींत लेखद्वारें बरीच महत्त्वाची माहिती दिलेली आहे. ' नाट्य-मन्वन्तर 'चीं नाटकें ' वास्तविक ' ( Realistic ) स्वरूपाचीं व होतां होईतों तीं प्रमेयात्मक ( Problem plays ) राहातील. स्वाभाविकच त्यांची सजावट, त्यांतील भाषणपद्धति व अभिनय हीं नैसर्गिक व जशीं व्यवहारांत आपणांस पहावयाला मिळतात तशींच दाखविलीं जातील. गुंडाळणारीं घरें व पात्रें महालांत भाषणें करीत असतां त्यांना पुढें यावयाला लावून मध्येंच पडणारे पडदे नाट्य-मन्वन्तराच्या नाटकांत दिसणार नाहींत. ( के. ना. काळे ) रंगभूमि व प्रेक्षक यांमध्यें बसणाऱ्या साथीदारांना उचलून सुइंगमध्यें बसविणें, अनावश्यक व अवास्तविक स्वरूपाचीं पडदे नाटकांतून न येऊं देणें व अवश्यक तेथें पार्श्व-संगीताचे योगानें नाट्यांत रसपरिपोष करणें ह्या तीन महत्त्वाच्या सुधारणा श्री. भोळे यांनीं केल्या. त्यासंबंधीं ते लिहितात, " पार्श्वभूमीवरील संगीत योग्य प्रकारें वाजविल्यास नाट्यास पोषक होतें, असा अनुभव आहे......हें संगीत रसपरि-पोषक होत असून त्याचा प्रेक्षकांवर सहज व अप्रत्यक्ष परिणाम ( unconscious effect ) व्हावा हा त्याचा मूळ हेतु आहे. नाट्यास, अभिनयास, कथानकाच्या विकासास त्यामुळें अडथळा येतां उपयोगी नाहीं, खंड पडतां कामा नये तरच तें खरें रसपरिपोषक संगीत म्हणतां येईल. ह्या दृष्टीनें केलेली विशिष्ट योजना प्रत्यक्ष प्रयोगांत आढळून येईलच. ( के. वा. भोळे. ). ' नाट्यमन्वंतर 'च्या नेपथ्यरचनेंत कोणतें मुख्य धोरण होतें ? – " नाटकांतील भूमिकांना प्रामुख्यानें उठाव देऊन, यथार्थ अशी पार्श्वभूमि तयार करणें हें एकच धोरण ' नाट्यमन्वंतर 'नें योजिलें आहे......आजपर्यंत मराठी रंगभूमीवर कधींच साधला नाहीं इतका यथार्थतेचा भास ' आंधळ्याची शाळा ' ( वर्तक ) पहात असतांना होईल असे शक्य ते प्रयत्न केले आहेत...दर दहा मिनिटांनीं स्थळ, काळ बदलण्याचे प्रवेश असल्यामुळें पडदे सोडणें व उचलणें, बाजूच्या किनारी पुढें मागें करणें या क्रियांनीं प्रेक्षकांची एकतानता कशी भंग पावते ह्याचा विचार नाटक लिहिणारांनीं केलेला असल्यामुळें या नाटकांत बिनप्रवेशी अंकांची योजना बुद्धिपुरःसर केलेली आहे ... ... अलिकडे रंगभूमीवरील

प्रकाश-योजनेकरितां विजेचे दिवे भरपूर प्रमाणांत मिळतात म्हणून त्यांचा अतिरिक्त उपयोग करावा, आणि रंगभूमीवर खूप झगझगाट करावा, असे अप्रस्तुत प्रकार मराठी रंगभूमीवर बऱ्याच मोठ्या प्रमाणांत दिसूं लागले आहेत...... निरनिराळ्या रंगांच्या दिव्यांची रंगपंचमी न करतां यथार्थतेनें वैचित्र्य साधण्याचा 'नाट्यमन्वंतर' चा प्रयत्न आहे." (नी. म. केळकर.)

'नाट्यमन्वंतर'नें प्रारंभ करून दिलेली ही रंगभूमीबाबतच्या सजावटीची परंपरा गेलीं सात वर्षे, श्री. मो. ग. रांगणेकरांनीं स्थापन केलेल्या 'नाट्य-निकेतन' या नाट्यसंस्थेनें अत्यंत कलात्मकतेनें व अखंडपणें चालू ठेवण्याचा यशस्वी प्रयत्न केलेला आहे.



**परिशिष्ट ( इ )**

# नाट्यविषयक मराठींतील कांहीं वाचनीय पुस्तकें

## मराठी नाट्यविषयक

( १ ) मराठी रंगभूमि—अप्पाजी विष्णु कुलकर्णी.
( २ ) महाराष्ट्र नाट्यकला व नाट्यवाङ्मय—गणेश रंगनाथ दंडवते.
( ३ ) मराठी नाट्यसृष्टि—( पौराणिक व सामाजिक नाटकें—दोन खंड )
( ४ ) मराठी साहित्य समालोचन—वि. सी. सरवटे.
( ५ ) माझा नाटकी संसार—भा. वि. वरेरकर.
( ६ ) आत्मवृत्त—श्री० कृ. कोल्हटकर.
( ७ ) माझ्या कांहीं नाट्यस्मृति—पु. गो. काणेकर.
( ८ ) मी आणि माझें लेखन—संपादक मो. ग. रांगणेकर.
( ९ ) मखमालीचा पडदा—व. शां. देसाई.
(१०) श्रुतिगुण—नाटिका ( Radio Drama )—शं. ब. तळेकर.
(११) नाटक्याचे तारे—प. ना. पटवर्धन.

## संस्कृत नाट्यविषयक

( १ ) भासाच्या नाट्यकथा—ह. ना. आपटे.
( २ ) संस्कृत नाटककथा—नी. शं. नवरे.
( ३ ) कालिदास—वा. वि. मिराशी.
( ४ ) भारतीय नाट्यशास्त्र आणि पौरस्त्य व पाश्चात्य रंगभूमि—ना. भ. पावगी.

## इंग्रजी नाट्यविषयक

( १ ) शेक्सपिअर व तत्कालीन इंग्रजी रंगभूमि—ग. ह. केळकर.

---